मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका


"डोळ्यांत तुझ्या स्वप्न निळें
स्मित अडविति ओठ जुळें!"
अशा अविस्मरणीय
व गोड स्मृति
चिरंतन करण्यासाठीं
हिंदमाता
फोटो स्टुडिओ
प्रो. व्ही. कुबल
लालबाग ट्राम टर्मिनस मुं. १२
आणि
प्लाझा सिनेमा समोर, दादर, मुंबई.





# दीपावली

ILLUSTRATED MARATHI
ANNUAL
1952

: संपादक :
रॉय किणीकर, चित्रकार दलाल

: प्रकाशन-स्थळ :
दलाल आर्ट स्टुडिओ
४०-४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४

## चित्रें

भरतनाट्यम् ● कथाकलि ● मणीपुरी
कथ्थक ● गर्बा ● सागरनृत्य

दीपावलीचा हा आठव्या वर्षाचा अंक आम्ही वाचकांना सादर करीत आहों. दीपावलीचें नेहमींचें वैशिष्ट्य टिकविण्याचा आम्हीं यंदाहि, प्रमाणाबाहेर प्रयत्न केलेला आहे हें रसिक वाचकांना पटल्यावांचून राहणार नाहीं. या अंकाचें प्रमुख आकर्षण म्हणजे नृत्यावरचीं सहा चित्रें. त्या चित्रांना साकार आणि सालंकृत करण्याचें सर्व श्रेय बॉम्बे-फाइन आर्टचे श्री. रामनाथ मदन, श्री. भय्यासाहेब घोटे, डॉ. घोटे आणि सुप्रसिद्ध लिथो आर्टिस्ट श्री. वा. अ. आपटे या सर्वांना आहे. मौज मुद्रणालयाचे भागवत बंधू आणि प्रेमळ कामगार, देशमुख आणि कंपनीचे श्री. रामभाऊ देशमुख, टॉम अँड वे चे श्री. ग. वि. तांबे यांच्या अनमोल सहकार्यामुळेंच हा अंक इतक्या भरदार स्वरूपांत निघूं शकला. ऐन वेळेच्या अपरिहार्य अडचणींमुळें कांहीं स्वीकारलेले, नव्हे कंपोज झालेले लेखहि या वेळीं देतां आले नाहींत. त्याबद्दल आम्ही फार दिलगीर आहों.

प्रा. अनंत काणेकर आणि श्री. केशवराव भोळे यांचे लेख छापायची परवानगी दिल्याबद्दल आम्ही मुंबई नभोवाणी केन्द्राधिकाऱ्यांचे आभार मानतो.

हें येतें सुमंगल वर्ष आमच्या वाचकांना, लेखकांना, जाहिरातदारांना, विक्रेत्यांना आणि हितचिंतकांना सुखाचें आणि उत्कर्षाचें जावो.

—संपादक

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

## या अंकांत—

वि. स. खांडेकर ● आचार्य अत्रे ● विभावरी शिरूरकर ● पु. भा. भावे ● ना. सी. फडके ● श्री. म. माटे ● कृ. पां. कुलकर्णी ● अनंत काणेकर ● ग. ल. ठोकळ ● वि. वा. शिरवाडकर ● महादेवशास्त्री जोशी ● लक्ष्मणराव सरदेसाई ● केशवराव भोळे ● मंगेश पाडगांवकर ● दुर्गा भागवत ● दि. के. बेडेकर ● इंदिरा संत ● कुसुमाग्रज ● बा. भ. बोरकर ● चिं. ग. कर्वे ● अच्युत बर्वे ● 'क' ● बहिणाबाई चौधरी ● सदानंद रेगे ● वि. म. कुलकर्णी ● दत्ता कदम ● भा. वि. नाडकर्णी ● वसंत लाडोबा म्हापणकर ● सोपानदेव चौधरी ● सुलोमा अमलाडी ● मंगेश पदकी ● डॉ. आजगांवकर ● मनमोहन ● आरती उधावरकर

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

: मुद्रण-स्थळ :
मौज प्रिंटिंग ब्यूरो
खटाववाडी, मुंबई ४



१९४९ ते १९५२ या चारही वर्षांच्या दीपावलींतील चित्रांच्या सेटसाठीं ट. ख. सह रु. ५ फक्त. आणि कुठल्याहि एका सेटसाठीं ट. ख. सह रु. १–७–०

*Edited, printed & published by Roy Kinikar.*



तिचें शरीर शिणलें होतें, मन मलूल झालें होतें.
जणुं कांहीं आज घरांतल्या त्या अंधारांत
उघड्या डोळ्यांनीं ती सत्य शोधून काढण्याच्या
निकराचा प्रयत्न करीत होती.

# प्रवाह



वि. स. खांडेकर

टाळ्यांचा कडकडाट कानीं पडतांच हेमलतेला भास झाला—आपण ही रुक्ष पृथ्वी सोडून कुठें तरी दूर दूर चाललों आहों. कुठें बरें?

तिचें तिलाच नवल वाटलें. ती गात होती, अभिनय करीत होती. समोर बसलेलीं माणसें खरीं आहेत कीं आपण हें स्वप्न पहात आहों, याचा विचार करीत होती आणि हें सारें करीत असतांना ती गाऊं लागली...

तो छोटा चरण तिनें पुनः पुन्हा किती किती निरनिराळ्या रीतींनीं आळविला, घोळविला! हलव्याच्या दाण्यावर हळूहळू कांटा यावा, तसा भास तो ऐकतांना सर्वांना झाला. तो चरण आळवीत असतांना वेणीफणीची पेटी घेऊन मोठ्या मोहक रीतीनें ती खालीं बसली. सुंदर, सडपातळ आकृतीमुळें तिचें तें बसणें सर्वांनाच मोठें गोड वाटलें. प्रेक्षकांच्या मुद्रेवरला आनंद अस्फुट सुगंधासारखा तिला जाणवला. तो चरण आळवीतच तिनें क्षणार्धांत आपला सैल आंबाडा सोडला. काळा कुळकुळीत विपुल केशकलाप तिच्या पाठीवर लोळूं लागला. चटकन् तिनें फणी हातांत घेतली. किंचित् वाकून पुढ्यांतल्या चिमुकल्या आरशांत पहाण्याचा अभिनय केला. भांग पाडण्याकरितां तिनें फणी वर उचलली, रेखीव कुंकुमतिलकाच्या वर नेली, पण फणीचा स्पर्श कांहीं तिच्या केसांना झाला नाहीं. पुढच्याच क्षणीं ती तिच्या हातांतून एकदम खालीं गळून पडली. ती दचकली, मग हसली आणि उठतां उठतां मघांचें गाणें पुन्हा गाऊं लागली—

केशविरचनीं हातुन फणी
गळुनि पडे—तरि न पटे शकुन कां झणीं

गातां गातां लगबगीनें घराच्या पुढच्या दाराशीं जाण्याचा अभिनय तिनें केला. त्या दारांतून तिनें बाहेर वाकून पाहिलें तेंसुद्धां किती चतुरतेनें! तिनें रस्त्यावर दूर दूर दृष्टि फेंकली. हिरमुसली मुद्रा करून ती रंगभूमीवर पुढें आली. मनासारखें कांहीं झालें नाहीं म्हणजे रागानें लहान मूल आईवर रुसतें ना? तोच भाव विशाल डोळ्यांमुळें गोड दिसणाऱ्या तिच्या उभ्या चेहऱ्यावर आतां उमटला होता. गांवाहून परत येणाऱ्या पतीची अधीर मनानें प्रतीक्षा करणाऱ्या पत्नीच्या चित्रणांत कडव्याकडव्याला ती नवा रंग भरीत होती.

एकदां, दोनदां, तीनदां—कितीदां तरी तिला या गीताची रंगीत तालीम करावी लागली. उद्यां शाळेच्या संमेलनांत चारदोन हजार प्रेक्षकांपुढें तिला उभें रहायचें होतें. मुलींच्या सर्व कार्यक्रमांत तिचें गीत हाच सरस भाग होता. त्यामुळें कार्यक्रमाच्या अगदीं शेवटीं तिचें काम येणार होतें. नेहमीं अलंकारिक भाषेंत बोलायची सवय असलेले संस्कृतचे शिक्षक म्हणाले होते, 'तो आमच्या मंदिरावरला कळस आहे!'

तिच्या गाण्याच्या पाठोपाठ काव्यगायनांचा कार्यक्रम होता. त्या गायनाकरितां प्रसिद्ध संगीतदिग्दर्शक प्रकाश येणार होते. ते भावगीतांचे जाहीर कार्यक्रम सहसा करीत नसत. पण ज्यांच्या घरीं ते लहानाचे मोठे झाले, त्यांची मुलगी या शाळेंत होती. आपल्या मानलेल्या बहिणीचा हट्ट पुरा करण्याकरितां त्यांनीं हें निमंत्रण स्वीकारलें होतें. शाळेंतल्या साऱ्या मुलींची आणि शिक्षकांची एकच इच्छा होती—हेमाचें गीत इतकें सुंदर वठावें कीं, प्रकाशांनासुद्धां पहिल्या भावगीताला प्रारंभ करतांना क्षणभर गोंधळल्यासारखें व्हावें. म्हणून तर आज ती अगदीं थकून गळून जाईपर्यंत तिच्या संगीतशिक्षकांनीं पुनः पुन्हा तिची तालीम घेतली.



घाम टिपीत हेमा कशीबशी एका खुर्चीवर येऊन बसली. तिच्या मैत्रिणी किलबिल करीत तिच्याभोंवतीं गोळा झाल्या. कमल तिचे दोन्ही खांदे घुसळीत म्हणाली, "कॉंग्रॅट्स्! हं सुरैया प्लस रसमसाद प्लस लता मंगेशकर!"

इतक्यांत संगीतशिक्षक आले आणि हेमाला म्हणाले, "उद्यांचं सारं लक्षांत आहे ना? दोन वेण्या नकोत. साधं पण चांगलं पातळ नेसून ये. गुलाबी नाहीं तर अंजिरी! तुझं नसेल तर—"

मास्तर थांबले न थांबले तोंच कमळ म्हणाली, "माझं घेऊन जा."

त्या दोघांच्याहि बोलण्यांतला हेतु चांगला होता, हें हेमाला कळलें नाहीं, असें नाहीं. पण मास्तरांनीं ही गोष्ट इतक्या लोकांसमोर सुचवायला नको होती आणि त्यांनीं सुचविली तरी कमलनें मध्येंच तोंड घालायला नको होतें, असें तिला वाटलें. कांहीं न बोलतां तिनें आवंढा गिळला. अलीकडे वारंवार तिच्या मनांत येणारा विचार आतांहि तिला चाटून गेला—देवानें मला सुरेख रूप दिलें, गोड गळा दिला; पण आईबाप देतांना मात्र त्यानें कद्रूपणा केला!

कमल हात धरून तिला उठवीत म्हणाली, "चल, आतांच घेऊन जा तुला हवं तें पातळ!"

"आतां नको ग! उद्यां सकाळीं येईन मी!"

"नि सकाळीं मी घरीं नसलें तर? माझं टेनिस आहे—"

हेमानें मागें वळून हॉलमधल्या घड्याळाकडे पाहिलें. साडेसात! ते जवळजवळ आलेले घड्याळाचे कांटे तिला मोठे विचित्र वाटले. एखाद्या लोखंडी चिमट्यासारखे. आई चिमट्यानें चुलींतले निखारे काढते—साडेसात वाजले—आई नेहमीं आपल्यावर रागावते—घरीं जायला उशीर झाला आहे आपल्याला—आईचे ते जळजळीत शब्द—ते लाल निखारे... आपल्याला सहा वाजतां परत यायला बजावलें होतें तिनें. कालपासून छोटू एकसारखा किरकिरतोय, असें ती म्हणाली होती. आणि—हें घड्याळ मोठें दुष्ट आहे. हेंच काय, सारींच घड्याळें दुष्ट असतात. नको तेव्हां तीं धावत सुटतात!

वावटळींत गिरक्या घेणाऱ्या चित्रविचित्र पानांप्रमाणें हे सारे विचार उलटसुलट तिच्या मनांत गरगर फिरले आणि पुन्हा अंतर्मनांत अदृश्य झाले.

अजीजीच्या स्वरानें ती कमलला म्हणाली, "उद्यां तूं आणून दे कीं तेवढं पातळ—प्लीज!"

कमल तिला लाडिकपणानें ओढीत म्हणाली, "प्लीज नाहीं नि ब्लीज नाहीं. गाडींतून पोंचती करतें घरीं तुला! मग तर झालं? न करून काय करणार बाई! तूं आमच्या शाळेची सौंदर्यराणी—संगीतसम्राज्ञी—अभिनय-अभिनय—पुढं कुठलं शेपूट लावायेचं बाई?"

हेमाचा हात धरून कमलनें बंगल्यांत पाऊल टाकलें तेव्हां माई दारांतच उभ्या होत्या. त्या हसत हसत म्हणाल्या, "तुम्ही अलीकडच्या मुली मनगटा-वर घड्याळ बांधतां तीं कशाला ग? वेळ बघायला कीं दुसऱ्यांना दाखवायला? सात वाजतां क्लबांत जायचं होतं यांना. गाडीची वाट बघून शेवटीं टॅक्सी करून गेले."

कमलच्या आईच्या बोलण्यांत रागाऐवजीं कौतुकच होतें. तिचें हें बोलणें ऐकून ती कमलची सावत्र आई आहे, हें कुणाला खरेंसुद्धां वाटलें नसतें.

हेमा व कमल दिवाणखान्यांत येऊन बसतांच माईनीं प्रश्न केला, "काय घेणार तुम्ही ? चहा ?"

"अं हं !"

"कॉफी !"

"अं हं !"

"सरबत ?"

"अं हं !" हेमाकडे मिस्किलपणानें पहात कमल उद्गारली, "मीठ-मोहऱ्या आण माई तूं !"

"एवढा कसला पराक्रम गाजवून आली आहेस बाई आज ?"

"पराक्रम करणारीं माणसं बोलत नसतात, माई. बघ कशी घुमी बसली आहे ही संगीतराणी—सौंदर्यसम्राज्ञी—"

"अभिनय–अभिनय—पुढं कुठलं शेपूट लावायचं बाई ?" हेमा मध्येंच म्हणाली.

दोघी एकमेकींचे हात धरून ते घुसळीत खदखदून हसल्या. माई आंत कॉफी सांगून आल्या. मग माईंच्या आग्रहावरून हेमानें 'दार वाजलें, उठुनि धावलें, पाहिलें, परंतु नाहिं कुणी पातलें—' हें उद्यांच्या गीताचें पहिलें कडवें म्हणून दाखविलें. इतक्यांत जयंत कमलला देण्या-करितां कुठला-तरी चित्रपटमासिकाचा एक अंक घेऊन आला. तो हेमाच्या समोरच्या कोचावरच बसला. तो आपल्याकडे टक लावून पाहात आहे, हें लक्षांत येतांच तिला कसेंसेंच झालें. दुसरें कडवें म्हणतांना आपल्या स्वरांत कंप येत आहे असें तिला वाटलें. मोठ्या निग्रहानें तिनें आपला स्वर स्थिर केला. मात्र उरलेलीं कडवीं म्हणतांना खालच्या गालिच्यावरल्या फुलांवर खिळलेली आपली नजर तिनें वर वळविली नाहीं. तिचें गाणें संपतांच जयंत टाळ्या पिटीत म्हणाला, "स्वर्गांत याच्यापेक्षां अधिक काय असेल ?"

या स्तुतीला कांहीं तरी उत्तर दिलें पाहिजे, म्हणून हेमा म्हणाली, "अमृत !"

इतक्यांत कॉफी आली. कॉफीचा पेला तोंडाला लावीत जयंत माईंकडे वळून म्हणाला, "हें अमृत तर या घरांत नेहमींच मिळतं. केव्हांहि यावं आणि प्यावं."

कमल हसली. पण माईनीं स्मितसुद्धां केलें नाहीं. त्यांना जयंत आचरट वाटत असला, हें हेमाच्या लक्षांत यायला फारसा वेळ लागला नाहीं. कॉफी पिऊन झाल्यावर त्यानें सिगारेटची पेटी काढली आणि तो माईंना म्हणाला, "एक्स्क्यूज हं. तोंडांतून धूर सोडल्याशिवाय हृदयांत आग पेटत नाहीं. आणि हृदयांत आग नाहीं म्हणजे कलेंत जीव नाहीं. चित्रपटाचा दिग्दर्शक होण्याकरितां हें व्यसन नाइलाजानं पत्करावं लागलं, माई, मला. मास्तर व्हायचं असतं तर धाबळी नेसून मी शाळेंत गेलों असतों ! मग या सुटा-बुटाची काय जरूरी होती ? पण मी हाडाचा कलावंत आहें ! काय सांगत होतों मी तुम्हांला ?..'

जयंत बडबडत होता. कमल मधून मधून हसत होती. पण माई मात्र स्तब्ध होत्या. जयंत बोलण्याच्या रंगांत आला असतांना त्यांनीं दोनदां न वेळां त्याच्याकडे तिरस्कारयुक्त दृष्टीनें पाहिलें, एकदां जांभई दिली, मधेंच पली-कडे पडलेलें मासिक हातांत घेऊन तें वाचण्याचा प्रयत्न केला. हें सारें हेमानें पाहिलें. तिच्या मनांत आलें—हा जयंत माईंना आवडत नाहीं तर आपल्या घरीं त्या त्याला येऊं कां देतात ? तो एक सिनेमाचें वेड लागलेला मुलगा आहे, चार वेळां मॅट्रिक नापास झाला आहे, अशा मुलाशीं तुझी मैत्री मला आवडत नाहीं, असें बाबांनीं चार महिन्यांपूर्वी आपल्याला बजावलें. 'आमच्या घरीं येत जाऊं नकोस,' असें त्यांनीं त्याला स्पष्ट सांगितलें. आपल्या घरांत रेडिओ नाहीं. आपल्याला चित्रपटहि क्वचित् पहायला मिळतात. असें असून सिनेमांतलीं सारीं चांगलीं गाणीं आपण म्हणूं लागलों, तें जयंतानें चित्रपटांच्या पद्यावल्या आपल्याला आणून दिल्या, म्हणूनच ना ?—त्याला गळा नाहीं ! पण साऱ्या नव्या नव्या गाण्यांच्या चाली ठाऊक असतात त्याला ! नसेल तो मॅट्रिक झाला ! मॅट्रिकलाच कोठें मोठें सोनें लागलें आहे ? मोठीं झालेलीं माणसें मॅट्रिक थोडींच असतात ? परवांच आपले मराठीचे मास्तर लेखकांची माहिती सांगत होते—वरेरकर आणि माडखोलकर हे मॅट्रिकसुद्धां नाहींत म्हणे ! पण बाबांना कुठं कळतंय हें ? कारकुनी करण्यांत सारा जन्म गेला त्यांचा ! ज्या दिवशीं दिग्दर्शक होऊन जयंत मोटारींतून त्यांच्या अंगावरून धूळ उडवीत जाईल, त्या दिवशीं त्यांचे डोळे उघडतील !...

जयंत काय बोलत होता कुणाला ठाऊक ! पण तो एकदम मोठ्यानें हसला. कमलहि हसली. तिच्या हसण्यानें हेमा आपल्या तंद्रींतून जागी झाली.

एकदोन मिनिटें कुणी कांहींच बोललें नाहीं. हेमाची दृष्टि कोपऱ्यांतल्या घड्याळाकडे वळली. आठ केव्हांच वाजून गेले होते. ती उठत कमलला म्हणाली, "जातें बाई मी ! फार उशीर झाला."

कमल हसत उद्गारली, "तूं कॉफी प्यायला आली नव्हतीस माझ्याकडे. उद्यांच्या समारंभासाठीं पातळ न्यायला !"

कमलनें पातळ देण्यासाठीं उठायला हवें होतें, पण त्याचा उल्लेख करा-यला नको होता, असें हेमाला पुन्हा वाटलें. जखमी झालेल्या हरिणीच्या दृष्टीनें तिनें जयंताकडे हळूच पाहिलें. तो धूम्रवलयांचा पाठशिवणीचा खेळ पाहण्यांत दंग होऊन गेला होता.

क्लबाकडे गेलेली गाडी कमलच्या वडिलांना घेऊन अजून परत आली नव्हती. गाडी येईपर्यंत थांबायचा कमल हेमाला आग्रह करीत होती. "अग, अशी कांहीं मध्यरात्र झाली नाहीं अजून ! नुसते कुठें साडेआठ झाले आहेत." या तिच्या बोलण्याला हेमानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. साडेआठ उणें सहा एवढा हिशेब तिनें मनानें केला आणि "येतें हं—" असें माईंना सांगून ती जायला निघाली. "सोबत हवी का ?" या जयंताच्या प्रश्नाला तिनें उत्तरच दिलें नाहीं.

मात्र हळूहळू निर्मनुष्य होत चाललेल्या रस्त्यावरून झपझप चालतांना तिला वाटलें, आपण उगीच जयंताशीं अशा तुटकपणानें वागलों. घरापर्यंत पोंचवायला तो आला असता म्हणून असें काय बिघडणार होतें ? किती किती दिवसांत त्याची आपली गांठ पडली नाहीं. सिनेमाच्या आणि नटनटींच्या किती तरी मजेदार गोष्टी त्यानें आपल्याला सांगितल्या असत्या. मागें त्यानें ती एक सांगितली होती ना ? कुठल्या तरी नटीला सिगारेट ओढायचा फार नाद होता. तिनें आपल्या कुत्र्यालासुद्धां सिगारेट ओढायला शिकवलें होतें म्हणे ! त्या कुत्र्यानें एके दिवशीं तिच्या बंगल्याला आग लावली !

(पान १७५ वर पहा)




52.D.M(V)

विक्रेते :
मॅकेनाइज्ड ॲग्रिकल्चर हाऊस, स्टेशनसमोर, विलीमोरा.
भारत ऑटो ट्रॅक्टर कं., श्रेयस बिल्डिंग, चार रस्ता, खडिया, अहमदाबाद.
भारत मशिनरी हाऊस, गेंडी गेट रोड, वडोदा.
चंपकलाल जी. मेहता आणि कं., जेल रोड, अमरेली.
इंटरनॅशनल गॅरेज, कच्छ-मांडवी.



डॉक्टरांनीं निर्मलेला तपासलं.

"आणखी पंधरा दिवस तरी कांहीं करतां येणार नाहीं. बाई फार अशक्त झाल्या आहेत. थोडी शक्ति आल्याशिवाय ऑपरेशन करणं अत्यंत धोक्याचं आहे." डॉक्टर सांगत होते.

तिच्या कानांत प्रत्येक शब्द शिरत होता. आणि शब्दाशब्दागणिक तो ऐकण्याच्या श्रमानेंहि मस्तकांत ठणठण घाव पडल्यासारखें होत होतें. तिचा अस्थिपंजर देह टेबलावरून खालीं उभा राहिला. तिनें डॉक्टरकडे पाहिलें. त्यांची नजर सहानुभूतीची होती कीं औदासीन्याची? कीं धंदेवाईक सहानुभूतीची? पण ती कसला विचार करणार? हृदयाचा ठोका नि ठोका तिचा तिला ऐकूं येत होता. सळ्‌ळ् सळ्‌ळ् असा कांहींसा तापलेल्या रक्ताचा आवाज तिच्या कानांत येत होता. शरमेनें दाटून आलेलें पाणी कोणत्या क्षणीं पडेल याचा नियम नव्हता. तिची तिला चीड आली होती. पुढें पाऊल टाकण्याचें त्राण नव्हतें. पण मन म्हणे, 'त्राण नाहीं? कसलीं कौतुकं करून घेतेस! आणि मेलीस तरी कुणाचं काय वरंवाईट व्हायचंय?"

तिरिमिरीनें तिला एकदां डॉक्टरना म्हणावेंसें वाटलें, 'डाक्टर, असूं द्या. ऑपरेशन धोक्याचं. धोक्याचं म्हणजे काय? मी मरेन एवढंच ना? पण हरकत नाहीं, माझ्यासाठीं रडायलासुद्धां नात्याचीं कुणी नाहींत मला.'

पण जीभ लुळी पडली होती. कांहीं न बोलतां निर्मला थरथरत चाललं लागली. डोळ्यांपुढें अंधारी येत होती. गळणारें पाणी गालांना भाजीत होतें.

ती घरीं आली. खूप खूप रडली. अगदीं मोठ्यांदां रडली. त्या खोलींत कोणी ऐकणारें नव्हतें. कोणी सांत्वन करणारें नव्हतें. तिला त्या श्रमानें ताप आला. पण सगळ्या दिव्यांतून पार पडायचें होतें. कोणताहि ताप तिला मारणार नाहीं या क्षणाला! कोणताहि रोग प्राण हरण करण्याइतके तिच्यावर या क्षणीं उपकार करणें शक्य नाहीं! ती चिडून विचार करीत होती. ऑपरेशनसाठीं जरूर ती शक्ति यावी म्हणून डॉक्टरांनीं दिलेली औषधाची बाटली डोस अजमावण्यासाठीं निर्मलेनें डोळ्यांसमोर धरली. चटकन् तिच्या मनांत विचार आला, 'जादूची कांडी फिरवून एवढं विष करतां आलं तर?' आणि असाहाय्यपणानें तिला हुंदका आला.

भटजींच्या चार मंत्राक्षतांवांचून शीलाच्या जडजवाहिराला उकिरड्यांतील अमंगळाची कळा आली होती. शील—शील—शील! तिचें शील तिच्या दृष्टीनें डागळलें नव्हतें. पण लोक?—त्या गांवगंगेला मनानें बांध घालून बसण्याइतका खंबीरपणा तिच्यांत नव्हता. आणि आतां तिचें शील? त्या दोघांखेरीज, तिसऱ्या माणसाला विश्वासांत घेतांच, त्याच्या लौकिकदृष्ट्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या. 'राजाला गाढवाचे कान आहेत,' ही कुणकुण जशी वाऱ्याच्या लहरींबरोबर राज्यभर पसरली तशी तिच्या कुशीलाची कुणकुण सगळीकडे पसरलेली तिला कल्पनेंत दिसूं लागली. कालची चांदणी

# त्यांचा पाप!



विभावरी शिरूरकर, बी. ए.

**समाजांतील शरमिंधेपणापेक्षांहि तुझ्यासमोरं उभं राहण्यांत वाटणाऱ्या शरमिंधेपणानें मला तुला भेटतां आलं नाहीं, बोलतां आलं नाहीं, लिहितां आलं नाहीं, हें कळेल का तुला ? पटेल का ?**

उद्यांच दगड होऊन पृथ्वीवर पडणार. साऱ्या लहानथोरांचीं सारीं बोटें दाखवतील कीं ती पहा तारका पडली. झालें ? ती पृथ्वीच्या पोटांत खोल खोल खड्डा करून आतां दडेल !

नाहीं. तें जहर पचवायला फार कठीण होतें. मन तडतडत होतें. निर्मला उशीवर मान टाकून पडली. डोक्यांत ठणका वाढत होता. जीव देणेंसुद्धां सोपें नाहीं. नुसत्या जीव देण्याच्या मार्गांचा ती विचार करीत होती.

जिन्यावर पावलें वाजलीं. सततलें अंगावर कोसळून पडत असतां त्या पावलांचाच तिला काय तो आधार होता. तिच्या चेहऱ्याकडे पाहूनच जणुं तिच्या मनाचा कोलाहल अभिरामला उमगला होता. त्याचा चेहरा उदास झाला होता. तो तिच्याजवळ जाऊन बसला. त्याची दृष्टि तिच्या चेहऱ्यावर खिळली पण तो कांहीं बोलला नाहीं. त्याची नजर सारें बोलत होती. निर्मलेच्या तोंडून शब्द फुटेना. मन इतकें फाटून गेलें होतें ! एकदां तिच्या जिभेवर शब्दहि आले—

'बघ, अभिराम, क्षणांचा मोह तुलाहि पडला नि मलाहि पडला. म्हणून झाल्या गोष्टीबद्दल मी तुला 'तूं फशीं पाडलंस' असलं कांहीं म्हणूं शकत नाहीं. पण आतां जें झालं त्यांत बेअब्रू फक्त माझीच होणार. म्हणून मी लग्न करूं म्हणून म्हणत होतें...'

पण ते सारे शब्द ओठावरून माघारी फिरले. बोलण्याची गरजाह नव्हती हें तिला कळत होतें. नव्हे, एकदां तर असेंहि वाटलें कीं अशा संकटांत इतक्या प्रामाणिकपणें पाठीशीं राहणारे तरुण तरी किती मिळतील ? आणि आतां बिचारा अभिराम पाठीशीं उभा राहिला आहे तर त्याला डिवचून त्याच्या मनांत चीड काय म्हणून भरायची ? तोहि आधार तुटला तर ?

हा विचार मनांत येतांच पुनः निर्मलेचे डोळे पाण्यानें भरून आले. अभिराम पहात होता. तिचें अंतःकरण शोधीत होता. त्यानें तीक्ष्ण नजरेनें शोध घेत म्हटलें—

"माझ्यावर तुझा विश्वास नाहीं का ?"

निर्मलेला भडभडून आलें.

"आहे—आहे, अभिराम तुझ्यावर आहे विश्वास."

तिच्या डोळ्यांपुढून तें दुसरें चित्र हलेना. अठरा वर्षांची कॉलेजांत जाणारी एक मुलगी अशाच संकटांत पडली होती. तिनें आपल्या 'मुला'ला ही गोष्ट सांगतांच तो नाहींसा झाला. तिला काय करावें कळेना. तिनें आईबापांजवळ कबुली दिली. त्यांनीं त्या मुलाला हुडकून काढलें. त्यानें स्पष्ट सांगितलें, "तुमची मुलगी चवचाल आहे. मीच कशावरून या गोष्टी-बद्दल जबाबदार ?"

वीज कडाडून पडावी तशी ती मुलगी कडाडून बोलली. पण कांहीं उप-योग झाला नाहीं. आईबापांनींहि अब्रूसाठीं त्या मुलीला घालवून दिलें.

अभिराम असें करणें कसें शक्य होतें ? त्याच्या मैतांच्या बाबतींत तो प्रांजळ होता इतकेंच. आपण बनवावें, फसवावें आणि वाऱ्यासारखें नाहींसें व्हावें हा हेतु असता तर निर्मलेच्या मनाप्रमाणेंच आजपर्यंत तो बोलत राहिला असता. त्या कॉलेजच्या मुलीबद्दल जेव्हां त्याचें बोलणें निघालें तेव्हां तो काय म्हणाला तें निर्मलेला स्पष्ट आठवत होतें.

"मोहानें स्त्रीपुरुष जवळ येतात, अशा वेळीं स्त्रीसहज क्रिया घडून आल्या तर पुरुषाला दोष देण्याची वृत्ति कां असावी हें मला कळत नाहीं. मोह पुरुषा-

लाच असतो असं नाहीं. स्त्रीलाहि असतो. त्याशिवाय सामान्यतः 'माणूस' म्हटल्या जाणऱ्या स्त्रीपुरुषांत असा व्यवहार होणार नाहीं. अशा स्थितींत केलेल्या व्यवहाराचे परिणाम निसर्गामुळें स्त्रीला भोगावे लागल्यावर मात्र स्त्री पुरुषाला दोष लावते याचं मला आश्चर्य वाटतं. जणुं तिला मोह झालाच नाहीं."

यावर निर्मला त्याला म्हणाली होती, "तूं म्हणतोस हें ठीक आहे. आपल्याला झालेला मोह नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. पण निसर्गानें स्त्रीसहज म्हणून घडलेल्या गोष्टीबद्दल समाजानें बाऊ करून तिला कां बोल लावावा ? लग्नविरहित व्यवहार हीन, अमंगल म्हणून समाजानें स्त्रीचा छळ केला नसता तर पुरुषाला दोष देण्याचा प्रश्नच निर्माण झाला नसता आणि स्त्रीसहज घडणारी गोष्ट नैसर्गिक अभिमानाची वाटली असती."

अभिराम हसून म्हणाला, "दर्शनी परिणामावर जर समाजाचं नीतिशास्त्र अवलंबून आहे तर तें पाहूनच समाजरचना बदलेपर्यंत स्त्रियांनीं मोहाला बळी पडण्यापूर्वीं शंभरदां विचार करावा."

हेंच त्या वेळचें त्याचें मत त्यानें आतां बोलून दाखवलें नाहीं, हा त्याचा केवढा मोठेपणा. उलट निर्मलेच्या शारीरिक वेदना त्याला कळणें शक्य नसलें तरी मानसिक वेदना तिच्याहूनहि त्याला तीव्रपणें जाणवत होत्या. निर्मलेच्या निःशक्त पडलेल्या हातावर कपाळ टेकून, डोळे मिटून तो कांहीं क्षण थांबला. नंतर म्हणाला, "निर्मल, क्षमा कर."

आतां निर्मलेवर आलेलें संकट तिचें एकटीचें नसून दोघांवरचें असें तिला वाटूं लागलें. तिनें आपल्या अशक्त हातांनीं त्याचें मस्तक थोपटलें. सर्व संकटांतून बाहेर पडून जर समाज स्त्रीला फांसावर चढवीत असेल, तर अभिरामच्या—अशा थोर मनाच्या पुरुषाच्या सान्निध्यांत जगण्याची इच्छा पुनः मूळ धरूं लागली.

...सहा दिवसांनीं तर डॉक्टरांनीं तिला दवाखान्यांत प्रवेश दिला. ती खोलींत पडली होती. इतके दिवस जगाकडील दारें बंद करून तिच्याच विश्वांत आलेला धीर जगाचीं कवाडें उघडतांच पुनः कसाला लागूं लागला.

नर्सेस् आपलीं कामें करूं लागल्या. एका स्ट्रेचरवर घालून तिला ऑपरेशन टेबलवर नेलें. एक-दोन नव्हे, तीन चार साहाय्यक ! दोन डॉक्टर तेथें वावरत होते. तीन चार नर्सेस्. इतकीं माणसें पाहूनच निर्मलेचा श्वास कोंडल्यासारखा होऊं लागला. एकाच डॉक्टरांना सांगितलेली गोष्ट एकाच जवळ राहील असें तिला कधीं वाटलेंच नव्हतें. पण इतक्या जणांना देखतां देखतां ही गोष्ट कळणार ? निर्मला शरमेनें अर्धमेली झाली. तिचा अभिमान, तिचा मीपणा, तिचें स्त्रीत्व, तिचा आत्मविश्वास ज्या देहावरील प्रावरणांनीं आजवर जतन केला होता, तो देह मृतसा विकल होऊन पडला.

तेथील सर्व मंडळी मात्र निरनिराळ्या विषयांवर सहजपणें बोलत होती आणि आपलीं कामें करीत होती. समोरचा पेशंट ही कांहीं विशेष गोष्ट त्यांना वाटतच नव्हती. पण तिचें मन मात्र पुरें मेलें. काय होईल, कुणाला काय वाटेल याचा विचार करण्याची ताकद नि शुद्धहि तिची गेली....

निर्मला शुद्धीवर आली. तिचें सर्वांग थरथर कांपत होतें. डॉक्टर घाबरून गेले असावे. ते जवळच उभे होते. आतां सारे साहाय्यक निघून गेले होते.

"कॉफी हवी का ?" त्यांनीं नाडी पहात विचारलें. निर्मलेच्या मनाचा तोल पार गेला. तिनें म्हटलें—

"हो. थोडं विष घालून आणा त्यांत."

"Don't be silly !" डॉक्टर तिचा हात थोपटीत म्हणाले. त्या सहानुभूतीचे शब्द ऐकण्यापूर्वींच उष्ण उष्ण अश्रूंनीं तिचीं कानशिलें भाजायला सुरुवात केली.

डॉक्टर कठोरपणानें म्हणाले, "आधीं मन भडकूं देऊं नका. अशा nervousness नें तुम्ही दुसऱ्याच्या गळ्याला फास लावाल."

इतक्यांत दारांत पाऊल टाकलेल्या नर्सला आवाज बदलून शांतपणें ते म्हणाले, "यांना थोडी कॉफी द्या."

निर्मला डोळे मिटून पडली होती. कॉफी प्याल्यावर तिला थोडीच ग्लानि आली. चार पांच तासांनीं ती पुनः जागी झाली. पुनः स्वतःच्या अश्रूंचीं शकलें गोळा करून पुनर्जन्मांत वावरायचा ती विचार करूं लागली !

डोंगराच्या कड्यावरून उडी घेऊनहि पक्ष्याच्या सहजपणीनें भुईसपाटीवर आल्याचा तिला भास झाला. 'आतां पुनः या मोहांना बळी पडायचं नाहीं. परमेश्वरा ! एकदां हात दिलास नि सावरलंस.' पण पहातां पहातां तो सावरणारा परमेश्वर अभिरामाचेंच रूप घेऊन तिच्या अंतश्चक्षूंपुढें आला आणि नजरेचें पारणें फेडायला त्यानें तेथेंच यावेंसें तिला वाटूं लागलें, पण तो दवाखान्यांत येणें किती अशक्य होतें !

दोन नर्सेस निर्मलेच्या खोलींत आल्या. एक तिचें टेंपरेचर घेत होती. दुसरी कसलासा डोस पेल्यांत ओतीत होती.

"अहो, तिनेंच त्या पोराला तोंडावरून गुरफटून टाकलं. गुदमरून मरेल तर काय होईल ? एरवीं मेल्यांना शरम नाहीं. मग मुलं वाढवतांना कशाला शरम पाहिजे ?"

अगदीं न कळतां भिंतीला पाठ टेकावी नि भिंतीची सुई पाठीला बोचावी तशी निर्मलेची अवस्था झाली. तें सारें तिलाच उद्देशून बोलल्यासारखें तिला वाटलें. ती खचून गेली. मेल्या नजरेनें पाहूं लागली. पण त्या दोघींनाहि तिच्या 'ओझ्या'ची कल्पना नसावी. कारण त्या तिलाहि संभाषणांत सामील करीत होत्या. निर्मला मेलेलें हसूं हसून हुं हुं करीत होती.

ती त्या वणव्यांतून गेली नसती तर त्यांच्याइतक्याच तीव्रतेनें तीहि बोलली असती, 'नव्हे—माणसांच्या पापांचीं प्रेतें कालाच्या उदरांत पुरलीं जातात आणि त्या पापांचा विसर पडण्यासाठीं हुरहुरलेलें मन त्या प्रेतावर विस्मरणाची पहिली माती

**समाज-विकास-योजना : पाहणी**



अजीबात एक थेंबहि नाहीं ?

पडसांच स्वतःला पुण्यवान् समजून दुसऱ्यांच्या पापांकडे बोट दाखवूं लागतें ! निर्मलेनें स्वतःच स्वतःला पकडलें.

पण असें मनी नसतें तर ? तर जागच्या जागीं झाडांसारखीं अंतर्दाहानें वठून गेलीं असतीं माणसें. निर्मलेच्या मनांत विचार आला, या दोघींपैकींहि एकादी अशी नसेल कशावरून ? जरा चिडून मन म्हणालें—आणि त्या हतभागिनीचें मन पारदर्शकासारखें तिला दिसूं लागलें. निर्मलेला बोलण्याचें धैर्य असतें तर तिनें म्हटलें असतें—

सर्व न्यायाबंधनांत् आईच्या मायेला किंमत अधिक. मातेच्या अंतःकरणाच्या मृदुतेला उपमा नाहीं. सगळें सगळें खरें. पण हें सगळें भावनांचें जवाहिर, समाजानें ठरवलेल्या नीतितत्त्वांच्या कोंदणांत बसतांना किती तऱ्हांनीं भंगतें नि किती तऱ्हांनीं छेदलें जातें. पोराच्या गळ्याला नख लावणाऱ्या आईच्या अंतःकरणाचा उपहास करतांना आई ही आई राहिली नसून सामाजिक नीतीनें तिला ठार मारून तिचें भूत फक्त शिल्लक ठेवलेलें असतें. त्या आईनें नख न लावतां मुलाला जगवलें असतें तर समाज म्हणाला असता, 'कार निर्लज्ज पहा.'

बिचाऱ्या निरपराधी पोराच्या गळ्याला नख लावलें हा आरोप नको म्हणून लहानाचें मोठें झालेलें मूल तरी समाजानें हलुवारपणें वाढवलें असतें का ? समाजाच्या तुच्छतेच्या अंकुशांनीं घायाळ होऊन तें जिवंत मरण अनुभवीत राहिलें असतें. माणसांची नीति मोठी गंमतीची असते. नीतीचीं कांटेरी कुंपणें स्त्रीला बोचतात हें तर खरेंच, पण त्याहिपेक्षां निरपराधी मुलाच्या गळ्याला नख लागतें. त्या नियमनांनीं आणि त्यांतूनहि नखें न लावलेलीं पोरें कुत्र्याच्या मौतीनें वाढवून समाजकार्य केल्याचा अभिमान नि समाधान बाळगीत राहतात समाजसेवक !

माणसांची आवड मोठी नवलाची खरी ! खऱ्यापेक्षां खऱ्याचा आभास त्यांना आवडतो. निसर्गापेक्षां कृत्रिमतेनें, निसर्गाचा आभास आवडतो. अमर्याद वाढलेल्या वनराजीपेक्षां माळ्याच्या कोयत्या-कात्रीनें कुंठित झालेलीं शाखापर्णें त्यांच्या दृष्टीला आवडतात. अकलंकित भावनांची दीप्ति न आवडतां कलंकित निष्प्रभ भावना आवडतात...

पण हा विचारांचा कोंदाट उठला असतां तीव्रतेनें जीभ कोरडी पडली तिची. तिनें भिंतीकडे तोंड फिरवलें.

विस्तवांतून सोनें पारखून निघावें तशी संकटपरंपरेतून त्यांची प्रीति तगली होती. नव्हे, उलट वाढत जात होती. निर्मल-अभिरामच्या विशुद्ध प्रीतीबद्दल त्यांची त्यांना पुरी खात्री होती. भिक्षुकांच्या चार मंत्रांनींच त्याला पवित्रता येईल असें त्यांना वाटत नव्हतें. उलट भटजींच्या चार मंत्रांनींहि विसंवादी मनांमध्यें अपवित्र बंधन निर्माण होतें कितीदां असें त्यांना वाटत होतें. पण इतके दिवस पवित्रतम म्हणून बाळगलेल्या भावनेला समाजाच्या नियमांची कसोटी लावतांच तिची तिनें मान खालीं घातली. जणुं सोनें सोनें म्हणून म्हटलें तें पितळ होतें.

निर्मलेचीं मतें, तिचा आत्मविश्वास, तिचा दृढनिश्चय त्या सोन्याला सोनेंच म्हणायला आतां शरमूं लागला. चार मंत्राक्षता पडून सुवर्णाला समाजानें सुवर्ण म्हटलें नाहीं कीं आग उठलीच. असह्य–अन्याय्य नियमनाबद्दलची चिरड म्हणून स्वतःला पटणाऱ्या नीतिनियमनांचें त्याचें त्याचें विश्व समाजांत राहून निर्माण करायला लागल्यावर पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणें नुसत्या बाहेरील हवेच्या केवळ कंपानेंसुद्धां त्या विश्वाचा चक्काचूर झाला. निर्मल चकित झाली.



दिवाळीचें शुभचिंतन !






चिमनलाल मानचंद आणि कं.

ज्युवेलर्स

न्यु क्वीन्स रोड, मुंबई. फोन नं. ३०३२१

समाजाविरुद्ध बंड करून ताठर मानेनें चालायला मानेला लोखंडाचा कणखरपणा पुरेसा पडत नाहीं. सभोंवतालच्या निखाऱ्यांत लोखंडाचाहि रस होऊन जातो.

तीनचार दिवसांनीं निर्मला हॉस्पिटलच्या बाहेर आली. तिच्या खोलींत ती आली. दूध पिऊन मांजर डोळे मिटून प्रामाणिकपणाचें नाटक करतें तसें ती करीत होती. त्या तशा प्रामाणिक नाटकाचा तिला अतिशय त्रास होत होता.

'मीं अभिरामशीं मनानें लग्न केलं आहे. त्या लग्नापासून मला मूल झालं त्याची लाज कां? मी हेंच समाजाला कां सांगूं शकत नाहीं?' हजारदां ती विचार करी आणि संस्कारांच्या लगामांनीं तिची जीभ खेचून निर्जीव केली. खंगूं लागलेलें मन सारें विसरून जणुं आपण त्या गांवच्याच नाहीं असा आभास निर्माण करूं लागलें. पुनः नव्यानें जीव धरूं पाहूं लागलें. पण पहातां पहातां तिची नजर शून्यांत बघूं लागे.

तप्त रसांत उकळल्यावरच्या तिच्या वेदना सहानुभूतीच्या बोलांनीं—स्पर्शानें शमवण्याची तिला किती गरज भासूं लागली. ती अभिरामची उत्कंठेनें वाट पाहूं लागली.

कितीक दिवस! आणि अभिराम आला नाहीं. कितीक दिवस. दोन महिने निघून गेले. तरी तो आला नाहीं. त्याचें पत्र आलें नाहीं आणि त्याचा पत्ताहि लागला नाहीं. पृथ्वीच्या पोटांतील रसांना शेवटीं ज्वालामुखीं-तून वाट फुटते. निर्मलेच्या अंतःकरणांत डोंब उसळत होते. तिच्या लेखणीं-तून लाव्हा लवूं लागल्या.

"अभिराम,

माझ्या संकटाच्या वेळीं तूं मला मदत केलीस याबद्दल मी तुझी आभारी आहें. इतके दिवस तूं भेटला नाहींस. पत्रहि लिहिलं नाहींस. पण ती अपेक्षा पुरुषाकडून करणंच चूक. मला गरज होती तेव्हां मला वाऱ्यावर सोडून तूं गेला नाहींस हें तरी काय थोडं झालं? लग्नाचं बंधन आपल्यांत नव्हतं, हें किती बरं झालं! नाहीं तर दूर जातांना माझी केवढी वेडी तुझ्या पायांत पडून राहिली असती!..."

निर्मला लिहीत होती. लिहितां लिहितां त्याचा व्यर्थपणा तिला कळत होता. त्यामुळें आणखीच उपरोधिक लिहून मनाची आग ती शमवीत होती.

सायकलची घंटा वाजली. 'तार' म्हणून उच्चारलेल्या शब्दांनीं तिच्या

अंगावर रोमांच उठले. अभिरामची तर तार नसेल ? हो ! ‘ स्टेशनवर भेट. ’—त्याचीच तार होती ती. निर्मलेच्या अशक्त गात्रांना आधीरतेनें कंप सुटला. पण प्रीतीच्यां पंखांना पर्वत घेऊन उड्डाण करणाऱ्या हनुमंताची शक्ति आली. अभिरामवरील रागानें मन तडतडत होतें. तें त्याला भेट-ण्याच्या उत्सुकतेनें हळुवारपणें अधीर झालें.

स्टेशनवर निर्मलेकडे पहातांच अभिरामनें नजर फिरवली. क्षीणपणें पावलें टाकीत निर्मला त्याच्याबरोबर चालत होती. तेंहि त्याला कळत होतें. टांग्यांतहि तो तिच्याजवळ अक्षर बोलला नाहीं.

ही अखेरची भेट तर नव्हे ?—त्या निस्तब्धतेंत संदेहाचीं भुतें नाचूं लागलीं. निर्मला भिऊन गेली. तीं दोघें पुनः खोलीवर आलीं. अभिराम समोरच खुर्चीवर बसला होता. अजूनहि तो नुसता तिच्याकडे पहात होता. शेवटीं तीच म्हणाली, “ मला स्टेशनवर कशाला बोलावलंस ? ” अभिराम लगेच म्हणाला, “ मला तूं भेटशील असं वाटेना. ” निर्मला चकित झाली. त्याला अपराधी ठरवून यापुढें त्याला भेटायचंहि नाकारीन असं त्याला वाटलं ! आणि ती समजत होती निराळंच. अभिरामबद्दलचा आदर आणि भक्ति शतगुणित झाली. तिची तिला लाज वाटली.

‘ असा पुरुष पारखूनहि मिळायचा नाहीं. पण तूं मात्र स्त्री आहेस. ’ ती स्वतःशीं म्हणाली. त्याच्या खिन्न नजरेकडे पाहूनहि तिचें स्त्रीमन अभि-रामवर आघात करूं लागलें.

“ अस्सं, मी भेटणार नाहीं असं वाटलं होय ? गेल्या दोन महिने किती वेळां भेटण्याचा प्रयत्न केलास ? ”

तो कांहीं बोलला नाहीं. निर्मलेनें आणखी घाव घातला: “ असहाय क्षणांत स्त्रीला सहानुभूतीची किती गरज असते हें कळायला तुम्हां पुरुषांना हृदयच दिलं नाहीं देवानं. तूं दोन महिने गेलास—नव्हे, बेपत्ता झालास. काय माझी अवस्था झाली असेल ? थोडी कल्पना तरी ? स्त्रीच्या आयुष्यांत सोहाळे म्हणून जे प्रसंग साजरे व्हायचे, ते शरमिंधेपणानें सहन करण्याची पाळी आल्यावर—”

पण अभिराम उठला. निर्मलेचा थरथरता हात हातांत धरून तो म्हणाला, “ निर्मल, थोडं न्कोर्स पाहू. समाजांतील शरमिंधेपणापेक्षांहि तुझ्यासमोर उभं राहण्यांत वाटणाऱ्या शरमिंधेपणानें मला तुला भेटतां आलं नाहीं, बोलतां आलं नाहीं, लिहितां आलं नाहीं, हें कळेल का तुला ? पटेल का ? तुझ्या शारीरिक वेदना मला समजणं शक्य नसेल, पण समाजाच्या भीतीनें स्त्रीला एकाकी सोडावं लागलं म्हणून प्रांजल पुरुष मानसिक वेदनांनीं शरपंजरीं पडणं अशक्य नाहीं, याची तुला कल्पना येईल का ? पण जाऊं दे. माझ्याबद्दल मला तुला सांगायचं नव्हतं. मला क्षमा कर. तूं म्हणशील त्या दिवशीं मी लग्न करायला तयार आहें. ”

त्या क्षणीं निर्मला शरमून गेली. पुरुषांना रडतां येत नाहीं हा केवढा शाप आहे असें तिला वाटलें !

●

* —पान १०७ वर “ कोटा स्टोन ”च्या जाहिरातींत त्यांचा मुंबईचा पत्ता, माणेकजी वाडिया बिल्डिंग, १ ला मजला, वेल लेन, फ्रोर्ट, मुंबई, असा वाचावा. पान ८४ वर “ बँक ऑफ सिटीझन्स ”च्या जाहिरातींत, “ एक वर्षाचे मुदती ठेवीवर ३ टक्के व दोन वर्षांचे मुदती ठेवीवर ३॥ टक्के ” असें वाचावें.



## यौवनाचें झाड

या नदीच्या पार वेड्या यौवनाचें झाड आहे
अमृताचा चंद्र त्याच्या पालवीच्या आड आहे
मेदिनीच्या रोमरोमीं रेशमी उन्मेष आहे
केशरी त्याला उषेचा कस्तुरी आशीष आहे
मख्मली प्रत्येक पुष्पीं अंबराचें बिम्ब आहे
चुंबुनी त्यांना हवेचा जीव ओला चिम्ब आहे
धुंद तेथें रे परेच्या पारव्यांचा वृन्द आहे
नाचऱ्या आनंदमोरा घुंगुरांचा छंद आहे
तेथल्या पाण्यांत वीणा-रागिणीची ओढ आहे
सावल्यांना कांचनाच्या नागिणींची मोड आहे
तेथ जाया वेगवेडी पारजाची वाट आहे
शांतवाया ताप अंतीं गोकुळींचा माठ आहे
वृक्षशाखेला युगांच्या मंगलाची वांट आहे
बुद्धदेवाचा तळाशीं हस्तिदंती पाट आहे
सत्यवानाच्या सखीच्या अंतरींचा दीप आहे
ख्रिस्त–मीरा–मोहनाच्या जीवनाची धूप आहे
ज्ञानियांच्या माउलीची नित्य ओवी एक आहे
कान्हयाच्या गाउलीचा दुग्धगंगासेक आहे
कोवळ्या ज्वाळादळांचें भारताचें फूल आहे
हांसरें तेथें उद्यांच्या मानवाचें मूल आहे
त्याजला मीं चुंबिल्यानें आंतही तें झाड आहे
अमृताचा चंद्र माझ्या पालवीच्या आड आहे

—बा. भ. बोरकर



## रा ख अ न् ड स्ट !

स्टोव्ह जीवनाचा पेटवाया ओता
निर्भेळ प्रीतीचें निर्मळ स्पिरिट;
नका वरें ओतूं हीन वासनांचें,
घाण घासलेट; आणि पंप मारूं
विषयलंपट !
ना तरी घेईल तो फटदिशीं पेट
अन् मग ? —साऱ्या संसाराची
होइल काळीकुट्ट हाय–हन्त–खल्लास
राख अन् डस्ट राख अन् डस्ट !

—प्रल्हाद केशव अत्रे


OFFICE SHIRTS
WITH "Trubenised" COLLAR
Excel
Rs. 13

अनुक्रमणिका



डाळिंबी साडींतील ती गोरीपान मुलगी व गरम सुटांतला तो उंच तरुण घाईनें 'डा' नंबरांच्या बसमधून उतरलीं, व बोरीबंदरच्या पायऱ्या चढून झपाट्यानें स्थानिक गाड्यांच्या फलाटाकडे चालूं लागलीं. सूचनाफलकावरील मोठ्या घड्याळांतला मिनिटकाटा तिळभर पुढें सरकून त्याच क्षणीं बाविसाव्या रेघेवर आला. दोन वाजून बावीस मिनिटें.

"पाहिलंस?" सूचना फलकासमोर थबकून ग्रे सुटांतला तो सावळा तरुण म्हणाला. "दोन वाजून बावीस मिनिटं. माझंच घड्याळ अगदीं बरोबर होतं. अगदीं मिनिट टु मिनिट!"

"होतं खरं." तिनें समोर धरलेल्या मनगटी घड्याळावरून दृष्टि फिरविल्यासारखें करीत ती म्हणाली.

"आणि तुझं घड्याळ?" कॉलर सारखी करीत त्यानें विचारलें.

"माझं पंधरा मिनिटं पुढं आहे." ती हसून म्हणाली.

"हॉटेलांतून निघण्याची घाई केलीस! माझ्या प्रश्नाचं उत्तर न देतांच उठलीस. सुभा, आतां मात्र तुला सांगायलाच पाहिजे!" आळवणीच्या स्वरांत तो म्हणाला.

"या इथें? या सूचना-फलकाच्या खालीं? पानविडीवाल्यांच्या साक्षीनें? How very unpoetic!" मिस्किल स्वरांत ती म्हणाली.

"मघां हॉटेलांतहि तूं अशीच टाळाटाळ केलीस. काय म्हणे गाडी चुकेल! काय म्हणे माझंच घड्याळ बरोबर आहे! चांगलीं आठ मिनिटं आहेत अजून कर्जत सुटायला. ह्या आठ मिनिटांत अठरा वेळां माझ्या प्रश्नाचं उत्तर तुला देतां आलं असतं!"

"ह्या आठ मिनिटांचा इथें दुसरा कांहीं तरी उपयोग आपण करूंया!" ती म्हणाली.

"पण आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर तर दे, सुभा. माझ्या वडलांना मीं सारं सांगितलं आहे. तुझ्या वडलांकडे कर्जतला हा मी असाच येतों. गेलीं दोन वर्षं मी वाट पहातों आहें!"

"मग आणखी आठदहा मिनिटं थांबेनास!"

"आणि मग?" त्यानें उत्कंठेनें विचारलें.

"तेवढ्यांत स्टॉलवर मी एखादं पुस्तक घेतें आणि मग आपण गाडींत जाऊन बसूं." ती शांतपणें म्हणाली.

"मी जवळ असतांना तुला पुस्तक कशाला पाहिजे, सुभद्रा?"

"तूं जवळ असलास तरी पुस्तकाचं काम तुला कसं करतां येईल, वसंत?" आपली सुंदर भुंवई वर करून तिनें विचारलें, व ती स्टॉलच्या दिशेनें चालूं लागली.

तिच्या मागोमाग तिरुपायानें जात तो कुरकुरला, "मघां हॉटेलांतहि तूं त्या महाभारताच्या पुस्तकांत डोकं खुपसून बसली होतीस. माझ्याशीं



पु. भा. भावे

**प्रथमच आज ती त्याच्याबरोबर जेवायला आली,**
**प्रथमच आज तो तिला इतका खेटून बसला,**
**प्रथमच त्यानें तिचे मऊ हात**
**आज आपल्या हातांत घेतले आणि**
**मग पुढें जें घडलें तें...**

मोकळेपणानें त्रोलायचं टाळत होतीस. तुझ्यासारख्या बी. ए. बी. टी झालेल्या मुलीनें अजून महाभारत वाचायचं म्हणजे—"

"बी. ए. बी. टी. झालेल्या मुलींना का रसिकता नसते? का त्यांना उत्तम ग्रंथ समजत नाहींत? मला फार आवडतं महाभारत! त्याचीं मला पुन्हा पुन्हा पारायणं करावींशीं वाटतात!"

तिच्या स्वरांत तीव्रता आलेली पाहून तो म्हणाला, "तसं चांगलं आहे महाभारत! त्याच्यांतलीं तीं द्रौपदीचीं दणदणीत भाषणं, विदुरेचीं भाषणं, त्या हाणामाऱ्या, तो उदार कर्ण, तो बळकट भीम, तो चतुर कृष्ण, तें मांड्या फोडणं आणि रक्त पिणं—आहे, भरपूर ड्रामा आहे—तुला आवडण्यासारखं पुस्तक आहे तें."

"कुणीहि जाणत्या माणसाला आवडायला पाहिजे." स्टॉलवर मांडून ठेवलेल्या पुस्तकांवरून दृष्टि फिरवीत सुभद्रा म्हणाली. "एखाद्या महासागरासारखा तो ग्रंथ आहे!"

"असेल, असेल." मान हलवीत वसंत म्हणाला. "पण तो ग्रंथ तुझ्या पिशवींत असतांना आतां आणखी पुस्तकं घेऊन तूं काय मिळवणार आहेस?"

"शें-दीडशें रुपयांसाठीं मास्तरकी करून तरी मी काय मिळवतें?" पुस्तकांच्या चवडी भराभर चाळीत सुभद्रा म्हणाली. "एरंडाचं गुऱ्हाळ फिरवीत बसण्याचाच धंदा कीं नाहीं? पुस्तकं वाचलीं म्हणजे त्या गुऱ्हाळांतून सुटल्यासारखं वाटतं—ओ हो! हें पाहिलंस Mutiny on the Bounty? हें पुस्तक वाचतांना मला वादळी दर्यावरच्या थंडगार खलाशाचं आयुष्य जगल्यासारखं वाटतं. आणि ही कॅप्टन स्कॉटची दैनंदिनी. ही मला मोठ्या उदात्त धैर्यानें मृत्यूला सामोरा होणाऱ्या स्कॉटच्या सहवासांत, बर्फानें खचलेल्या ध्रुव प्रदेशावर घेऊन जाते. अय्या! हें रोमेलचं चरित्र वाटतं? आणि हें ड्यूमाचं थ्री मस्केटिअर्स!"

"म्हणजे ॲथो, पॉर्थो आणि आरामीच कीं नाहीं? द्वंद्वयुद्ध, कारस्थान, विषप्रयोग, जिवाभावाचं प्रेम—जिवाभावाची मैत्री—"

"तेंच पुस्तक!" कांहीं पुस्तकं वेगळीं काढून सुभद्रा म्हणाली. "मला फार आवडतात अशीं पुस्तकं."

"हें पहा, सुभा," काकुळतीच्या स्वरांत वसंत म्हणाला. "अगदीं बोहोल्यावर तूं तीं पुस्तकं वाचत उभी राहिलीस तरी माझं कांहीं म्हणणं नाहीं. पण प्रथम माझ्या प्रश्नाचं उत्तर तर देशील? मी केव्हांपासून तुझ्या विनवण्या करतों आहें आणि तूं नुसती उडवाउडवी चालवीत आहेस. माझ्या आयुष्याचा हा प्रश्न आहे, सुभा!"

"आणि माझ्या आयुष्याचा नाहीं वाटतं? एवढ्या महत्त्वाच्या प्रश्नाचं उत्तर इतक्या घाईनं देऊन कसं चालेल?"

"पण आतां दोन वर्षं होऊन गेलीं आपल्या ओळखीलीं!" डाव्या हाताचीं दोन बोटें नाचवीत तो म्हणाला.

"कांहीं कांहीं माणसं तर दहा वर्षांपासून माझ्या ओळखीचीं आहेत." पंजे उभे करून दोन्ही हातांचीं दहा बोटें त्याला दाखवीत ती म्हणाली "आणि तरीसुद्धां त्यांना अजून मीं नीट ओळखलेलं नाहीं."

तिच्या नाजूक मऊ तळव्यांकडे लुब्ध दृष्टीनें पहात तो म्हणाला. "माझ्या प्रेमाचा कोणता पुरावा मी तुला देऊं म्हणजे तुझा विश्वास बसेल?"

"तुला जमेल तो पुरावा दे!" पुस्तकविक्रेत्यानें परत दिलेली मोड

पिशवींत टाकून ती म्हणाली. " पण ह्या बूटपॉलिशवाल्यासमोर आणि त्या शेवचिवडेवाल्यासमोर कांहीं नको. "

" पण सुभद्रा—"

" अय्या ! " मोठ्या घड्याळाकडे बोट दाखवून ती म्हणाली. " गाडी सुटायला एकच मिनिट राहिलं, चला लवकर ! " आणि पदर सावरून ती झपाझप फलाटाकडे चालूं लागली.

एंजिनबरोबर आपोआप ओढल्या जाणाऱ्या डब्याप्रमाणें तोहि तिच्या मागोमाग ओढला जात होता. त्यानें तिच्या हातांतलीं पुस्तकें दाक्षिण्य-बुद्धीनें आपल्या हातांत घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां ती म्हणाली, " नको. हीं पुस्तकं गणिताचीं असतीं तर तुझ्या हातांत दिलीं असतीं. "

तीं दोघें पहिल्या वर्गाच्या डब्यांत शिरलीं तेव्हां तो म्हणत होता, " पण मला नुसतीं गणिताचीं पुस्तकंच आवडतात ही तुझी कल्पना चूक आहे. मला कांहीं कांहीं कादंबऱ्यासुद्धां आवडतात. "

" एच. जी. वेल्सच्या आवडत असतील. " खिडकीशेजारची जागा घेत खट्याळ स्वरांत ती म्हणाली.

वेल्सचें नांव ऐकतांच तो गडबडला. एच. जी. वेल्स कोणता आणि सुम्नेर वेल्स कोणता हें त्याला नीटसें ठाऊक नव्हतें. वेल्स त्यानें मुळीं वाचलाच नव्हता. घोटाळून उभा रहात तो दडपून बोलला, " हो, हो ! वेल्ससुद्धां मला आवडतो. "

" आवडणारच ! " हातांतील पुस्तकें मांडीवर मांडत ती म्हणाली. " गणिताचं वाळवंट तुडवणं आणि वेल्स वाचणं सारखंच आहे, प्रोफेसरमहाशय ! "

आतां त्याच्या लक्षांत आलें कीं आपलें कांहीं तरी चुकलें. तो गोंधळला. तिच्या शेजारीं बसावें कीं तिच्यासमोर बसावें ह्याविषयीं त्याचा निश्चय होईना. पुष्कळदां तो तिला खेटून बसला कीं ती उठून पलीकडे बसत असे. पण हीं जुनी गोष्ट झाली. अलीकडे साधारणतः त्यानें फारच लगट केली नाहीं तर ती त्याला आपल्याजवळ बसूं देत असे. कधीं कधीं त्याच्यासमवेत बोलपटालाहि ती येऊं लागली होती. आज तर त्याच्याबरोबर ती बाहेर जेवायलाहि आली. अगदीं प्रथमच ! एकंदरींत त्यानें तिच्या विषयांत प्रगतीच केली होती. हळू हळू पण निश्चितपणें !

आणि ह्या विचारासरशीं तो तिच्या शेजारीं बसला. सव्वासरी वीतभर अंतर ठेवून. पण तें अंतरहि तोडण्याचा त्याचा विचार होता. गाडी हलूं लागण्याची तो वाट पहात होता. पण वेळ टळून गेली तरी अद्याप गाडी हलण्याचें चिन्ह दिसेना.

" सुभद्रा ! " इंचभर तिच्याजवळ सरकून तो म्हणाला. पण तिचें त्याच्याकडे लक्षच नव्हतें. हातांतल्या पुस्तकांत तिनें केव्हांच डोकं खुपसलें होतें.

" सुभद्रा ! " अर्धा इंच आणखी सरकून त्यानें हांक मारली.

" काय ? " दचकून तिनें विचारलें.

" अद्याप गाडी नाहीं सुटली ! " " लेट दिसते आहे. " तो म्हणाला.

" हं. " ती म्हणाली व आतां तिनें महाभारत काढलें. चारदोन क्षण तो थांबला व समोरच्या चिकूवाल्याकडे पाहून चुटक्या वाजवीत म्हणाला, " चिकू पाहिजे आहेत ? "

" नको. " मान वर न उचलतां ती म्हणाली.

तो आणखी चारदोन क्षण थांबला व म्हणाला, " गाडी नाहीं तरी फारच लेट होते आहे. "

तिनें कांहींच उत्तर केलें नाहीं. तिच्या मनगटाला चटकन बोट लावून तो म्हणाला, " तुझं तें जगावेगळं घड्याळ तरी बरोबर लावून घे ! "

तिनें डाव्या मांडीवरचें महाभारत उजव्या मांडीवर ठेवलें, पण ती त्याच्यापासून दूर मात्र सरकली नाहीं. शांतपणें ती म्हणाली, " माझं घड्याळ अगदीं जगाबरोबर चाललेलं मला नाहीं आवडत ! " आणि पुन्हा ती वाचूं लागली.

तो चुळबुळत राहिला व मग म्हणाला, " सुभद्रा—"

ती कांहींच बोलली नाहीं.

" सुभद्रा ! " जास्त जोरानें तो म्हणाला.

" काय ? " तिनें डोकें वर न उचलतां विचारलें.

" अशी वाचतच बसणार का तूं ? "

" मग काय करायचं ? "

" माझ्या प्रश्नाचं उत्तर द्यायचं . "

" जरा तिकडे पहा. " समोर बसलेल्या दोन लठ्ठ गुजराथ्यांकडे बोट दाखवीत ती म्हणाली.

" ते बहुतेक दादरला उतरतील. मग ?—"

" मग काय ? "

" मग सांगशील ? "

" पाहूं ! " ती म्हणाली व पुन्हा तिनें डोळ्यांसमोर पुस्तक धरलें.

" आज माझ्या दैवाचा सोक्षमोक्ष लागायलाच पाहिजे. " तो म्हणाला.

तिनें केवळ पुस्तकाचें पान पालटलें.

" बाबा अगदीं घाईला आले आहेत ! " तो पुढें सांगूं लागला. " ते म्हणतात, शिक्षण झालं, नोकरी लागली, आतां तुझं लग्न व्हायलाच पाहिजे, आमचे डोळे मिटण्यापूर्वी. "

तिनें कांहींच उत्तर केलें नाहीं.

" माझ्या तपश्चर्येचें फळ मला आतां नको का मिळायला ? " त्यानें पुसलें.

" तो समोरचा गुजराथी—" ती सांगूं लागली. " मघां फिरत्या दारांत मला धक्का मारून गेला ! "

" चुकून लागला असेल ! "

" ती चूक नव्हती. "

" कशावरून ? "

" आम्हांला कळतं ! "

" तर मग काय त्याच्याशीं द्वंद्वयुद्ध खेळूं म्हणतेस कादंबरींतल्या शिलेदारासारखं ? "

समाज-विकास-योजना : : प्रार्थना



कमींत कमी त्रेसष्ट इंच पाऊस पडला पाहिजे !



अनुक्रमणिका

“ खेळ !”

“ अशानं पावलोपावलीं आणि प्रत्येक दिवशीं ह्या मुंबईत मारामाऱ्या कराव्या लागतील.”

“ काय चिंता आहे ?”

कादंबरींत कांहीं चिंता नाहीं. पण आजकालच्या जगांत एवढं धैमाल नांव्ह पचायचं नाहीं. असे रोमांचकारी प्रसंग सध्या बहुतेक आढळांत येत नाहींत.”

“समजलं.” ती झटक्यानें म्हणाली व त्यानें अर्ध्या वितीवर आणून ठेवलेलें त्यांच्यांतलें अंतर तिनें पुन्हा दीड वितीवर नेऊन ठेवलें.

“ रागावूं नकोस.” अवसानानें उठून उभा राहात तो म्हणाला. “ वाटेल तर आत्तां त्या गुजराथ्याच्या पोटावर गुद्दा मारून येतों.”

“ खरंच मारशील ?” तिनें विचारलें.

“ खरंच मारीन.” तो मूट हलवीत म्हणाला व त्याच क्षणीं धक्का घेऊन गाडी चालू झाली. त्या धक्क्यानें त्याला अकस्मात् बसतें केलें, अगदीं तिच्यापासून चार बोटांवर. अस्तन्या सावरून त्यानें पुन्हा उठण्याचा आव आणला. तेव्हां हसून ती म्हणाली, “ बरं, राहूं दे सध्या.” आणि पुन्हा ती पुस्तक वाचण्यांत गढून गेली. भायखळ्याच्या टप्प्यावर गाडी थांबली तेव्हां त्यानें तिच्या-त्याच्यांतलें अंतर दोनच बोटांवर आणून ठेवलें होतें. तिनें दूर सरकण्याचा प्रयत्न केला नाहीं. हा शकुन त्याला चांगला वाटला.

“ सुभद्रा—” तो म्हणाला.

ती आपली वाचतच होती.

“ सुभद्रा—सुभद्रा !” वारंवार होणाऱ्या तिच्या स्पर्शानें रोमांचित होऊन कांपऱ्या स्वरांत तो पुन्हा म्हणाला—आणि दादरचें ठाणें आलें. थोडा गलका झाला. गाडींत गर्दीची चढउतर झाली. त्यांच्या डब्यांत कोणीच आलें नाहीं. त्यानें अपेक्षेनें समोरच्या गुजराथ्यांकडे पाहिलें. पण ते जागचे हलले नाहींत. ती आपली वाचतच होती.

“ सुभद्रा—”

“ काय म्हणतोस ?” तिनें डोळे वटारले.

“ नाहीं—म्हटलं, सफरचंदं पाहिजेत का ?”

“ नकोत.” तिनें पुन्हा पुस्तकावर डोळे लावले.

“समज, हीं सफरचंदं टाहिटी बेटांतल्या रानांत उगवलीं असतीं—”

तो म्हणाला. “आणि तीं मीं बाणावर झेलून तुला दिलीं असतीं तर ?” “तर तीं मीं घेतलीं असतीं !” ती म्हणाली. “आतां गप्प बस बरं !”

“हॉटेलांत तूं मला बोलूं दिलं नाहींस. जुहूला बोलूं दिलं नाहींस. नुसतं जेवण्यासाठीं आणि भटकण्यासाठीं आज मी तुला बरोबर आणलं नव्हतं.”

“ तूं मला कशासाठीं बरोबर आणलंस तें ठाऊक आहे मला.” मान तिरकी करून ती म्हणाली व वाचतच राहिली.

माटुंगा गेलें, शीव गेलें, कुर्ला गेलें आणि घाटकोपरला गाडी अचानक थांबल्यामुळें कर्जत गाडींत चुकून शिरलेले ते दोन गुजराथीहि गेले. तिचा स्पर्श त्याला आतां चांगलाच चढला होता.

“ सुभद्रा—” कांपऱ्या स्वरांत तो म्हणाला, “ सुभा-शुभा-सुभद्रा—”

तिच्या चेहऱ्यावर स्मिताच्या पुसट खुणा उमटल्या. जणुं पुस्तकांतल्या एखाद्या प्रसंगानें तिला हसविलें होतें. गाडीच्या एका धक्क्यानें तिच्या-त्याच्यांतलें अंतर पूर्णपणें नाहींसें झालें. सारख्या होत राहणाऱ्या त्या

ओझरल्या स्पर्शानें झिंगून घोगऱ्या स्वरांत तो म्हणाला, " सुभद्रा !" आणि त्यानें तिचा खांदा हलविला.

तिनें हातांतलें पुस्तक खालीं ठेवलें, डोळे खूप वटारले व ती म्हणाली, " तूं मला स्वस्थपणें वाचूं देणार आहेस कीं नाहीं ?"

"नाहीं." कोडगेपणानें तो म्हणाला. तिनें पुन्हा डोळे वटारले, स्वर चढविला, त्याच्यापासून दूर सरकल्यासारखें केलें, पण ती खरोखरी त्याच्यापासून दूरहि झाली नाहीं किंवा तिनें जागाहि पालटली नाहीं, हें त्याच्या ध्यानांत आलें होतें. वाढत्या धुष्टयानें तो म्हणाला, "आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर दे. आज माझ्या प्रश्नाचं उत्तर तुला द्यायलाच पाहिजे, सुभद्रा."

शांतपणें तिनें हातांतलें पुस्तक मिटलें, मांडीवर ठेवलें व चेहरा तटस्थ केला.

"बोल!" ती म्हणाली.

"अशी रागावूं नकोस." तो म्हणाला. "आणखी किती दिवस तूं अशी टाळाटाळ करणार? माझ्या वडलांसाठीं तरी मला आतां लग्न करायलाच पाहिजे."

"वडलांसाठीं? स्वतःसाठीं नव्हे?" ती म्हणाली. "वडील पिढीविषयीं तुला फार आदर दिसतो!"

"थट्टेची गोष्ट नाहीं." तो म्हणाला. पण "वडलांचं आतां वय होत आलं आहे—"

"शिवाय त्यांची थोडी इस्टेटहि आहे!" ती म्हणाली.

"मग थोडक्यांसाठीं त्यांना कां दुखवायचं? एवींतेवीं केव्हां तरी मला लग्न करायचंच आहे."

" एवढ्याचसाठीं तूं माझ्याशीं लग्न करणार ? "

" तसं तऱ्हे—" विनवणीच्या स्वरांत तो म्हणाला. "मला तूं आवडतेस्‌-सुद्धां. फार फार आवडतेस. माझ्यांत तुला कांहीं उणेपणा दिसतो का ?"

" उणेपणा कशानं ? " ती त्याला आपादमस्तक न्याहाळीत म्हणाली. " चांगला उंचानिंच आहेस—"

" आतां कादंबरींतल्या शिलेदारासारखं मला वागतां येत नाहीं. हें खरं आहे, पण—"

" पण तुला चाकरी आहे, पगार मिळवतोस, व्यवहार तुला चांगला कळतो—"

" माझ्यांत नाट्य एकंदरींतच कमी आहे हें मी मान्य करतों. पण आजकालच्या ह्या जगांतच एकंदरांत नाट्य कमी आहे. मुंबईचं आयुष्य तर अगदींच टरीव आहे. इथें नाट्याचा फारसा उपयोग नाहीं. इथें नाट्य फारसं आढळतच नाहीं. "

" आढळत असलं तरी तें कुणी पहात नाहीं. "

" लग्न झालं म्हणजे तुझ्या डोळ्यांनीं मी तें पाहीन. " तो म्हणाला,

" अगदीं खोटं ! " ती म्हणाली.

" मुळींच खोटं नाहीं. " तो म्हणाला. " मी व्यवहारी आहें हें खरं, पण आजकालच्या जगांत तसंच असावं लागतं. व्यवहारी असणं हें काय मोठं पाप आहे ?"

" पुण्य आहे. " ती म्हणाली. " ह्या तुझ्या पुण्याईवर प्रसन्न होऊन कोणताहि व्यवहारी बाप तुला आपली मुलगी देईल. "

" पण मला तूं पाहिजे आहेस. माझं रूप तुझ्याइतकं चांगलं नाहीं हं

खरं आहे." आत्मपरीक्षणाच्या स्वरांत तो म्हणाला.

"पण पुरुषाला एवढं रूप पुरतं!" ती हसून म्हणाली.

"तुला टाकच आहे, विद्यार्थ्यांसाठीं मीं कांहीं टिपणांचीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. त्या पुस्तकांचे मला बरे पैसे मिळाले आहेत. ते सगळे पैसे मीं वांचवले आहेत."

"शिवाय वडलांची थोडी संपत्ति आहेच!" वर फिरणाऱ्या पंख्याकडे पहात ती म्हणाली.

"ही थट्टेची गोष्ट नाहीं." तो म्हणाला. "तुला मागणी घालण्यापूर्वीच मीं माझी आर्थिक बाजू बळकट करून ठेवली आहे."

"तूं मोठा चतुर आहेस," ती म्हणाली. "शिकलेला आहेस, शहाणा आहेस, तरुण आहेस, दिसण्यांतहि बरा आहेस. कोणत्याहि सुज्ञ मुलीला तुझ्या मागणीला होकार द्यावासा वाटेल!"

"पण तुला काय वाटतं?" उतावीळ स्वरांत त्यानें विचारलें.

"कांहीं समजत नाहीं." ती गंभीरपणें म्हणाली.

"मी तुला आवडत नाहीं का?" श्वास रोखून त्यानें विचारलें.

"तसंच कांहीं नाहीं." जणुं स्वतःच्या मनाचा ठाव घेत ती म्हणाली. "एखाद्या गणिताचं उत्तर शोधण्यासाठीं झटावं तसा तूं गेलीं दोन वर्षं माझ्यासाठीं झटतो आहेस. तुझी बुद्धि चांगली आहे, तुझं रूप चांगलं आहे, पण—"

"पण काय?"

"पण तुझ्यामाझ्या आवडीनावडींत बरंच अंतर आहे. आपले पिंडच वेगळे आहेत."

"आवडीनावडी अगदीं सारख्या असण्याचं कांहींच कारण नाहीं." तो बुद्धिवाद करीत म्हणाला. "कोणत्याहि दोन माणसांचे पिंड आणि सगळ्या आवडीनावडी सारख्या नसतातच मुळीं. तूं मला तुझं नाट्य शिकव, मी तुला माझं गणित शिकवीन. आपलं अगदीं छान जमेल."

"तरी पण—" ती म्हणाली.

"तरी पण काय?" त्यानें विचारलें. "माझ्याविषयीं तुला नावड वाटते काय?" तिला अधिकच खेटून तो म्हणाला. ह्या वेळीं ती दूरहि सरली नाहीं अथवा तिनें डोळेहि वटारले नाहींत.

विचारी मुद्रेनें ती म्हणाली, "नावड वाटत नाहीं, पण आवडीचा उमाळाहि वाटत नाहीं!"

"कादंबरींतल्यासारखा!" तो उपहासानं म्हणाला. "हें पहा, सुभा, त्या उमाळ्याशिवाय मी चालवून घेईन. तूं माझ्याशीं लग्न तर कर. आपलं अगदीं छान जमेल पहा. लग्न झाल्याबरोबर आपण काश्मीरला जाऊं. अगदीं एका सवंत्र डब्यांत केवळ दोघंच जाऊं. मधुचंद्रासाठीं मीं वेगळे पैसे काढून ठेवले आहेत. तूं नुसतं हो तर म्हण. आज—आत्तां—" हेंच त्यानें तिच्या हातावर हात ठेवला. तिनें अगदीं थोडा प्रतिकार केला. त्याचें हृदय होकाराच्या निश्चितीनें फुलून आलें. तिचा हात दाबून तो म्हणाला, "लग्नांत थोडाबहुत जुगार खेळावाच लागतो. पण मी तुला सांगतों, कीं आपलं चांगलं जमेल. तुझ्या साऱ्या आवडीनिवडी मी संभाळीन. तुला कोणतंहि दुःख कधीं देणार नाहीं.—मग सुभा?—"

बाहेर एकाएकीं हस्ताची सर धावत गेली. काळेनिळे ढग डोंगराला टेकले. सारें रान पावसानें न्हाऊन निघालें. मग पांगलेल्या ढगांतून कोवळा सूर्यप्रकाश झिरपत राहिला. डोंगर, खाडी, रानें—सारीं त्या जादूच्या प्रकाशानें रंगून गेलीं. त्या देखाव्याकडे पहात सुभद्रा म्हणाली, "किती सुंदर देखावा आहे!"

"लग्न झाल्यावर ह्याच्याहिपेक्षां सुंदर देखावे पहायला आपण जाऊं."

"कुठं?"

"टाहिटी—बाली—सामोआ!" तो उत्साहानें सांगूं लागला. "अरण्य, ब्रेडफ्रूटच्या झाडाखालीं गाणीं म्हणूं. मी धनुष्यबाणानें फळें पाडीन. रानमाणसांना द्वंद्वयुद्धाचं आव्हान देईन. डोंगर, रानं, समुद्रकांठ तुडवत दिवसभर आपण रानोमाळ भटकूं, आणि रात्रीं हिरव्यागार तृणाच्या गवतावर पूर्णचंद्राखालीं झोंपीं जाऊं."

"खरंच?"

"खरंच!" तिच्या लांबसडक बोटांशीं चाळा करीत तो म्हणाला. "तूं केवळ हो म्हण."

"मला कांहीं कळेनासं झालं आहे, वसंत."

"पण मी विचारतों, आतां अडचण कोणती आहे? मला तर कांहींच दिसत नाहीं!"





अनुक्रमणिका

त्यानें तिचा दुसराहि हात आपल्या हातांत घेतला व तो तिच्या चेहऱ्याकडे अनिमिषपणें पाहूं लागला. तिचा चेहरा किंचित् लिखट पण फारच सुंदर दिसत होता. हें सौंदर्य जवळजवळ आतां त्याचें झाल्यासारखेंच होतें. अर्धी लढाई त्यानें जिंकल्यासारखीच होती. आज तिचें मन अगदीं डळमळीत झालें होतें. होकार देण्याच्या अगदीं बेतांत आलें होतें. होकार होकार तरी काय वेगळा असतो ? आजवर कधीं घडलें नव्हतें तें सारें आज घडलें. प्रथमच आज ती त्याच्याबरोबर जेवायला आली, प्रथमच आज तो तिला इतका खेटून बसला, प्रथमच त्यानें तिचे मऊ हात आज आपल्या हातांत घेतले. तो यशस्वी झाल्यासारखाच होता ! ही शिकलेली, मिळवती, पाऱ्यासारखी चमकदार मुलगी ह्यापुढें त्याचीच होती ! अभिमानानें, आत्मसंतोषानें, विजयाच्या गर्वानें तो तिच्या चेहऱ्याकडे पहात राहिला. अनेक देखाव्यांतून तिचा चेहरा फिरत असलेला त्यानें पाहिला...

...ती त्याच्या गळ्यांत लग्नमाळ घालीत होती ...त्याचे सहकारी तिच्या सौंदर्याकडे कांहींशा कौतुकानें, कांहींशा मत्सरानें पाहून त्याच्या कर्तृत्वाविषयीं त्याचं अभिनंदन करीत होते...चेकबुकांचीं पानें फडफड होतीं व बॅंकबुकांतील आंकड्यांचा गुणाकार चालू होता...टाहिटी—बाली—साव्हो... गर्जना करणाऱ्या सिंहाच्या तोंडावर तो बंदूक झाडत होता व त्या बंदुकींत सोन्याचीं नाणीं भरलेलीं होतीं...आफ्रिकन रानमाणसांवर तो तिरंदाजी करीत होता व त्याचे बाण शंभराच्या निळ्या नोटांनीं मढवलेले होते...तो व सुभद्रा रानोमाळ—आफ्रिकेच्या निबिड रानांतून भटकत असतांनाच एका दगडावर तो ठेंचाळला—आणि त्या दगडाखालींच हिऱ्यांची एक खाण होती...

"सुभद्रा !" तो म्हणाला.

"काय वसंत ?" तिच्या स्वरांत किंचित् कंप होता व तिची दृष्टि कुठें तरी लांब दरळत होती.

...डोळे दिपविणाऱ्या हिमशुभ्र ध्रुव प्रदेशांत—सुंदर नृत्यमय बाली द्वीपांतून—टाहिटी—कांगो—आणि काप्रीवरून—निबिड रानांतून—अफाट सागरांवरून—वीरपुरुषांच्या पुण्य स्मृतींनीं गजबजलेल्या भारताच्या विस्तीर्ण व प्राचीन भूखंडावरून...गोपुरें आणि मंदिरें...धूप—दीप—आणि घंटानाद...प्रसन्नतेनें सुभद्रेचें हृदय भरून जात होतें.

"सुभद्रा—" तिच्या कानांवर शब्द आले व तिची समाधि चाळवली. "माझ्या प्रश्नाचं उत्तर ?"

"तुझ्या प्रश्नाचं उत्तर ?" तिनें विचारलें.

"हो—तुझ्या तोंडून ते शब्द मला ऐकायचे आहेत, सुभा !"

सुभद्रेनें दृष्टि वर उचलली. वसंत एकाग्रतेनें तिजकडे पहात होता. अस्वस्थपणें तिनें वेणीशीं चाळा केला, हातांतल्या घड्याळाशीं चाळा केला, गळ्यांतल्या सोन्याच्या सांखळीशीं चाळा केला. तिचे ओठ प्रथम नुसतेच हलले व मग ती म्हणाली, "वसंत !"

तो तिला अधिकच खेटून बसला. तिचे हात त्यानें अधिकच दाबले व तो म्हणाला, "बोल, सुभा ! उत्तर दे—"

—आणि अकस्मात् ऐन रानांत गाडी थांबली. गलका झाला. धुराचा लोट त्यांच्या डब्यांत शिरला.

"आग—आग—" बाहेर अनेक लोक ओरडत होते..."अहो—डबा पेटला—डबा..."

सुभाचे हात त्यानें केव्हां सोडले तें त्याला कळलेंहि नाहीं. तो ताडकन् उठला, त्यानें दरवाजा गांठला, खालीं उडी टाकली व तो सरळ पळत सुटला. एक डबा—दुसरा डबा—तिसरा डबा—आणि मग वसंत थांबला. त्यानें वळून पाहिलें, एका डब्यांतून धूर येत होता. शेजारच्या डब्याचें दारहि त्या धुरांत अस्पष्ट दिसत होतें—आणि त्या दारांत स्थिरपणें एक मुलगी उभी होती. जणुं ती विरळ मलमली पडद्याच्या वेष्टनांत मजेनें उभी राहिली होती—सुभद्रा !

जागा झालेल्या वसंतच्या मनानें त्याला सांगितलें, 'सुभद्रा !'

घाईघाईनें वसंत परत फिरला. खडीवरून त्याचे पाय निसटत होते. त्याच्या कपाळावर घाम आला होता. डब्याच्या दारांत एखाद्या सुंदर पुतळीसारखी सुभद्रा उभी होती. धूर कमी होत होता. खोकत व धापा टाकत खालूनच वसंतनें तिला विचारलें, "सुभद्रा ! तुझं सगळं ठीक आहे ना ?"

"माझं सगळं ठीक आहे." सुभद्रा तीव्र स्वरांत म्हणाली. "पण तुझं मात्र तितकंसं ठीक नाहीं !"

"म्हणजे ?" वसंतनें विचारलें. सुभद्रेच्या स्वरांत आतां थोडाहि कंप नव्हता. स्नेहाचा तर लवलेश नव्हता.

"तुला तुझ्या प्रश्नाचं उत्तर पाहिजे होतं ना, वसंत ?"

"हो—हो—" डब्याच्या पायरीवर पाय देऊन वसंत म्हणाला.

"तें उत्तर नकारार्थी आहे." कठोर स्वरांत सुभद्रा म्हणाली. "मला तुझ्याशीं लग्न करतां येणार नाहीं."

"अग—पण कां ? येवढ्यांत असं झालं तरी काय ?"

"तेंहि तुला समजलं नाहीं ?" तुच्छतेच्या स्वरांत सुभद्रा म्हणाली. "माझा हात तुझ्या हातांत असतां मला सोडून तूं पळून गेलास ? माझी आठवण तुला राहिली नाहीं ? मला वांचवण्याऐवजीं स्वतःला वांचवण्यासाठीं पळत सुटण्याचा विचार तुला पहिल्या प्रथम सुचला ?"

"अग—पण जरा माझं ऐकशील तर ? तें सगळं अगदीं मला नकळत झालं. Unconsciously झालं. तुला पहायला मी परत आलों कीं नाहीं ?" डब्याचा दांडा धरून वर चढण्याचा प्रयत्न करीत वसंत म्हणाला.

"ह्या डब्यांत आतां तूं येऊं नकोस, वसंत !" ताठपणें दारांत उभी राहून सुभद्रा म्हणाली. "नाहीं तर मला हा डबा सोडावा लागेल."

"अग—पण सुभा—" वसंत काकुळतीनें म्हणाला. "गोष्ट केवढी आणि तूं त्याला स्वरूप केवढं dramatic देते आहेस !"

"ड्रामा शोधायला आफ्रिकेंत किंवा टाहिटींत जावं लागत नाहीं !" थंडगार स्वरांत सुभद्रा म्हणाली. "पुष्कळदां तें मुंबईंतसुद्धां सांपडतं." आणि ती हसूं लागली. तिच्या स्वरांत आणि तिच्या हसण्यांत एवढी तुच्छता होती, इतकी कटुता होती, कीं गारठल्यासारखा वसंत तिच्याकडे नुसता पहातच राहिला.

Cadbury-Fry

# भारतांत कॅडबरी-फ्राय

### कॅडबरीचा बोर्न-विटा




हें मुलें, मोठीं माणसें आणि इतर सर्वांसाठींही शक्तिवर्धक अन्न-पेय आहे. त्याच्या स्वादिष्ट व शक्तिदायी गुणांमुळें तुम्हांला तो खास आवडेल.

### कॅडबरीचा बोर्नविल कोको




वाढीस लागलेल्या मुलांना आवश्यक शक्तीचा पुरवठा करतो. त्याच्या चॉकलेटसारख्या स्वादामुळें मुलें तो फार हौसेनें घेतात.

### …बरीचें रेड लेबल ड्रिंकिंग चॉकलेट

हें एक शर्करायुक्त उत्कृष्ट पेय आहे. सहज तयार करतां येतें व पिण्यास रुचकर लागतें.




### फ्रायचा ब्रेकफस्ट कोको.




अल्प मोली असून अत्यंत स्वादिष्ट कौटुंबिक अन्न-पेय आहे. त्यापासून रुचकर केक व पुडिंगही बनवितां येतात.

### कॅडबरीचें डेरी मिल्क चॉकलेट

उत्कृष्ट दर्जासाठीं जागतिक प्रसिद्धी पावलेलें असून प्रत्येक ½ रत्तलांत १½ ग्लास संपूर्ण मलईयुक्त दूध असतें.




CFY-15 MAR







## तुझा धर्म तुझ्यापाशीं

आम्ही सर्व भाऊ भाऊ
भाऊबंदकीच्या रीती
उभारिल्या मानवानें
देवधर्मांच्या या भिंती

" वस्तूमाजी देव कैसा ? "
म्हणा भलेही चिडून
देव नाहीं ज्या वस्तूंत
तिला कैसें वस्तूपण ?

कुणा तरी श्रद्धेयाचें
मनीं धरितां तें ध्यान
उभें मूर्तिमंत पुढें
नच निराकारी तन

निराकारांत साकार
ऐसें आंत सांगे मन
आणि बाहेरूनी चाले
निराकाराचें चिंतन

स्थिराचरांमाजी देव
ऐसा महान प्रतापी
सर्वव्यापी देव कैसा
केला तुम्हीं उपद्व्यापी ?

आम्हां वैदिकांचा धर्म
उभारिला त्यागावरी
आणि तुम्ही मात्र उभे
स्वार्थ आणि भोगावरी

संगीताच्या मिषें तुम्ही
सामवेद आळविला
आत्मानंद चाखूनीही
नच आत्मा ओलावला

आम्हीं सोशिला जुलमु
आणि अन्यायांच्या राशी
बोले सहनशीलता
" तुझा धर्म तुझ्यापाशीं ! "

—सोपानदेव चौधरी



अनुक्रमणिका



प्रत्येक घटनेला कांहीं तरी कारण असतंच
हें सिद्ध करण्याची शास्त्रज्ञांची
किती धडपड चालली आहे,
हें खरं; पण या धडपडींत माणसाला
कधीं संपूर्ण यश मिळेल काय ?

# कां य हा
# यो गा यो ग !

अ नं त  का णे क र

योगायोगाच्या कांहीं गोष्टी मीं सांगाव्या असं मला सांगण्यांत आलं तेव्हां मला एकदम आमच्या गणूकाकांची आठवण झाली. त्यांच्या तोंडांत हा योगायोग शब्द नेहमीं येतो. कोणतीहि गोष्ट सांगतांना ते मुळीं सुरुवातच 'योगायोग काय पहा,' अशी करतात ! जगांत जें कहीं घडतं तें सर्वच योगायोगामुळें घडतं असं त्यांचं ठाम मत आहे. सर्व कांहीं कर्ता-करविता ईश्वर आहे अशी त्यांची त्रालंबाल खात्री असल्यामुळें, जें जें कांहीं होतं तें त्याच्या इच्छेनेंच होतं असं त्यांना वाटतं आणि ते म्हणतात, 'तसा योगायोगच होता मुळीं !' पण असं म्हणतांना आपण एक वदतोव्याघात करतों आहोंत—एकाच वेळीं एकमेकांना रद्दबातल करून टाकणारीं विधानं करतों आहोंत, हें त्यांच्या ध्यानीं येत नाहीं. योगायोग असं आपण केव्हां म्हणतों? जेव्हां त्या त्या घटनेचं तर्कशुद्ध कारण देतां येत नाहीं तेव्हां, जेव्हां असं कां घडलं तें सांगतां येत नाहीं तेव्हां. असं जर आहे, तर मग परमेश्वराच्या इच्छेमुळें अमुक अमुक घडलं असं स्पष्ट कारण दिल्यावर त्यांत योगायोग तो काय उरला ?

गणूकाकांच्यासारखे जे निर्भेळ देववादी किंवा दैववादी आहेत त्यांची गोष्ट सोडून दिली तर जगांतल्या बऱ्याचशा गोष्टींची कारणमीमांसा करतां येते, बहुतेक कार्यांचं कारण दाखवून कार्यकारणभाव प्रस्थापित करतां येतो. म्हणूनच एखाद्या घटनेची कारणमीमांसा करतां आली नाहीं किंवा अगदींच क्षुल्लक कारणानें कांहीं तरी प्रचंड कार्य घडलं म्हणजे आपण 'काय बुवा योगायोग तरी !' असं कांहीं तरी उद्गारतों ! अनपेक्षितपणें किंवा कल्पना नसतांना एखादी चांगली गोष्ट घडली म्हणजे 'योगायोग' हा शब्द वापरतों; तशाच परिस्थितींत पण वाईट गोष्ट घडली म्हणजे 'दैवगति' असं म्हणतों. दैवगति हाहि एक योगायोगाचा प्रकार, दुसरं काय ? एखादे दिवशीं आपण एखाद्या मित्राला भेटायला जावं असा विचार मनांत आणतों, तोंच तो मित्र दत्त म्हणून दाराशीं येऊन उभा राहतो; किंवा एखादा गरीब कारकून आपणाला कधीं इंग्लंड-अमेरिका पहायला मिळेल का असं सुखस्वप्न मनांत घोळवीत असतो आणि सर्वांना सोडून, त्यालाच एखादे दिवशीं साहेब विचारतो, माझ्याबरोबर तूं विलायतेला येतोस का ?—मला एका कारकुनाची फार जरुरी आहे !—हे झाले योगायोग. दैवगतीच्या किंवा वाईट योगायोगाच्याहि अशा कांहीं नेहमींच्या अनुभवांतल्या गोष्टी सांगतां येतील. मला एका वैमानिकाची गोष्ट माहीत आहे. त्याचा एक जोडीदार आजारी पडला. त्याची जागा घेण्याची पाळी दुसऱ्याचीच होती. तो जायला तयारहि झाला पण हा तरुण, आपली पाळी नसतांनाहि पुढें होऊन म्हणाला, 'मी जातों, तूं घे स्वस्थ विश्रांति.' आणि त्याच दिवशीं बिमानाला अपघात होऊन तो त्यांत ठार झाला. जणुं काय, मृत्यूशीं त्याचा संकेत—अपॉइन्टमेंट ठरली होती. आणि ती पाळल्याशिवाय त्याला रहावत नव्हतं. 'तुकाराम' बोट बुडाली, त्या वेळची अशीच एक गोष्ट मीं ऐकली आहे. दोन्ही प्रकारचे योगायोग त्या गोष्टींत आहेत. पंचवीस वर्षांच्या बोटकंपनीच्या आपल्या नोकरींत 'तुकाराम' बोटीच्या कप्ताननें एक दिवसहि कधीं रजा घेतली नव्हती म्हणतात. ज्या दिवशीं बोट बुडाली त्या दिवशीं क्षुल्लक आजाराच्या निमित्तानें रजा घेतली, आणि तो बचावला. हा झाला योगायोग. आणि त्याच्या जागीं बदली म्हणून त्या दिवशीं जो कप्तान गेला आणि बुडाला त्याची दैवगति, दुसरं काय ? तोहि योगायोगच !

क्षुल्लक कारणानें कांहीं प्रचंड घडामोडी झाल्या तरीहि आपण पुष्कळ वेळां योगायोगच म्हणतों. क्लिओपात्राच्या अलौकिक सौंदर्यामुळें सीझर, अँटनी यांच्यासारखे वीरश्रेष्ठ पागल झाले आणि त्यामुळें मोठीं युद्धं आणि प्रचंड ऐतिहासिक घडामोडी झाल्या. कुणीसं म्हटलं आहे कीं, या क्लिओपात्राचं नाक अर्ध्या इंचानें लांब असतं तर इतिहास वेगळाच झाला असता ! म्हणजे ती जर इतकी सुंदर नसती तर हे इतिहास घडवणारे पुरुष पागल झाले नसते आणि पुढल्या घडामोडी टळल्या असत्या. दुसरी एक राजाची गोष्ट सांगतात. युद्धावर निघतांना त्याच्या घोड्याच्या नालेंतला एक खिळा निखळला. तो व्यवस्थित लावण्याचा राजानें आळस केला. पुढें युद्धाला

तोंड लागलं तेव्हां घोड्याचा नाल निखळून पडला. नाल गेल्यामुळें घोडा पडला. घोड्यामुळें राजा खालीं आला. राजा पडलेला पाहून त्याचं सैन्य सैरावैरा पळूं लागलं. राजाचा युद्धांत पराजय झाला. एका खिळ्यामुळें युद्ध हातचं गेलं ! काय योगायोग !

एखादं स्वप्न खरं झालं म्हणजेहि 'काय योगायोग' ! असे उद्‌गार तोंडावाटे बाहेर पडतात. आपल्या एखाद्या मित्राचं लग्न ठरलंय आणि आपण त्याच्या लग्नाला जाण्याची तयारी करतों आहोंत असं स्वप्न सकाळीं पडावं आणि दुपारीं पोस्टाच्या शिपायानें त्या मित्राचं, 'माझं लग्न ठरलंय्—तूं आलंच पाहिजेस !' अशा अर्थाचं पत्रं आणून द्यावं. काय विलक्षण योगायोग, असं आपण म्हणतों.

जेव्हां आपली मति चालत नाहीं, जेव्हां तर्कशुद्ध कारण देतां येत नाहीं, तेव्हां आपण आश्चर्यचकित होऊन 'काय योगायोग !' असं म्हणतों. आपल्या मनांत मित्राला भेटण्याचा विचार येऊन तो आपणाला भेटायला यावा; किंवा तिकडे आपल्या मित्राचं लग्न ठरावं आणि इकडे आपणाला स्वप्नांत ती गोष्ट दिसावी; या घटनांचा परस्परसंबंध कांहीं दाखवतां येत नाहीं, कार्यकारणभाव सांगतां येत नाहीं. पण माणसाला कारण शोधून काढल्याशिवाय चैन पडत नाहीं. त्याच्या या जिज्ञासेंतच त्याच्या प्रगतीचं बीज आहे. या जिज्ञासेमुळेंच विज्ञानाचा विकास झाला आहे. सामान्य मनुष्य योगायोग किंवा दैवगति म्हणून स्वस्थ बसतो. फार तर परमेश्वराची इच्छा किंवा भूतचेष्टा म्हणून योगायोगाची वासलात लावतो. पण शास्त्रज्ञ इतक्या सहजपणें स्वस्थ बसूं शकत नाहीं. तो तर्काला पटेल असं या योगायोग वाटणाऱ्या घटनांचंहि कारण शोधण्याचा प्रयत्न करीत असतो. अशा कांहीं प्रयत्नांची माहिती तुम्हांला उद्बोधक वाटेल याबद्दल माझी खात्री आहे. माझ्या मनांत विचार येतो तसाच माझ्या मित्राच्या येतो, यांत केवळ योगायोग नसून विचारसंक्रमणाचं किंवा टेलिपथीचं शास्त्र आहे काय किंवा कांहीं स्वप्नं खरीं होतात, पुढें होणारं आधींच दिसतं म्हणजे भविष्यकाळाचा पट विणून अगोदरच तयार असतो, बहुतेकांना तो दिसत नसला तरी कांहींना दिसतो. म्हणजे 'काळ' हा पदार्थ तरी काय आहे किंवा कांहीं लोक तुमच्या मनांतला विचार सांगूं शकतात म्हणजे अंतर्ज्ञान किंवा क्लेअरव्हॉयन्स अशी कांहीं शक्ति माणसाला आहे कीं काय वगैरे प्रश्नांचा कांहीं शास्त्रज्ञ कसून विचार करीत आहेत. त्यांना फारसं यश अजून आलेलं नाहीं, पण त्यांचे प्रयोग खूपच मनोरंजक आहेत. लंडन युनिव्हर्सिटीचं 'कौन्सिल ऑफ् सायकिकल रीसर्च' नांवाचं स्वतंत्र खातं आहे. आणि त्यांत कांहीं नामांकित विद्वान् काम करीत आहेत.

मघाशीं स्वप्नांत भविष्यकाळाचं दर्शन होऊं शकतं काय, या प्रश्नाचा मीं उल्लेख केला होता. या प्रश्नावर मि. जे. डब्ल्यू डन् नांवाच्या एक विद्वानानें 'ॲन् एक्सपेरिमेंट् विथ् टाइम्' नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. यांत त्यानें काळासंबंधीं एक नवीनच सिद्धान्त मांडला आहे. या विषयावर प्रयोग करण्याची प्रेरणा डन्‌ला, त्याला पडलेलीं कांहीं स्वप्नं खरीं झाल्यामुळेंच झाली. एकदोनदां असं झाल्याबरोबर डन्‌नें स्वप्न पडल्याबरोबर तें तसंच्यातसं तपशीलवार लिहून ठेवण्याचं तंत्र बसवलं. सवयीनें, स्वप्नं पडल्याबरोबर तो जागा होऊं लागला, आणि स्वप्नांची स्मृति अगदीं ताजी आहे तोंच तें सर्व स्वप्न लिहून ठेवूं लागला. अशा अनेक स्वप्नांची काळजीपूर्वक टांचणं ठेवल्यानंतर त्याच्या हळूहळू लक्षांत येऊं लागलं कीं आपल्या स्वप्नांत कांहीं अंश भूतकाळाचा आहे तर कांहीं भविष्यकाळाचा आहे. अशा तऱ्हेचीं स्वप्नं पडणं ही एक अपवादात्मक गोष्ट आहे कीं काय, आपणा एकट्यालाच कांहीं विशेष शक्ति आहे कीं काय हें तपासून पहाण्याकरितां डन्‌नें आपल्या चारपांच मित्रांनाहि त्यांना पडलेलीं स्वप्नं लिहून ठेवण्याचं आपलं तंत्र शिकवलं, आणि त्यांनींहि स्वतःचीं बरींच स्वप्नं लिहून ठेवलीं. त्या स्वप्नांचा अभ्यास केल्यानंतर डन्‌च्या ध्यानांत आलं कीं, अस्पष्टपणें कां होईना, पण भविष्याचा कांहीं अंश सर्वांनाच स्वप्नांत दिसणं शक्य आहे आणि तो तसा दिसतो. ज्याअर्थी भविष्याची अंधुक कां होईना, थोडीबहुत कल्पना स्वप्नांत येऊं शकते, त्याअर्थी आपण ज्याला भविष्य म्हणतों तें आधींच सर्व ठरून गेलेलं—तयार झालेलं असतं हें उघड आहे. काळ म्हणजे अनंत पायऱ्या असलेला एक धावता जिना. आपण या जिन्यावरून नेहमींप्रमाणें पुढें तोंड करून न चढतां जणुं काय पाठ करून वर चढतों आहोंत आणि जिना पायाखालून सरकत खालीं जातो आहे. लंडनच्या ट्यूबरेल्वेच्या स्टेशनांत असे घडघड घडघड सरकणारे जिने आहेत. ते पाहिलेल्या माणसाला या डन्‌च्या सरकत्या किंवा धावत्या जिन्याची अधिक चांगली कल्पना येईल. पायाखालून पुढें सरकलेल्या पायऱ्या म्हणजेच भूतकाळ आपणाला दिसतो; पण आपण पाठ करून वर चढत असल्यामुळें पायाखालीं येऊं घातलेल्या पायऱ्या किंवा भविष्यकाळ आपणाला दिसत नाहीं. कांहीं स्वप्नांत आपण जणुं काय किंचित् मागें वळून पहातों, आणि भविष्याचं थोडंसं दर्शन आपणाला होतं. डन्‌च्या या सिद्धान्ताप्रमाणें माणसाचा भविष्यकाळ आधींच तयार होऊन राहिलेला दिसतो. खरोखरच जर असं असेल आणि माणसांना कधीं काळीं हा सिद्धान्त पटला तर कांहींहि करण्याकरितां हातपाय हलवण्याला माणसं नाकारतील ! मोठमोठीच कार्यें काय, पण लहानसहान कृत्येंहि माणसं करणार नाहींत. करायचंय काय, कांहीं करून ? सर्व कांहीं तयारच आहे. काळ सरकेल तसं तें दिसणार आहे ! यासंबंधीं डन्‌चं म्हणणं काय आहे तें मला माहीत नाहीं, आणि सध्यां तरी डन्‌चा हा सिद्धांत म्हणजे एक अभिनव कल्पना, यापेक्षां अधिक कांहीं नाहीं, असंच विचारवंत समजतात. पण योगायोगासंबंधीं प्रयोग काय चालले आहेत हें यावरून समजतं.

डन् याच्या सिद्धांताबद्दल कुणी कांहीं म्हणो, पण त्याचं संशोधन प्रामाणिक आहे याची कुणी शंका घेत नाहीं. काळ ही एक चमत्कारिक गोष्ट

समाज-विकास-योजना : : सहकारी बांधकाम



" काय म्हंतुया हा सरकारी दगड ?

आहे खरी. भविष्य आधींच तयार असतं कीं नाहीं कुणाला ठाऊक, असं आपण म्हणूं, पण भूतकाळ मात्र गेला तो गेलाच, पुन्हा दिसणं शक्य नाहीं, याबद्दल आपली खात्री असते. पण याहि खात्रीला धक्का देणारा थोडासाच पण विश्वसनीय पुरावा उपलब्ध झाला आहे. १९०१ सालीं मिस् मोबर्ले आणि मिस जुर्दां नांवांच्या दोन इंग्लिश स्त्रिया पॅरिसजवळचा प्रख्यात व्हेर्साय राजवाडा पहायला गेल्या होत्या. व्हेर्सायचा हा राजवाडा आणि त्याच्याभोंवतालच्या बागा इतिहासप्रसिद्ध आहेत. १७८९ सालीं फ्रेंच राजक्रांति झाली, त्या वेळीं प्रख्यात राणी मारी आंत्वानेत् याच राजवाड्यांत रहात होती. १९०१ सालीं मिस मोबर्ले आणि मिस जुर्दां या ऐतिहासिक राजवाड्याच्या बागांतून फिरत असतां त्यांना एक विचित्र अनुभव आला. तो त्यांनीं 'अॅडव्हेंचर' नांवाच्या एका लहानशा पुस्तिकेंत लिहून ठेवला आहे. अठराव्या शतकांतले म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळचे कपडे घातलेले स्त्रीपुरुष त्यांना त्या बागेंत दिसले, त्या काळचे कपडे घातलेला राजवाड्यांतला एक नोकर एका दारांतून बाहेर आला आणि त्यानें त्या बायांना हटकलंसुद्धां. बागेंत कांहीं पाण्याचे झरे आणि त्यावरले लाकडी पूलहि त्या बायांनीं पाहिले. हें पहात असतांना त्या बायांना चमत्कारिक असें कांहीं वाटत नव्हतं. पण नंतर त्यांच्या ध्यानांत आलं कीं, राजवाड्याच्या बागेंत तसे झरे आणि लाकडी पूल सध्यांच्या काळीं मुळींच नाहींत. फार काय, ज्या दारांतून तो नोकर बाहेर येऊन त्यानें त्यांना हटकलं होतं तें दार शंभरावर वर्षांपूर्वींच बुजवून टाकलेलं आहे!

या बायांनीं आपणाला दिसलं तें सर्व तपशीलवार लिहून काढलं आणि तें प्रसिद्ध केलं. त्या बाया कुणी अशा तशा साध्या भोळ्या स्त्रिया नव्हत्या. ऑक्सफर्ड येथील 'सेंट् ह्यूज्' कॉलेजची एक भूतपूर्व प्रिन्सिपॉल होती तर दुसरी चालू प्रिन्सिपॉल होती. इतिहासांत वाचलेलं त्यांना डोळ्यांसमोर दिसून केवळ भास झाला असं म्हणावं तर त्यांनीं वर्णन केलेल्या कांहीं विशेष गोष्टी त्यानंतर कित्येक वर्षांनीं पंचवीसतीस वर्षांनीं इतिहास संशोधकांच्या अलीकडे दृष्टोत्पत्तीला आल्या आहेत. त्या बाया गेल्या होत्या त्या काळांत त्या कुणाला माहीत नव्हत्या आणि इतिहासांतहि नमूद झालेल्या नव्हत्या! या बायांच्या प्रामाणिकपणाची कुणीच शंका घेतलेली नाहीं. आणि तसं कांहीं कारणहि नाहीं. मग झालं काय? १७८९ साल म्हणजे अठरावें शतक अजूनहि व्हेर्सायच्या राजवाड्यांत अदृश्यपणें घुटमळतंय आणि कांहीं चमत्कार होऊन त्या दोन बायांनीं चुकून विसाव्या शतकांतून त्या दोनशें वर्षांपूर्वींच्या काळांत पाऊल टाकलं आणि थोडा वेळ त्यांनीं तो काळ पाहिला! रायगड पहायला गेलेल्या आपल्या इथल्या एखाद्या प्रवाशाला शिवराज्याभिषेकाचा उत्सव असाच पहायला मिळाला तर काय मजा होईल!

जगांत योगायोग नांवाची गोष्टच नाहीं, प्रत्येक घटनेला कांहीं तरी कारण असतंच हें सिद्ध करण्याची शास्त्रज्ञांची किती धडपड चालली आहे, ही गोष्ट या सर्व प्रयोगांवरून दिसून येते. या धडपडींतूनच माणूस जीवनावर अधिकाधिक प्रभुत्व मिळवतो आहे, हें खरं; पण या धडपडींत माणसाला कधीं संपूर्ण यश मिळेल काय? मी याहिपुढें जाऊन विचारतों, सर्वच कारणं कळलीं आणि योगायोग म्हणायला कांहीं उरलंच नाहीं तर जीवनांत जगण्यासारखं कांहीं राहील का? सर्व जग जिंकल्यानंतर आतां जिंकायला कांहीं उरलं नाहीं म्हणून रडणाऱ्या शिकंदरासारखीच मनुष्यजातीची अवस्था होणार नाहीं का?

**अशी शक्तियुक्ति ज्यांच्यांत असेल त्यांचेच संसार होतात**
**त्यांची संतति पृथ्वीची मालक होते.**
**जीवनाच्या झगड्यांत यशस्वी होण्यास लागणारा स्वार्थ**
**व बेदरकारपणा नसेल तर—**

# डार्विनचा सिद्धांत!

लेखक : 'क.'

"पृथ्वीवर सगळीकडे जीवनाचा तीव्र झगडा चालला आहे. स्वपोषण आणि प्रजनन हें सर्व जीवनसृष्टीचें अंतिम ध्येय आहे. आपण जिवन्त रहावयाचें व आपल्या जीवजातीची संतति—सातत्य—कायम ठेवायचें ह्या प्रयत्नांत जग गुंतलेलें आहे. जे जीव हीं दोन्ही कार्यें करतात, ते जीवनाच्या लढाईत यशस्वी झाले असें म्हणावें. शक्ति, युक्ति व परिस्थिति ह्या तिन्हींच्या जोरावर व्यक्ति—एक एक जीव—हें कार्य करते. ज्यांना साधत नाहीं, त्या व्यक्ती मरतात. सर्वतया वरील गुणांनीं युक्त तेच जीव जगतात..." वर्गामध्यें डार्विनच्या विकासवादाचें विवरण करतांना मीं सांगितलें व माझा तास संपवून घरीं परतलें.

वाटेंत कितीतरी दिवसांनीं तिची गांठ पडली. एका हातांत औषधाची बाटली, एका हातांत भाजीची पिशवी, अशी घाईघाईनें ती कुठें तरी निघालेली दिसली. "आजारी होतीस का ग ?"

"छे ग! माझी ती सिंधी निर्वासित मैत्रीण आहे ना, तिची मुलगी आजारी आहे. तिचं औषध आणायला चाललें आहें."

"आणि ही भाजी कुणासाठीं चालवली आहेस बाई ?"

"तुझं आपलं कांहींतरीच. ही कांहीं दुसऱ्या कुणासाठीं नाहीं. अगदीं घरच्यासाठीं भाजी आहे बरं!" तिनें हसून उत्तर दिलें. आणि "मला लवकर गेलें पाहिजे, जातें मी—" असें म्हणून ती पुढें सटकली व मी माझ्या वाटेनें चालूं लागलें.

भाजी अगदीं घरच्यासाठीं होती, तरी इतर नव्हतं का कुणी ती आणायला? एवढीं मुलें घरीं आहेत, कुणालाच का नसतं जातां आलं?—माझ्या मनांत आलें. ती जवळ नव्हती, तरी तिचें उत्तर माझ्या कानांनीं ऐकलें, 'अग, त्यांचा अभ्यास होता, मी औषधासाठीं जाणारच होतें. म्हटलं, मीच आणीन.'

ही कांहीं आजची गोष्ट नव्हती. नेहमीं असेंच चाले. दवाखान्यांतून औषध आणून त्या बाईला देईल, घरीं जाऊन भाजी काढून, निवडून चिरील. घाईघाईनें अंग धुवील व शाळेला उशीर होईल ह्या भीतीनें कसेबसे दोन घास खाऊन बाहेर पडेल. संध्याकाळीं घरीं आली कीं परत घरचें काम, नाहीं तर गांवांत कुणी नातलग असतील त्यांचीं कामें. मग शाळेंतल्या वह्यांची तपासणी, मग सुदैवानें रात्र झाल्यामुळें झोप...हा तिचा रोजचा कार्यक्रम असे.

आम्ही लहानपणीं एका वर्गांत राहिलेल्या, बरोबर शाळेंत गेलेल्या. ती माझ्यापरीस मोठी म्हणून नेहमीं मला संभाळून घ्यायची. माझींहि दोन कामें करायची. मला आठवतें तेव्हांपासून पहातें आहे, प्रत्येकजण आपलें हक्कानें तिच्याकडून कामें करून घेई. मीहि कांहीं त्याला अपवाद नव्हतें. आतां दोघींच्या दोन वाटा झाल्यावर कधीं कधीं आमची भेट होते. कधीं कधीं एकमेकींकडे जातों, एकमेकींचें कसें काय चाललें आहे त्याची आम्हांला बातमी असते आणि भेटलों म्हणजे दोघींनाहि आनंद होतो—म्हणजे मला ती दिसल्याचा आनंद होतो, पण लगेच तिच्या परिस्थितीचें चित्र डोळ्यांपुढें आल्यानें दिवसभर हुरहूर व विषाद वाटतो. मी तिच्यासाठीं कांहीं करीत नाहीं. नुसती हळहळतें. सुखाच्या आयुष्यांत लोकांबद्दल निष्क्रिय सहानुभूति व त्यामुळें वाटणारी हळहळ हीसुद्धां एक प्रकारची चैन आहे.

—आज ती मला आणखीच बाळल्यासारखी वाटली. लहानपणीं ती माझ्यापेक्षा वाढीची दिसायची आतां पहातें तों ती दिवसानुदिवस लहानलहानच दिसते. ती लहान लहान होत होती का मी सारखी फुगत असल्यामुळें ती तशी दिसायची, कोण जाणे! मी जगाची एक घेणेकरीण होतें. दोघी रिकाम्या हातीं व उघड्या अंगानें जगांत आलों, पण पहिला श्वास घेतल्यापासून आतांपर्यंत माझ्यावर देणग्यांचा वर्षाव होत होता. लाडकी मुलगी, प्रेमाची बहीण, मायेची शाल पांघरलेली पत्नी, पिलांची किलबिल चाललेल्या घराची धनीण—एक ना दोन, देव देत होता व मी घेत होतें; आणि घेतां घेतां शरीरानें पण वाढत होतें. आणि ती?—ती एक देणेकरीण होती. आई, बाप, भाऊ, बहिणी, मित्रपरिवार—सगळ्यांनीं तिच्याकडून घेण्याचा जणुं विडा उचलला होता. आई बिचारी महासाध्वी होती. नवऱ्याच्या क्षुल्लक पगारावर आठदहा प्राणांचा संसार कसा करी, तिचें तिलाच माहीत.

मुलें हळू हळू मोठीं झालीं. थोरल्या मुलीचें लग्न झालें, थोरला मुलगा मिळवूं लागला, खालचीं लवकरच आपल्या मार्गाला लागणार असें दिसत होतें. तरुण वयांत केलेल्या कष्टाचें फळ मिळणार, आतां सुखाचे दिवस येणार ह्या आशेंत सर्व होतीं. पण तें बिचारीच्या नशीबांत नव्हतें. थोरला

मुलगा कर्ज काढून परदेशांत गेला तो परत आलाच नाहीं. त्याचें कर्ज मात्र कुटुंबाच्या डोक्यावर बसलें. आई व वडील दुःखांतच गेलीं. मधल्या मुलाला मध्येंच कॉलेज सोडून लहानशी नोकरी पत्करावी लागली. हिनें, भावाच्या मदतीनें कांहीं शिष्यवृत्त्या मिळवून शिक्षण संपवलें व शिक्षण संपल्या दिवसापासून ती व तिचा भाऊ ह्यांनीं संकल्प सोडावा त्याप्रमाणें आपल्या आयुष्याचें कुटुंबाला दान केलें. कर्जाची फेड करतां करतां भावाबहिणींचें वय झालें.—कोणी तरी वंशाला रहावा म्हणून धाकट्याचें लग्न करून दिलें व दोघांनीं त्याच्या संसाराला मदत केली. तिच्या त्यागाची सीमा तरी काय, हें देवाला पाहायचें होतें कीं काय कोण जाणे—बहिणीचीं पोरकीं मुलें, विधवा भाचा आणि नातवंडें पण तिच्याच पदरीं पडलीं—आणि जणुं काय हें सर्व कमीच म्हणून, ती आतां एका निर्वासित मैत्रिणीसाठीं दवाखान्यांत खेटे घालते आहे. तिचा विचार करायला लागलें कीं माझ्या विचारांचें पर्यवसान रागांत होई. पहिल्यानें कांहीं कारण नसतां तिच्या दोन अगतिक नातलगांचा राग येई—नंतर परदेशांत सुखांत असलेल्या भावावर मी चरफडें. शेवटीं मला तिचाच राग येई. 'तिला तरी जरा अंगाबाहेर नसूं का टाकतां आलं?' असें मी हजारदां मनाला विचारीं. माझ्या सुखासीन जिवाला तिचा त्याग अगदीं असह्य होई.

विचाराच्या चक्रांत मी घरीं कधीं आलें तें समजलेंसुद्धां नाहीं. घरची मंडळी जरा खिन्नच दिसली व लवकरच त्याचें कारणहि कळलें. "तुला कळलं का ताई गेल्या तें?"

"म्हणजे? दोन दिवसांपूर्वीच मला दिसल्या होत्या, भावाच्या आजाराची चौकशीसुद्धां केली मीं त्यांच्याजवळ. जरा दमल्याभागलेल्या व ओढल्यासारख्या दिसत होत्या, पण आजारी कांहीं नव्हत्या. कांहीं अपघात वगैरे झाला कीं काय?" मीं आश्चर्यानें विचारलें.

"त्याच संध्याकाळीं पोटांत दुखूं लागलं. दोन दिवस घरीं होत्या. शेजारच्या डॉक्टरीणबाईंना बोलावलं, त्यांनीं सांगितलं कीं घरगुती उपचाराचं हें दुखणं नाहीं, म्हणून इस्पितळांत नेलं. तेथें शस्त्रक्रिया करण्यांच्या आंतच मेल्या!" मला माहिती देण्यांत आली. "ताईच्या आई काय आक्रोश करताहेत!" कोणीसें कळवळून म्हणालें.

'करतील तर काय झालं, एक गुलाम नाहींसा झाला, कोणालाहि वाईट वाटेल!' मीं मनांतल्या मनांत म्हटलें, पण मोठ्यानें मात्र "सुटली बिचारी!" एवढेच शब्द उच्चारले.

ही दुसरी देणेकरीण. ताई कॉलेजची परीक्षा पास झाली तेव्हां कोणी तिला एका संस्थेंत काम करण्याची गळ घातली होती. ती नाकारून ताईनें जरा जास्ती पैशाची सरकारी नोकरी पत्करली. त्या वेळीं कोण गहजब झाला! एका सभेंत तिचें नांव न घेतां लोकांना समजेल अशा बेतानें एक वक्ते म्हणाले होते, 'मुली बी. ए. झाल्या म्हणजे आपलें आयुष्य एखाद्या गरीब संस्थेंत न वेचतां पैशाकडे पहातात व मोठ्या नोकऱ्या धरतात.' बिचारी ताई वक्त्यांच्या समोर पुढच्या रांगेत बसली होती. संताप, आश्चर्य, अगतिकता व शरम ह्यांनीं तिच्या अंतःकरणांत काय झालें तें ती कोणाजवळ बोलली नाहीं. बऱ्याच वर्षांनीं मला तें कळलें. तिच्या अंगावर आई व सात भावंडें ह्यांचा संसार होता. त्यांचें शिक्षण करतां येईल अशी नोकरी तिला हवी होती. आई व भावंडें शिकण्यासाठीं एकीकडे व स्वतः नोकरीच्या गांवीं असे दोन संसार तिला चालवायचे होते. सर्व भावंडांचें शिक्षण व लग्नें करूनहि तिची जबाबदारी व देणें संपलें नव्हतें. भावाच्या आजारांत रात्रंदिवस तिची सेवा चालली होती. दिवसभर नोकरी, रात्रभर जागरण, मधल्या वेळांत स्वयंपाक—कोण गुलाम पैसे देऊनहि इतकें करणारा मिळेल? मिळवता मुलगा घरीं आला कीं दमला म्हणून त्याचें कौतुक होई, पण ताईला, "बस हो, दमलीस—" एवढे दोन शब्दहि कधीं कोणी म्हटले नाहींत. ज्या बायांनीं संस्थांतून कामें केलीं त्यांचा बोलबाला झाला, वर्तमानपत्रांतून फोटो आले, समाजसेविका म्हणून सत्कार झाले, शारीरिक स्वास्थ्य लाभलें, प्रतिष्ठा मिळाली. ताईचा त्याग कोणाला दिसला नाहीं. सगळ्या बहिणींचीं लग्नें झालीं. कोणाच्या मनांत येईना कीं ताईलाहि संसार करावासा वाटत असेल म्हणून. शेवटीं शरीरानें संप पुकारलें आणि ताईच्या कष्टांतून आपली सोडवणूक करून घेतली.

ताईची ही तऱ्हा, तिची ती तऱ्हा. तिनें लग्न करावें म्हणून भावानें तिला पुष्कळ सांगितलें. पण तिनेंच भावावर एकट्यावर भार नको म्हणून लग्न केलें नाहीं. तिला पाहिलें कीं मला वाटतें, ती ताईसारखीच एक दिवस जाईल. दोघी चांगल्या शिकलेल्या, पण कधीं झुळझुळीत वस्त्र नेसल्या नाहींत. दोघींचे केस सुंदर, पण कधीं त्यावर फूल घातलें नाहीं. जबाबदाऱ्या अंगाबाहेर टाकायच्या ही युक्ति त्यांना साधली नाहीं. आयुष्याच्या धकाधकींत इतरांना मागें रेटून आपण पुढें सरायचें ही शक्ति त्यांना नाहीं. परिस्थिति म्हणजे वरील शक्ति-युक्तीनेंच आपलीशी करून घ्यायची. अशी शक्तियुक्ति ज्यांच्यांत असेल त्यांचेच संसार होतात—त्यांची संतति पृथ्वीची मालक होते. जीवनाच्या झगड्यांत यशस्वी होण्यास लागणारा स्वार्थ व बेदरकारपणा दोघींच्यांतहि नव्हता. डार्विनच्या सिद्धान्ताप्रमाणें त्या जगण्यास नालायक. त्यांनीं कामकरी मुंग्यांप्रमाणें इतरांचे संसार उभारायचे, लोकांचीं कर्जें फेडायचीं, लोकांच्यासाठीं कष्ट करायचे व निमूट मरायचें!



मी वृक्षांची मी पक्ष्यांची
मी पुष्पांची मी सगळ्यांची
मी सर्वांची परंतु माझें
असेल कोणी मजला शंका!






अनुक्रमणिका

तिच्या भावनाविवश मनाला वाटलें कीं ह्या वेडिंगप्रमाणेंच ह्या घरांतलें अस्तित्वहि आतां गुंडाळून ठेवलेलें आहे. ह्या घरांत आपल्याला आतां जागा नाहीं. घरांतल्या कोणत्याहि वस्तूवर आतां आपला हक्क नाहीं.



# चंदनाचा उंबरठा

अच्युत बर्वे

गाडीनें शिटी वाजवली, हिरवें निशाण वरखालीं हललें. डब्यांना जोडणाऱ्या सांखळ्या खळखळल्या आणि कुंई कुंई करीत गाडी पुढें सरकूं लागली. गाडी पुढें सरकूं लागली तशी वासंती कावरीबावरी झाली. नकळत डोळे ओलावले आणि भरल्या डोळ्यांनीं ती अनंताकडे पाहूं लागली. गाडीबरोबर अनंता भरभर चालत होता, हलके हलके धावत होता. वासंतीनें हसल्यासारखें केलें आणि म्हटलें, "जपून, जपून हं."

"आणि तूंहि जपून."

"उगाचच पावसापाण्यांत हिंडूं नका. दोन मंगळवार झाले कीं फिरेनच मी परत. पण वेळच्यावेळीं पत्र पाठवा गडे!" वासंती हसली. गोड हसली आणि पुन्हा म्हणाली, "आतां धावूं नका. गाडीला वेग..."

पहातां पाहतां अनंता मागें पडत होता, दिसेनासा होत होता आणि तरीहि वासंती डब्याबाहेर ओणवून मान उंचावून पहात होती. क्षणाक्षणाला अनंताची आकृति लहान होत होती, आणि तो उभा असलेल्या ठिकाणीं जेव्हां फक्त एक ठिपका, टिंब दिसूं लागलें तेव्हां वासंती आंत वळली. आपल्या जागेवर, डोळे मिटून तशीच बसून राहिली. मिटल्या डोळ्यांपुढें नुकताच पाहिलेला अनंताचा ठिपका, अनंताचें टिंब पुन्हा स्थिर होऊं लागलें, आणि स्थिर होतां होतां पुन्हा हलूं लागलें. हलतां हलतां वाढूं लागलें आणि अनंताचीं विविध रूपें आकार घेऊं लागलीं. जें घडलें, जें अनुभवलें तें सारें मिटल्या डोळ्यांपुढें उभें राहूं लागलें. आणि तेंहि इतकें सजीव, इतकें जवळ कीं तिला वाटूं लागलें, हा सारा खेळ, हा सारा गहिऱ्या क्षणांचा पिंगा आपल्या मिटल्या पापण्यांआडच चालू आहे.

चार महिन्यांपूर्वी तिनें अनंताला, डेक्कन जिमखान्यावरच्या आपल्या बंगल्यांत बैठकीच्या खोलींत प्रथम पाहिलें होतें. तलम धोतराचा झोंकदार काचा मारलेली आणि रेशमी शर्टावर बुलनचा निळा कोट चढवलेली अनंताची उंचीपुरी मूर्ति तिला एकदम आवडली होती. इतकी आवडली होती कीं तिला वाटलें, त्याच्याकडे पहातच रहावें. पण हें कसें शक्य होतें? बाजूला अप्पा बसले होते. दरवाजांत आई उभी होती आणि तिच्या पुढ्यांत तर तिचे मामंजी व्हायला आलेले गृहस्थ बसले होते. हे गृहस्थ मधून मधून तिला मामुली प्रश्न करीत होते आणि ती लाजत लाजत त्यांचीं उत्तरें देत होती. मधूनच अप्पांकडे पहात होती आणि अप्पा गालांतल्या गालांत हसत आहेत असें वाटल्यावर मान खालीं घालत होती; गालिच्यावरच्या हरणावरून हात फिरवत होती. तिनें फार तर एकदोन क्षणच अनंताला पाहिलें होतें. पण त्या निसटत्या क्षणांतहि त्याच्याविषयींच्या कांहीं गोष्टी ठळकपणें तिच्या ध्यानांत आल्या होत्या. त्याचें भव्य कपाळ, सरळ नाक आणि नाजुक जिवणी तिला एकदम आवडली होती. तिला नकळत आठवलें कीं, नवऱ्याच्या रूपाविषयीं आपल्या ह्याच कल्पना आहेत, ह्याच आवडीनिवडी आहेत. आणि ही जाणीव झाली तेव्हां ती एकदम सुखावली. त्या तशा क्षणींहि तिला एकदम मोकळें मोकळें वाटूं लागलें. ती आतां मान वर करून त्याच्याकडे पाहणार होती एवढ्यांत समोर बसलेल्या गृहस्थांनीं म्हटलें, "तूं आतां आंत गेलीस तरी चालेल मुली!" आणि आईनें पाठोपाठ हलकेच हाक मारून तिला आंत बोलावलें.

त्यानंतर घरांत एकच धांदल उडाली होती. मुहूर्त तर अगदीं जवळचाच धरला होता. सोनारशिंप्यापासून झाडून साऱ्यांना तांतडीचीं बोलावणीं जात होतीं आणि तेहि बिचारे कुणी आपलें कसब दाखविण्याकरितां तर कुणी द्रव्यलोभानें खेटे घालूं लागले होते. जवळच्या नातेवाइकांना अप्पा स्वतः आग्रही वृत्तीनें लग्नाला येण्याविषयीं लिहीत होते आणि हां हां म्हणतां रोज



कुणी ना कुणी तरी येत होते. पूर्वी कधींहि न पाहिलेल्या अप्पासाहेबांच्या वहिणीपासून अगदीं जवळच्या वाटणाऱ्या लोणावळ्याच्या काशीपर्यंत सारीं माणसें गोळा होत होतीं. आणि हें असें झालें नसतें तरच नवल होतें. अप्पासाहेब खाजगीवाल्यांकडचें लग्न म्हणजे एखाद्या मामुली भटाभिक्षुका-घरचें लग्न थोडेंच?

नवरामुलगा देखणा होता. रूपानें तिला साजेसा होता. हुशार होता. आणि अप्पांना तर तो विशेष आवडला होता. तिच्या आईला मात्र हें स्थळ तितकेंसें पसंत नव्हतें. आतां तसें तिच्या आईनें बोलून दाखविलें नव्हतें हें खरें पण मुलगी पाहून झाल्यावर वराकडून पसंती आली तेव्हां अप्पा-आईत झालेलें संभाषण वासंतीनें ऐकलें होतें. आई अप्पांना म्हणत होती, “जांवई चांगला आहे. सर्व कांहीं ठीक आहे, पण स्थळ कांहीं आपल्या तोलाचं नाहीं. आपली मुलगी लहानपणापासून लाडांत नि वैभवांत वाढलेली! मला बाई भीति वाटते कीं सासरीं तिचं कसं जमेल! ह्यावर अप्पा काय म्हणतात, आईला काय उत्तर देतात हें जाणून घेण्याविषयीं ती अतिशय उत्सुक झाली होती. पण अप्पांनीं कांहींच न बोलतां तो विषय तेवढ्यावरच सोडून दिला होता.

आतां हा विषय तेवढ्यावरच राहिला तरी तिच्या मनाला मात्र एक तऱ्हेची हुरहूर लागून राहिली. एवढ्या साऱ्या सुखांत कांहीं तरी उणीव आहे, कांहीं तरी टोंचतें आहे, सलतें आहे असें वाटूं लागलें. बरवटीत डोळ्यांच्या सुमित्रा प्रधानचा नवरा डॉक्टर होता, चालतांना थोडा पाय काढणाऱ्या सुशी मराठेचा नवरा वकील होता आणि रूपाच्या बाबतींत तिच्या पासंगालाहि न लागणाऱ्या नमू साठेचा नवरा इंजिनियर होता. कुणी खोऱ्यानें पैसा ओढीत होता, कुणी मोटार बाळगून होता तर कुणाची वडिलार्जित इस्टेट होती. हें सारें आठवलें तेव्हां तिला वाटूं लागलें, नेहमीं आपल्या रूपानें दिपून जाणाऱ्या काशीलासुद्धां एखादा वकील नाहीं तर डॉक्टर मिळेल आणि आपण मात्र...पण असे हे विचार मनांत आले तरी तेवढ्यापुरतेच. सुमित्रा प्रधान, सुशी मराठे किंवा नमू साठे ह्यांपैकीं कुणाचाहि नवरा दिसायला चांगला नव्हता. कुणी काळा होता, कुणी ठेंगू होता तर कुणी नकटा होता. पण चार दिवसांनीं तिचा होणारा अनंता उंचनीच; चांगला गोराभुरका होता. त्याचें तें भव्य कपाळ, धरधरीत नाक आणि नाजुक जिवणी! शेवटीं हें त्याचें रूपच तिच्या लक्षांत राही आणि बाकीच्या गोष्टी ती विसरून जाई. इतर गोष्टींची कधीं आठवण झालीच तर नाक उडवून ती स्वतःशींच म्हणे, ‘मला काय कमी आहे? जोंपर्यंत अप्पाआई आहेत तोंपर्यंत आहे तें सारें माझेंच आहे.’

पुढें दोनचार दिवसांनीं लग्न लागलें. सारें कांहीं व्यवस्थित पार पडलें अप्पासाहेबांच्या इतमामाला शोभेल अशा तऱ्हेनें कार्य गाजलें. लोणा-वळ्याच्या काशीपासून अप्पासाहेबांच्या वहिणीपर्यंत साऱ्यांनीं वासंतीची मन-सोक्त चेष्टा केली. तिला नाना तऱ्हेचे उखाणे घ्यावयास लावलें. नाना तऱ्हेनें





अनुक्रमणिका

मजा केली. मजा करतां करतां कुणी कांहीं, कुणी असें तर कुणी तसें बोलले. कुणी चेष्टेंत म्हणून बोलले तर कुणी हसत हसत बोलले. अनंतरावासारखा उमदा आणि देखणा नवरा वासंतीला मिळाला म्हणून कुणी आनंद प्रदर्शित केला आणि 'आतां काय मजा आहे बाई तुझी' म्हणून वासंतीचे गालगुच्चे घेतले. अप्पासाहेबांच्या बहिणीनें बोलतां बोलतां एवढ्या साऱ्या गोष्टींत अनंतरावांची घरची स्थिति चांगली असती तर अगदीं दुधांत साखर पडली असती म्हणून रेशमी चिमटे घेतले आणि वासंतीबद्दल कोरडी हळहळ व्यक्त केली.

आणि अशा ह्या चेष्टेच्या कडूगोड चव चाखीत वासंती अनंताबरोबर मुंबईला आली. भावी संसाराचीं मोहक चित्रें रंगवीत मोठ्या उमेदीनें नव्या बिऱ्हाडांत तिनें प्रवेश केला.

अनंताचें हें बिऱ्हाड, दादरला शिवाजी पार्कवर, एका मोठ्या बंगल्या-शेजारीं गैरजवजा असलेल्या दोन खोल्यांत होतें. वासंतीनें तें पाहिलें तेव्हां नापसंतीच्या स्वरांत तिनें अनंताला म्हटलें, "ह्यांत कसं रहायचं बाई? धड एक सोय नाहीं. भिंतींत कपाटं नाहींत. पुरेशा खिडक्या नाहींत आणि हें पाहिलंत का?" तिनें हाताचें बोट खोलीच्या वरच्या भागाकडे करीत म्हटलें, "इकडे वरती तर साफ उघडंच आहे." तिचें हें बोलणें ऐकून अनंता साफ गांगरला. जागा मिळाल्यामुळें त्याला जो आनंद झाला होता त्यावर असें अभावितपणें विरजण पडलें. त्याचा खट्टू चेहरा पाहून वासंती जास्तच बावरली, आणि त्याला बिलगत म्हणाली, "मी बोललें म्हणून राग आला का? पण तुम्हीच सांगा, मी इथें कशी राहूं? तुम्ही घरांत नसतांना ह्या वरच्या मोकळ्या जागेंतून कुणी अचानक आंत आला—" आणि बोलतां बोलतां ती अनंताला जास्तच बिलगून विचारूं लागली, "मी बोललें म्हणून राग तर नाहीं ना आला?" अनंतानें तिला कुरवाळल्यासारखें केलें आणि म्हटलें, "आपण दुसरी जागा बघूं. मी थोडे जास्त कष्ट करीन. पैसे मिळवीन आणि मग कुठें तरी पागडी भरून आपण चांगला तीन खोल्यांचा ब्लॉक घेऊं." ह्यावर वासंतीचें थोडेंफार समाधान झालें. आणि आज ना उद्यां चांगल्या तीन खोल्यांच्या ब्लॉकमध्यें रहावयास जायचें आहे ह्या आनंदांत ती घरांत इतर गोष्टींकडे लक्ष देऊं लागली.

पण घरांत ती वावरूं लागली तेव्हां पावलोपावलीं खट्टू होऊं लागली. तिला राहून राहून आश्चर्य वाटे कीं साध्या साध्या रोजच्या गरजेच्याहि वस्तू ह्या घरांत कशा नाहींत? आंघोळीचें पाणी तापवायला बंब नाहीं म्हणजे काय? कसें तरी शेगडीवर ॲल्युमिनियमचें पातेलें चढवायचें आणि पाणी तापल्यावर दोनचार तांब्ये पाणी अंगावर घेऊन आंघोळ करावयाची. शी शी! अशी कावळ्यासारखी आंघोळ करण्यांत काय अर्थ आहे? स्वैंपाकाचीं भांडीं तरी कुठं पुरेशीं आहेत? पातेली आहे तर झांकणी नाहीं आणि झांकणी आहे तर त्या मापाचें पातेलें नाहीं. एक मेलें स्वैंपाकाचें राहूं दे पण दुपारच्या वेळीं निवांतपणें पडण्याकरितां साधी कॉट तरी? तीहि नाहीं. आणि हे सारे विचार करतां करतां तिला डेक्कन जिमखान्यावरचें तिचें घर आठवे आणि तेथल्या सुखसोईची आठवण होई.

एकदां ह्या अपुऱ्या गोष्टींविषयीं ती अनंताजवळ बोलली तेव्हां तो एकदम खट्टू झाला. दुःखित अंतःकरणानें तिला म्हणाला, "आपण गरीब आहोंत ग वासंती. मला जेवढा पैसा मिळतो त्यांतला पुष्कळसा घरीं पाठवावा लागतो

आणि उरलेल्या पैश्यांत आपल्याला भागवावं लागतं. रोजच्या गरजा भागव-तांना मला नाकीनऊ येतात. मग छानछोकीच्या वस्तू घ्यायला पैसे कोठून आणावे ?" आपण कांहीं तरी बोलून अनंताला दुःखी केलें ह्याची जाणीव तिला झाली तेव्हां ती कावरीबावरी झाली. राहून राहून तिला वाटूं लागलें कीं घरांतल्या अपुऱ्या गोष्टींचा आपण अनंताजवळ उल्लेख करावयास नको होता. त्याला दुःख देऊन आपण काय मिळवलें ? पैसे पुरत नाहींत मग तो तरी काय करील ? असा विचार करीत असतां तिला एकदम कांहीं तरी सुचलें आणि ती अनंताला म्हणाली, " तुम्ही उगाच नाराज होऊं नका. आपल्याला काय कमी आहे ? अप्पाआई आहेत तोंपर्यंत पुण्याला आहे तें सारं माझंच आहे. पुण्याच्या घरांत माझ्या किती वस्तू आहेत. कॉट आहे, टेबलखुर्ची आहे, ड्रेसिंग टेबल आहे, आणि ऐकलंत का—" अनंताचें. आपल्या बोलण्याकडे लक्ष नाहीं असें वाटल्यामुळें त्याच्याजवळ सरकून तिनें म्हटलें, " अप्पांनीं माझ्यासाठीं पायपेटी घेतली आहे. सिंगरचें हातमशीन घेतलें आहे, आणखीहि किती बारीकसारीक गोष्टी घेतल्या आहेत. त्या साऱ्या माझ्या आहेत. आतां मंगळागौरीसाठीं मी पुण्याला जाईन त्या वेळीं त्या साऱ्या घेऊन येईन." एवढें बोलून ती भावी सुखाच्या कल्पनेंत दंग झाली. एका अर्थी तिनें ह्या साऱ्याला अनंताची संमति घेण्याकरितां प्रश्नार्थक मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें नाहीं हें फार बरें झालें. नाहीं तर अनंताच्या चेहऱ्याकरून तिला वाटलें असतें कीं माहेराहून वस्तू आणावयाची कल्पना अनंताला कांहीं तितकीशी पसंत नाहीं. आणि मग ती उगाचच विचार करीत राहिली असती. विचार करतां करतां तिनें स्वतःशींच म्हटलें असतें, 'पैसे नाहींत म्हणून नव्या वस्तू घ्यायला होत नाहींत, आणि अनंताला आवडत नाहीं म्हणून माहेराहून हक्काच्या वस्तू आणतां येत नाहींत, हा काय न्याय झाला ?"

लोणावळा आलें आणि स्टेशनमध्यें गाडी शिरली तेव्हां ती विचारांतून जागी झाली. स्टेशनवर गाडी उभी राहिली तेव्हां तिला वाटलें, काशीला पत्र टाकून कळवलें असतें तर बरें झालें असतें. लाल कमळें घेऊन काशी भेटायला आली असती आणि इकडच्या तिकडच्या बातम्या कळल्या असत्या. काशीला पत्र टाकून न कळ-वल्याबद्दल तिला स्वतःचाच राग आला. पण आलेला राग झटकून टाकण्याकरितां तिनें नापसंतीदर्शक उद्गार काढला आणि मनाशीं म्हटलें, 'आतां तासाभरांत तर पुणें येईल...'

लोणावळ्याहून गाडी सुटली तेव्हांपासून पुण्याविषयींचे विचार मनांत येऊं लागले. तिला वाटलें, नव्हे तिची खात्री होती कीं अप्पा स्वतः गाडी घेऊन स्टेशनवर येतील. अप्पा स्टेशनवर येणार म्हणून दिवाण-खान्यांतली ब्रिजची बैठक भरली नसेल. ब्रिज खेळायला मिळणार नाहीं म्हणून रोजची मंडळी नाराज होऊन अप्पांना म्हणेल,'अहो, येईल ती घरीं. स्टेशन-वर गाडी पाठवा म्हणजे झालं.' ह्यावर अप्पांनीं तुम्ही 'फार शहाणे अहां' अशा दृष्टीनें त्यांच्याकडे पाहून म्हटलें असेल, 'वा वा ! असें कधीं झालंय् ! अहो आज किती दिवसांनीं ती घरीं येते आहे.' आणि असें बोलत बोलत त्यांनीं, 'अहो—' म्हणून आईला हांक मारून वेळेवर तयार राहण्या-विषयीं सांगून ठेवलें असेल. अप्पाआईबरोबर स्टेशनवर येण्याकरितां माधव-बेबींनीं, सकाळपासून आईच्यामागें लकडा लावला असेल आणि आइनें पुन्हा पुन्हा नाहीं म्हटल्यावर, त्यांनीं अप्पांना गळ घातली असेल.

अप्पाआई आणि माधवबेबींच्या कौतुकानें तर आपल्याला गुदमरल्या-सारखें होईल. आई वारंवार आपल्या पाठीवर हात फिरवील आणि म्हणेल, 'किती वाळलीस पोरी ! तुला कामाची संवय नाहीं. आतां इथें चार दिवस रहा. प्रकृति चांगली घडधाकट होऊं दे आणि मग जातांना आपल्या गेनू गड्याच्या मुलाला बरोबर घेऊन जा. तुला तेवढीच मदत होईल.' हें सारें आठवलें तेव्हां तिला खुदकन् हसूं आलें. गेनू गड्याच्या मुलाची आठवण झाली तेव्हां तिला वाटलें, खरेंच आपण घरकामाला गडी घेऊन येऊं असें अनंताला सांगायला हवें होतें ! आतां आपण परत जाऊं तों अनंतानें कोठें तरी तीन खोल्यांचा ब्लॉक घेऊन ठेवला असेल. आणि अनंताला नसलाच मिळाला तर आपण अप्पांना म्हणूं, 'हें हो काय अप्पा ! तुम्ही स्वतःला कॉन्ट्रॅक्टर म्हणवतां, तुमचे एवढे मुंबईला मित्र आहेत मग आम्हांला एक छानसा ब्लॉक द्या कीं बघून.' ह्यावर अप्पा, 'एवढंच ना ?' असें म्हणतील आणि कुठच्या कुठच्या त्यांच्या स्नेह्यांना पत्रें लिहून आपल्या साठीं एक सुरेखसा ब्लॉक बघून ठेवतील. तीन खोल्यांतल्या एका खोलींत आपण स्वैंपाकघर थाटूं, एक खोली बेडरूम म्हणून राखून ठेवूं आणि तिसऱ्या खोलींत दिवाणखाना सजवूं. बराच वेळ विचार करून तिनें कोणत्या खोलींत पायपेटी ठेवायची, कोणत्या खोलींत सिंगरचें मशीन ठेवायचें; कशा रीतीनें कोन साधून ड्रेसिंग टेबल ठेवायचें ह्या सगळ्यांचा आपल्या मनाशीं पक्का विचार केला. अशा रीतीनें खोल्या सजलेल्या पाहून अनंता आश्चर्यचकित होईल आणि आपल्याला म्हणेल, 'वासंती, तूं पुण्याहून येतांना एखादी जादूची कांडी तर नाहीं ना घेऊन आलीस ?' मग आपण त्याच्याजवळ जाऊं आणि त्याला मिस्किलपणें म्हणूं, 'आतां सांग बघूं, कसं दिसतं आपलं घर !'

गाडीनें वळण बदललें आणि जेव्हां त्यांचा खाड् खाड् असा आवाज आला तेव्हां वासंतीनें डब्याच्या बाहेर ओणवून पाहिलें आणि स्टेशनवरचे दिवे दिसूं लागले तेव्हां स्वतःशींच म्हटलें, 'अय्या, आलं वाटतं पुणं !' आणि मग तिनें लगबगीनें केसांवरून हात फिरवल्यासारखें केलें, साडी झटकून सारखी केली; पर्स सावरली आणि हें सारें होत आहे तों गाडीचा वेग कमी झाला आणि गाडी स्टेशन मध्यें उभी राहिली. वासंती लगबगीनें डब्याच्या दारापाशीं आली. आणि अप्पाआई, माधवबेबी कुठें दिसतात का तें भिरभिऱ्या नजरेनें पाहूं लागली. प्लॅटफॉर्मवरच्या मोठ्या घड्याळाखालीं आई उभी असलेली दिसली तेव्हां

**समाज-विकास-योजना : : दवापाणी**



चला पाहूं, आटपा एकेक !

हात उंच करून ती मोठ्यानें ओरडली, "आई! ए आई—"

आई लगबगीनें डब्यापाशीं आली आणि तिला विचारूं लागली, "गाडीला थोडा लेट झाला वाटतं! नाहीं तरी ह्या गाडीला नेहमींच जरा लेट होतो." पण आईला मध्येंच थांबवून तिनें विचारलें, "हें काय! तूं एकटीच आलीस वाटतं स्टेशनवर? अप्पा नाहीं आले? आणि माधव, वेबी—"

"अग, ते गेले आहेत आज क्लबवर. माधव गेला आहे मित्राकडे. वेबी म्हणत होती मी येतें म्हणून- –"

वासंतीनें आईला उमगणार नाहीं अशा वेतानें 'अस्सं!' असं दुःखित अंतःकरणानें म्हटलें आणि तिला वाटलें, आईला 'म्हणाणें, तूं तरी कशाला आलीस? तूंहि एखादी सबब शोधून काढायची...' पण असें कांहीं न बोलतां तिनें थोडें हसून आईला विचारलें, "गाडी तरी घेऊन आली आहेत ना?"

घरासमोर शोफरनें गाडी उभी केली तेव्हां अप्पा, माधव आणि वेबी लगबगीनें गाडीपाशीं आलीं. अप्पांनीं हसून वासंतीकडे पाहिलें आणि तिच्या आईला उद्देशून म्हटलें, "पोरीला मुंबई मानवलेली दिसते!" आणि मग त्यांनीं थोडें हसल्यासारखें करून वासंतीला विचारलें, "काय, खरं ना मी म्हणतों तें!" ह्यावर वासंतीनें नुसतें हसल्यासारखें करून अप्पांकडे पाहिलें. तिला वाटलें कीं अप्पांना म्हणावें, मला वाटलें कीं एक दिवस तरी तुम्ही माझ्याकरतां खेळ बुडवून स्टेशनवर याल, आणि विचार करून ती कांहीं तरी बोलणार तों आई म्हणाली, "खरंच, मुंबईचं पाणी मानवलेलं दिसतं तुला!" आणि बोलतां बोलतां तिनें, इतका वेळ वासंतीच्या भोंवतीं घोटाळणाऱ्या माधव-वेबीना जरा ओरडून म्हटलें, "जरा स्वस्थ बसूं द्याल कीं नाहीं तिला?" वासंतीनें माधव-वेबींना थोपटल्यासारखें केलें आणि आईला म्हटलें, "राहूं दे ग—राहूं दे त्यांना..."

वासंतीला गाडींत वाटलें होतें कीं, घरीं गेल्यावर सारीं माणसें आपल्या भोंवतीं भोंवतीं करतील. अप्पा मिस्किलपणें कांहीं तरी विचारतील आणि ते काय विचारीत आहेत हें ध्यानांत आल्यावर आपली लाजून लाजून पुरेवाट होईल. आई नाना तऱ्हेनें चौकशी करील आणि आपण गोंधळून जाऊं. आपण उत्तर दिलें न दिलें, कांहीं बोललों न बोललों तरी आपलें कौतुक होईल, कौतुकानें गुदमरल्यासारखें होईल. आणि तसें पाहिलें तर आतांहि तिला थोडेंफार गुदमरल्यासारखें वाटूं लागलें होतें. पण तें निराळ्या अर्थानें!

ती जसजशी घरांत वावरूं लागली तसतसें तिला वाटूं लागलें कीं, हें घर बदललें आहे. तसें पाहिलें तर माणसें पूर्वींचीच आहेत, घर पूर्वींचंच आहे, घरांतल्या वस्तूहि पूर्वींच्याच आहेत. वरवर पाहिलें तर सारें जसें पूर्वीं होतें तसेंच आहे. पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास, घरांतल्या माणसांत, विशेषतः आईच्या स्वभावांत पडलेला बदल जाणवण्यासारखा आहे. आई पूर्वीप्रमाणेंच आपुलकीनें वागत असली, पूर्वीप्रमाणेंच बोलत चालत असली तरी ह्या आपुलकींत आणि बोलण्याचालण्यांत एक तऱ्हेची उणीव आहे, एक तऱ्हेची कृत्रिमता आहे. ती कृत्रिमता सूक्ष्म असली तरी जाणवण्या-इतकी स्पष्ट आहे. तिनें विचार केला तरी तिला कळेना कीं असें कां व्हावें? आईनें असें कां वागावें? घरांतल्या माणसांनीं असें अलिप्तपणें कां वागावें?

पुढें दोनचार दिवसांनीं, तिनें दुपारच्या वेळीं कांहीं शिवणकाम काढलें आणि जेव्हां मशीन कुठें दिसलें नाहीं तेव्हां आईला विचारलें, "माझं हात-मशीन कुठं गेलं?"

"कां ग?"

"एखादा परकर शिवायचा म्हणतें. मशीन कुठं दिसत नाहीं—"

"अग, तूं गेलीस आणि महिन्याभरांतच वेबी धडपडली तिथें. कांहीं तरी जाड कापड शिवायला घेतलन् आणि तेव्हांपासून टीपच कशी ती येईना. म्हटलं टीपच जर येत नाहीं तर मशीन खालीं ठेवून तरी त्याचा काय उपयोग? गेनू गड्याला सांगितलं आणि फळीवर उचलून ठेवलं!" आईचें हें उत्तर ऐकून तिला हसूं आलें. तिला वाटलें, आईला म्हणावें, 'वा ग वा! टीप येत नाहीं म्हणून मशीन उचलून ठेवायचं वाटतं? मग सिंगर कंपनीच्या दुकानाचा तो काय फायदा?' पण असें तुटक न बोलतां तिनें आईला म्हटलें, "मी संध्याकाळीं सिंगर कंपनीच्या दुकानांत जाईन आणि मशीन दुरुस्त करून घेऊन येईन." ह्यावर "कांहीं नको दुरुस्त करायला. अग, तूं दुरुस्त करून आणशील आणि पुन्हा तूं गेल्यावर वेबीचा धांगड-धिंगा सुरू होईल. ती जरा मोठी झाली, मशीन चालवायचं तिला कळूं लागलं कीं मी आणीन दुरुस्त करून." हें आईचें उत्तर ऐकून ती एकदम गोंधळली. तिच्या मनांत आलें, 'छान, अप्पांनीं मशीन घेतलें माझ्याकरतां आणि आतां आई तर तें वेबीसाठीं जपते आहे. मग तें मी मुंबईला कसें नेणार?'

मशीनचा प्रश्न असा निकालांत निघालेला पाहून तिला वाटलें, ज्या ज्या गोष्टी आपल्याला हव्या आहेत, ज्या ज्या गोष्टी अप्पांनीं खास आपल्या-करितां आणल्या आहेत त्या त्या गोष्टी मी मुंबईला घेऊन जाणार आहें असें आईला सांगावें. पण तिनें विचार केला तेव्हां तिला वाटूं लागलें कीं, असें तरी आपण कुठच्या तोंडानें सांगायचें? जसें मशीन, आई वेबीसाठीं जपते आहे तशाच माझ्या इतरहि वस्तू वेबीसाठीं जपून ठेवायचा तिचा बेत कशावरून नसेल? कुणी सांगावें! माझें सामान, माझ्या वस्तू कुणाला द्यावयाच्या, त्याची विल्हेवाट कशी लावायची हें आईनें ठरवूनहि ठेवलें असेल. माझी टेबल-खुर्ची आणि कॉट माधवला मिळणार असेल तर ड्रेसिंग टेबल आणि पायपेटी वेबीला मिळणार असेल. माधवचें एक राहूं दे. पण वेबीचा एवढा उमाळा आईला केव्हांपासून येऊं लागला?

पायपेटीची आठवण झाली तेव्हां तिला वाटलें कीं, पेटी वेबीसाठीं राखून ठेवण्यांत काय अर्थ आहे? आईला तर आवाज नाहीं, गाण्याचें ज्ञान नाहीं आणि त्या बाबतींत वेबी तर आईची मुलगी मग पेटीची वेबीला काय आवश्यकता? तिनें विचार करून आईला म्हटलें, "जातांना पायपेटी घेऊन जाणार आहें मी. थोडं वाजवलं कीं तेवढेंच बरं वाटतं. कंटाळा जातो आणि हुरूप येतो. चालेल ना?—" उत्तराच्या अपेक्षेनें तिनें आईकडे पाहिलें. पण आईनें कांहीं उत्तर दिलें नाहीं तेव्हां तिला वाटलें कीं, आपला प्रश्न आईला ऐकूंच गेलेला दिसत नाहीं. तिनें पुन्हा एकदां जेव्हां पेटी-विषयीं विचारलें तेव्हां आईनें एकदम गांगरल्यासारखें केलें आणि म्हटलें, "म्हणजे? तुला ठाऊकच नाहीं वाटतं?—"

आई आतां काय सांगते, तें ऐकण्याटीं ती आतुर झाली होती. तिनें घाईघाईनें आईला विचारलें, "वेबीनें पेटी मोडली तर नाहीं ना?"

आईनें हसत तिच्याकडे पाहिलें आणि म्हटलें, "नाहीं ग. ती कशाला जाते आहे पेटीशीं!"

"मग ?"

"मला आवाज नाहीं, वेबीला तर त्याहूनहि नाहीं. घरांत तूं नाहींस, मग पेटीचा तरी काय उपयोग ? ह्यांना सांगितलं आणि टाकली विकून. नाहीं तरी गायनसमाजाला चांगली पेटी हवीच होती. आणि उलट पेटी विकून शंभरदीडशेंचा फायदाच झाला बघ !" आईचें उत्तर ऐकून वासंती एकदम चिडली. आईच्या व्यावहारिक रुक्षपणाचा तिला राग आला. ताड्-ताड् पाय आपटीत ती तेथून उठून गेली. तिला वाटलें कीं सरळ अप्पांच्या खोलींत जावें, आणि त्यांच्याशीं तक्रार करावी. त्यांना विचारावें कीं, पेटी विकायला तुम्ही संमति कशी दिलीत ! त्या बाबतींत तुम्हीं आईचें कसें ऐकलेंत ? माझ्या हौसेसाठीं घेतलेली पेटी विकतांना तुम्हांला कांहींच का वाटलें नाहीं ? कां असें केलेंत ?

रागाच्या भरांत ती अप्पांच्या खोलीपाशां आली. पण मनांत कांहीं तरी विचार येऊन, तेथंच थबकली. आदल्या रात्रीं, मुंबईच्या ब्लॉकसंबंधीं अप्पांशीं झालेलें बोलणें आठवून तिला वाटलें कीं ही गोष्ट अप्पांना सांगण्यांत तरी काय अर्थ आहे ? अप्पाहि त्यांतलेच. अप्पा तरी माझ्याशीं पूर्वीसारखें कुठं वागताहेत ? आपण जागेसंबंधीं त्यांना विचारलें तेव्हां त्यांनीं किती उडवाउडवी केली ! पागडीसाठीं म्हणे अनंतरावांना पैसे तयार ठेवायला सांग !...पागडी द्यायला आमच्याशीं पैसे असते तर आम्ही जागेसंबंधीं विचारलेंच असतें कशाला ? जशी आई तसेच अप्पा !

विचारांच्या भरांत ती स्वतःच्या खोलीकडे आली. आतां तिची म्हणायला एकहि वस्तू खोलींत राहिली नव्हती. ती होती तेव्हां ही खोली किती सजलेली असे ! सबंध घरांत ही खोली नेहमीं जागती असे. आणि आतां त्याच खोलीची अवकळा पहावत नव्हती. सर्व वस्तू उचलून, आवरून जागच्या जागेवर ठेवलेल्या होत्या. आणि कोपऱ्यांतली लोखंडी कॉट ? कॉटची घडी करून ती भिंतीला टेकून ठेवलेली होती. कॉटची ही तऱ्हा पाहून तिला वाटलें कीं, घरांत एवढे पलंग असतां, खोलीखोलींत प्रत्येक पलंगावर गाद्या पसरून ठेवलेल्या असतांना माझीच तेवढी कॉट काय म्हणून आवरून ठेवली ? काय म्हणून मोडून ठेवली ? तिच्या भावनाविवश मनाला वाटलें कीं ह्या कॉटप्रमाणेंच ह्या घरांतलें आपलें अस्तित्वहि आतां गुंडाळून ठेवलेलें आहे. ह्या घरांत आपल्याला आतां जागा नाहीं. घरांतल्या कोणत्याहि वस्तूवर आतां आपला हक्क नाहीं. जें आहे तें सारें माधव-वेबींसाठीं आहे. आणि असें जर आहे तर ह्या घरासंबंधीं, माणसासंबंधीं, नसती ओढ लावून घेण्यांत तरी काय अर्थ आहे ?

पुढें दोनचार दिवसांनीं दुपारच्या वेळीं ती आईला म्हणाली, "उद्यांच्या गाडीनें मी परत फिरेन, म्हणतें." आईनें हातांतलें काम आवरलें आणि आश्चर्यानें विचारलें, "म्हणजे ? एवढ्यांतच कंटाळलीस वाटतं !"

"नाहीं ग ! कंटाळायला काय झालंय् ? तूं आहेस, अप्पा आहेत, माधववेबी आहेत—मग कंटाळा कसा येईल ? पण तिकडे ते एकटे आहेत. तेहि अगदीं कंटाळून गेले असतील. आणि दोन मंगळवार झालेच कीं माझे इथें..."

"आणखी चार दिवस रहा कीं इथें. तुझ्यासाठीं पापड करणार होतें. थोडा मसाला कुटून देणार होतें—"

वासंतीला पटकन् हसूं आलें, पण तें आवरून तिनें म्हटलें, "नको नको. माधववेबींचं कौतुकाचं तुझा जीव मेटाकुटीस येतो. मुम्बईला काय साऱ्या गोष्टी विकत मिळतात !"

मुंबईला जाण्याकरितां वासंती गाडींत बसली तेव्हां नाना बेत तिनें मनाशीं रचले. आपली जुनीच जागा पण ती कशी सजवायची ह्याचा आराखडा तिनें तयार केला. जुनीं पातळें फाडून त्याचे खिडक्यादारांना पडदे कसे करायचे, खोलीच्या वरची उघडी जागा कशी बंद करायची हें सारें तिनें मनाशीं पक्कें केलं. तिला वाटलें कीं आतां खोलींत वस्तू नसल्यामुळें ती ओकी दिसेल हें खरें, पण ज्या वस्तू आपल्या नाहींत त्या वस्तू आपल्या खोलींत आणून ठेवण्यांत तरी काय अर्थ आहे ? जें आहे तें तर आपलें आहे. निश्चित आपलें आहे. थोडें झटलें आणि वाढवलें म्हणजे हां हां म्हणतां आपलेंहि घर भरुन जाईल. आपण रोज कांहींना कांहीं नवीन सुधारणा करूं आणि मग संध्याकाळीं अनंता दमूनभागून घरीं आला कीं त्याचा हात धरुन त्याला विचारूं, 'सांग बघूं—आतां कसं दिसतं आपलं घर !'

निशाण–दांडीवरलें फडकें
वाऱ्यानें पडल्यावर खालीं;
जगजेत्याच्या शवास झाकी
चलतीवर पडतीची वाकी !

R

# तुमच्यावर खटला भरला जाऊं नये

## म्हणून रेशनिंगबाबत खालील सूचना कृपा करून पाळा

(१) सात दिवसांपेक्षां अधिक काळ तुम्हांला मुंबईच्या बाहेर जावयाचें असेल तर जाण्यापूर्वी रेल्वे स्टेशनवरील कोणत्याहि 'किओस्क' मध्यें अथवा कोणत्याहि रेशन ऑफिसमध्यें आपलीं रेशनकार्डे परत करण्यास विसरूं नका.

(२) ज्याच्या नांवावर कार्ड असेल तो इसम मुंबईत नसेल तेव्हां त्याच्या कार्डावर धान्य घेऊं नका.

(३) मृत्यु पावलेल्या इसमाचें रेशनकार्ड तो मृत्यु पावल्यापासून १० दिवसांच्या आंत परत करण्यास चुकूं नका व त्या कार्डावर धान्य घेऊं नका.

(४) तुमची नोकरी सोडून गेलेल्या नोकराच्या रेशनकार्डावर रेशन घेऊं नका. अशीं कार्डे नजीकच्या वॉर्ड रेशनिंग कचेरींत परत करा.

(५) एकाच माणसाच्या नांवावरील दोन रेशनकार्डे जवळ बाळगूं नका किंवा त्या कार्डावर धान्य घेऊं नका.

(६) ज्या मुलांच्या वयाला सहा वर्षे पुरीं झालेलीं नसतील अशा मुलाचें दोन युनिटचें रेशनकार्ड काढूं नका.



अनुक्रमणिका

चीज घ्यायची म्हणजे पंचप्राणांपैकीं एकेक प्राण काढून घ्यायचा असें गवयांना वाटे. बुवांनाहि तोच अनुभव आल्यानें हें भांडार त्यांनीं फोडायचें ठरविलें.
आणि—

# साधना

केशवराव भोळे

सुमारें पाऊणशें वर्षांची ही हकीकत आहे. सावंतवाडी संस्थानांतील ओझरें या गांवाहून एक ब्राह्मणाची विधवा बाई आपल्या सहा वर्षांच्या मुलाला घेऊन, कागल येथें चरितार्थसाधनाला आली. तेथें एका श्रीमंत गृहस्थाकडे स्वैंपाकीण म्हणून नोकरीस राहिली. मुलाला तिनें मराठी शाळेंत दाखल केलें. चार वर्षेंपर्यंत हा मुलगा त्या शाळेंत चौथ्या इयत्तेपर्यंत कसाबसा शिक्षण घेत चढला. पण शाळेच्या मास्तरांनीं सांगितलें, "या मुलाचें सर्व लक्ष गाण्यांत आहे—हा सारखा गात असतो. याला गाणें शिकवा—शाळेंत याचा कांहीं उपयोग नाहीं." म्हणून त्या गांवांतच पोहरेबुवा हे दरबारगवई होते, त्यांच्याकडे मुलाला बाईनीं गाणें शिकायला ठेवलें. दोन वर्षें हा मुलगा त्यांच्याकडे गाणें शिकला. तेथून मालवणास विठोबा अण्णा हडप म्हणून फार जुने ख्यालगायक होते, त्यांच्याकडे वर्षभर गाणें शिकला. मुलगा दहा वर्षांचा झाल्यावर त्या काळच्या रीतीप्रमाणें आईनें मुलाचें लग्न करून एक भलतीच जबाबदारी त्याच्यावर टाकली. पण आईचे कष्ट त्याला बघवेनात. एक दिवस त्याच्या मनांत आलें, 'मातोश्री मोलमजुरी करून आपणास किती दिवस पोसणार? तिच्या जिवावर तरी किती दिवस रहायचें, कोठें तरी पळून जावें.' पण पुनः एक मन सांगे, 'जवळ पैसा ना अडका, जावें तरी कोठें?' त्या वेळीं सर्वत्र रेल्वेची सोय नव्हती. एकदम त्यांनीं ठरविलें कीं चालतच प्रवासाला सुरुवात करावी. मार्ग दिसेल तिकडे जाईन. 'देहं वा पातयेत् । अर्थं वा साधयेत् ।' कोणत्याहि गोष्टीचा एकदां ध्यास घेतला, म्हणजे ती साध्य होईपर्यंत त्या माणसाला चैन पडत नाहीं.

स्वावलंबी होऊन स्वतःचें नशीब उघडावयास पायीं निघालेला हा बारा वर्षांचा मुलगा—म्हणजेच रामकृष्णबुवा वझे होत! वाटेल तें करून संगीतविद्या मिळवायची व तिच्या जोरावर प्रपंचाचा भार स्वतःवर घ्यावयाचा, आणि आईला कष्टांतून सोडवायचें! पायीं चालत हा मुलगा कागलहून पुण्याला आला, तेथून मुंबई गांठली. माधवबागेंत लग्न होतें, तेथें दक्षिणेच्या आशेनें आंत शिरला तोंच प्रख्यात वीनकार बन्दे अलीखां यांची शागीर्द—चुन्ना—हिचें मधुर गाणें ऐकावयास मिळालें, व नंतर खाँसाहेबांचें वीनहि! आरंभिलेल्या कार्याला ह्या स्वर्गीय संगीताचा हा शुभशकुनच झाला जणुं. मिळालेल्या दक्षणेच्या जोरावर रामकृष्ण इंदूरला जाऊन पोंचला. तेथें नानासाहेब पानसे त्याला म्हणाले, "तुला मृदुंग अगर तबला शिकावयाचा असल्यास माझ्याजवळ रहा. गाणें शिकायचें असेल तर ग्वाल्हेरची वाट धर." नवी वाट दाखविली गेली. ध्येयप्राप्तीचें स्थान दाखविलें गेलें. मनांत हुरूप घेऊन रामकृष्ण उज्जैनीस आला. पुनः बंदेअली व चुन्ना यांचें वीन व गाणें ऐकावयास मिळालें. दिल्लीचे प्रख्यात गवयी तानरसखां, यांचें गाणेंहि ऐकावयास मिळालें. शकुनावर शकुन! रामकृष्णाचा हुरूप वाढला. उज्जैनीस नानासाहेब अष्टेकर यांच्यासमवेत तो काशीला गेला; आणि विष्णुपंत छत्रे यांच्या सर्कशींत उतरला. तेथें भूगंधर्व रहिमतखां व भावी गुरु ग्वाल्हेर दरबारचे गायक निसार हुसेन खाँ यांचें दर्शन त्याला एकाच वेळीं झालें. ध्येयपूर्ति करणारे साक्षात् गुरुच समोर दिसतांच रामकृष्णाला हर्ष झाला, हिंमत वाढली.

आतां वाटेल ते कष्ट सोशीन, संकटांशीं झुंजेन, पण ठरविलेलें ध्येय मिळवीनच असा निश्चय करून, शरीरावर वस्त्र म्हणून फक्त एक लंगोटी, पण मनांत हिंमत व नजरेसमोर ध्येय अशा सामुग्रीसह रामकृष्ण ग्वाल्हेरींत उतरला. त्या वेळचें ग्वाल्हेर म्हणजे गंधर्वनगरीच! जिकडे जावें तिकडे संगीताचे निनाद ऐकूं येत असत! त्यामुळें रामकृष्णाचे टवकारलेले कान तृप्त होऊं लागले. पण पोटांतील भुकेची आग कोण शांत करणार? आणि ती शांत झाल्याखेरीज कंठ फुटणार तरी कसा? मधुकरी अर्धवट मिळे, अन् गुरुजींच्या लहरी स्वभावामुळें मधुकरीची वेळ टळे, तेव्हां अन्नछत्रांत त्याला जेवावें लागे. ग्वाल्हेरच्या भयंकर थंडीचें निवारण लंगोटीनें कसेंबसें होत असेल, पण त्या भयंकर थंडींत पडत असलेली पोटांतील भुकेची आग मिळालेल्या अर्धवट मधुकरीनें कशी शमणार? अशा वेळीं पश्चात्तापानें त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे रहात, ध्येय पुसट होई! पण—आईची आठवण झाली कीं त्याचा निश्चय उसळून वर येई; अन् हिंमत वाढे. पुनः दुप्पट

उत्साहानं मेहनत सुरू होई. पण गुरुजी पडले परधर्मी—लहरी—व्यसनी ! शिकण्याची वेळ व काळ, या विचित्र स्वभावामुळें, अनियमित असे. लहर फिरली कीं चिडून म्हणायचे, "अबे लौंडे, तू किसलिये आया ? तुझे गाना नहीं आ सकता." तर कधीं रामकृष्णाच्या अवताराकडे पाहून म्हणायचे, "खानेको अन्न नहीं, रहनेको जगह नहीं, रोगों की समृद्धि है—और बाकी सब आबादी आबाद है !" त्यांत भरीस भर म्हणजे ग्वाल्हेरचे टवाळ लोक या दिगंबराकडे पाहून म्हणायचे, "हा मुलगा खास वेडा होणार ! लंगोटी लावून दिवसभर गांवांत फिरतो, अन् ताना मारीत असतो." तेथील सरकारी अधिकारी अन् शौकिन गवई बाळागुरुजी एके दिवशीं त्याला म्हणाले, "तूं इथें कशाला आलास ? तुला गाणें येणें शक्य नाहीं. चांगला गोरागोमटा आहेस. नाटकांत जा. अनायासें गांवांत किर्लोस्कर मंडळी आहे." रामकृष्णाचा करारी स्वभाव उसळून येऊन त्यानें बाळागुरुजींना सुनावलें, "येथें पन्नास-साठ लोक गाणें शिकत आहेत, त्यांत मीच गाणारा आहें हें लक्षांत ठेवा." मैफलींत रामकृष्ण आला, कीं बाळागुरुजींनीं म्हणावें, "या तानसेन !" तेव्हां सहन न होऊन एकदां रामकृष्ण चिडून म्हणाला, "तानसेन कांहीं जन्मतःच गायक झाले नाहींत, अन् तुम्हीहि कांहीं जन्मा-पासूनच गात नाहीं. नर करणी करे तो नरका नारायण हो जावे." नेमका याच वेळीं रामकृष्णाचा आवाज फुटला होता. पण या सर्व प्रतिकूल परिस्थितीवर निश्चयानें, मेहनतीनें, स्वप्रयत्नानें मात करून याच रामकृष्णानें त्याच निंदकांकडून "यानें आवाज काढला बुवा !" असे स्तुतीपर उद्गार काढले. आजच्या काळांतील दर महिन्याला घरच्या मनिऑर्डरची वाट पहाणाऱ्या शाळा-कॉलेजच्या विद्यार्थ्यांची विद्येची तळमळ आणि रामकृष्णाची ही तळमळ तुलना करून पहाण्यासारखी आहे. या प्रखर तळमळीच्या ध्येयवादामुळेंच रामकृष्णाचा रामकृष्णबुवा वझे झाला, भास्करचा भास्करबुवा, अन् बाळकृष्णाचा बाळकृष्णबुवा झाला. या तीन व्यक्तींनीं संगीताकरितां इतके कष्ट घेतले नसते, तर महाराष्ट्र आज उच्च संगीताच्या बाबतींत रुक्षच राहिला असता. भास्करबुवांना शिक्षणा-बाबत सरकारी अधिकाऱ्यांचा पाठिंबा तरी होता, पण दरिद्री रामकृष्णाला ग्वाल्हेरींत कोणाची मदत होती ? उलट चेष्टा, टवाळी, पाणउतारा, मानभंग त्याच्या वांट्याला सदैव यायचीं ! पण करारी रामकृष्णानें हें सारें गिळून टाकलें, निंदेचें हलाहल पचविलें अन् स्वप्रयत्नाच्या जोरावर खरोखरच आवाज काढला, तेजस्वी केला ! पुरुषार्थ गाजविला ! त्यानें परधर्मी गुरुजींची सर्व प्रकारें सेवा करावी. स्वधर्माला निषिद्ध असलेलीं कामें गुर्वाज्ञा म्हणून करावीं. गुरुजींनीं सेवेनें खूष होऊन विद्या द्यावी म्हणून. पण कांहीं वर्षे गेल्यावर प्राप्तीचा आढावा घेतला तेव्हां कळून आलें कीं, या गतीनें या गुरूपासून विद्या मिळायला अनंत काळ लागेल ! तोंपर्यंत मातोश्रीचे कष्ट चालूच ! लहरी गुरु जर विद्या देत नाहींत तर ती स्वप्रयत्नानें मिळेल तेथून अनेक मार्गांनीं घेईन असा निश्चय ठरला. ग्वाल्हेरीस बाहेरचे चांगले चांगले कलावंत, गवई येत असत. त्यांच्या मैफलींत शिरून रामकृष्णानें आपण होऊन मागें तंबोरा धरून त्यांची साथ करायला सुरुवात केली. एकाच वेळीं चीज ऐकायची, तिचा अस्ताईअंत्रा ध्यानांत ठेवून याद करायचा, रागाचें चलन-पकडायचें, ऐकलेलें आपल्या गळ्यांतून हुबेहूब काढण्याचा प्रयत्न करायचा. एवढ्या सर्व खटाटोपाला ग्रहणशक्ति केवढी तल्लख लागे, एकचित्तता केवढी ठेवावी

लागे याची कल्पनाच हीत नाहीं. पुनः हें सर्व करायला कंठ तरी सर्वस्वीं अनुकूल असावा, सहज वळणारा असावा—तर तेंहि भाग्य नाहीं. हें सर्व करीत असतांना त्यांतल्या कांहींनीं रागानें, हेटाळणीनें मागें वळून डोळे वटारावे! समोरच्या श्रोत्यांनी हसावें, कुचेष्टा करावी. तरीहि स्वावलंबनाच्या कांटेरी मार्गावर धैर्यानें, चिकाटीनें पावलें टाकीत त्यानें विद्या मिळवावी, गळा फेंकावा. सरकारी अधिकाऱ्यांनीं तंबी दिल्यावर फैजमहंमदखांनीं भास्करबुवांना विद्या दिली; इतकेंच नव्हे पण पुढील शिक्षणाची तरतूदहि दुसऱ्या उस्तादांकडे केली. बाळकृष्णबुवांना गुरूनें प्रथम धुतकारलें तरी पुढें मर्जी प्रसन्न होतांच खूप शिकविलेंहि. पण रामकृष्णाच्या नशिबीं हेंहि नव्हतें. कारण चार वर्षांत अवघ्या आठ चिजांची शिदोरी गुरुजींनीं त्याला बांधून दिली. म्हणूनच त्यानें मैफलींत घुसून क्षणाक्षणाला, कणकणानें, संगीतविद्या मिळविली; पण गुरुचरणीं पूर्ण श्रद्धा ठेवूनच, त्यांच्या सेवेंत कसूर न करतां! सेवेचा वेळ सोडल्यास तो संगीताच्या चिंतनांत, संशोधनांत, पठणांत, लेखनांत व्यग्र असे. उस्तादाजवळ एकदां एका रागांतील गीत शिकत असतांना तें रामकृष्ण टिपून घेऊं लागला—तें पाहून उस्तादांनीं विचारलें, "ये क्या है?" रामकृष्ण म्हणाला, "आठवणीकरतां लिहून ठेवीत आहें." झालें! मर्जी खफा होऊन ते गरजले, "अवे, लिखनेसे गाना नहीं आ सकता!" त्या काळीं संगीतावरील शास्त्राचे ग्रंथ, नोटेशनसह चिजा हल्लींप्रमाणें शागीर्दांना उपलब्ध नसल्यानें, बुवांनीं लिहून ठेवण्याची ही युक्ति काढली होती. चिजा म्हणजेच सूत्ररूपानें आमचें संगीतशास्त्र आहे अशी गवयाची समजूत होती. हा चिजांचा संग्रह म्हणजे त्यांना धनसंचयासारखाच वाटे. चीज द्यायची म्हणजे पंचप्राणांपैकीं एकेक प्राण काढून द्यायचा असें गवयांना वाटे. बुवांनाहि तोच अनुभव आल्यानें हें भांडार त्यांनीं फोडायचें ठरवून गवयांची साथ करून चिजांच्या द्वारें संगीतविद्या लुटण्याची तरकीब अंमलांत आणली. मैफलींत कान उघडे ठेवून एकाच रागांतील अनेक रचनांच्या, बांधणींच्या, ढंगांच्या चिजा, अप्रसिद्ध रागांतील दुर्मिळ चिजा त्यांनीं गोळा करून स्मरणार्थ लिहून ठेवल्या, त्या कंठगत केल्या. कलावंताकडून ऐकलेली रागरागिण्यांची सगळी माहिती टिपून ठेवावी. गुरुजींना तर रागाचें नुसतें नांवसुद्धां विचारण्याची सोय नव्हती. त्यांतून धीर करून विचारलेंच तर "क्या, तेरे बापके हम नौकर हैं? निकल जाव यहाँसे!" असें उत्तर मिळे.

श्रवण, ग्रहण, शोधन, लेखन व मेहनत या मार्गांनीं बुवांनीं ही विद्या स्वावलंबानें मिळविली व स्वतःकरितां अन् जगाकरितां ग्रंथरूपानें प्रसिद्धहि केली. रागनियमांचे गुणी लोकांनीं रचून ठेवलेले दोहरे बुवांनीं असंख्य ठिकाणीं अनेक व्यक्तींकडून गोळा करून याद केले, लिहून ठेवले. गप्पा मारीत असतांना त्यांच्या तोंडून ते वारंवार ऐकायला मिळत. भूपाळी व देसकार रागाचीं लक्षणें सांगणारा हा एक अर्थपूर्ण दोहरा ऐका: "भूप रागको समय रातको। प्रातःसमय देसकारको। गंधार-धैवत जोडी भूपकी। धैवतगंधार देसकारको। पूर्वरंग हैं जानो भूपको। उत्तर रंग हैं देसकारको॥" हा दोहरा त्यांनीं गोरखपूरला एका देहातीं माणसाच्या तोंडून ऐकला व त्याला म्हणायला



लवून लिहून घेतला. किती मोजक्या शब्दांत या दोन रागांचीं लक्षणें रचणारानें कुशलतेनें वर्णन केलीं आहेत! एका दुसऱ्या दोहऱ्याची बुवांना आठवण झाली. तो दोहरा असा: "षड्जमें सब राग। षड्जमें सब सूर। जो जाने ये बातको। ना होवे बेसूर॥" हा दोहरा अद्वितीय आहे! संगीताचा इतिहास सांगणारा हा एक दोहरा ऐका: पहिले तो गीत न था। खाली रागरुप। पाछे गीत कीयो। रागरंग अनुरुप॥ पहिले तो ध्रुपद भयो। पाछे भयो ख्याल। गमक धमकसे जो कोई गावे। जाने ये तो ध्रुपद अंगके ख्याल।" एक बहारीचा दोहरा ऐका: "अर्थ-भावबिन गीत न होवे। ताल-सूरबिन गीत न होवे। आत्मशुद्धिबिन ग्यान न होवे। भावी असबिन बुद्धि न होवे॥" बुवांची मार्मिक, हेतुपूर्ण व संग्राहक बुद्धि दर्शविणारीं एवढीं उदाहरणें पुरेत!

चिजांची निवडसुद्धां बुवांनीं त्या घेतांना मार्मिकपणें केली आहे. तार षड्जाशीं जाऊन येणाऱ्या मुखड्याची त्यांची मुलतानीमधील 'ये सखियां,' भीमपलासीपैकी 'तुम्हीसो' ही एका सुंदर हरकतीनें तार गंधारापर्यंत झेप घेणारी चीज, 'तिरथको' ही मनरंग घराण्यांतील तिलक-कामोदांतील निषादावरून तार षड्जाला भिडणारी प्रख्यात चीज—हीं उदाहरणें मी मुद्दाम देत आहें. कारण महाराष्ट्रीय श्रोत्यांच्या या चिजा आतां परिचयाच्या झाल्या आहेत. बुवांचें या बाबतींत मला एक नवल आणि थोडा वेगळेपणा वाटतो तो हा कीं, इतक्या विपरीत परिस्थितींत राहून हालअपेष्टा, अपमान यांच्याशीं झगडा करतांना त्यांची ही मार्मिक सौंदर्यदृष्टि अखेर तेज कशी राहिली? पण कदाचित् असेंहि असेल कीं, या दुर्मिळ पण सुंदर चिजांच्या श्रवणानें, प्राप्तीनेंच त्यांच्या अपमानित, व्यथित अंतःकरणाला दिलासा मिळाला असेल, त्यांची खचत असलेली उमेद पुनः फुलवीत होत असेल—या चिजांच्या प्राप्तीकरितां त्यांनीं सर्व उत्तर हिंदुस्थान पालथा घातला—त्यांत स्वामी विवेकानन्दांचा व बुवांचा सहवास होऊन त्यांच्या ओळखीमुळे कलकत्त्याच्या गायत्री मंत्राचा बुवांना लाभ झाला.

त्या कोणाहि नामांकित गवयी हिंदुस्थानांतील कोणत्याहि घराण्यांतील, पडदीवाल राहिला नसेल, कीं रामकृष्णबुवांनीं त्याच्यापासून चिजा व गायकी घेतली नाहीं. आणि योगायोग असा विलक्षण कीं, ज्या ग्वाल्हेरमध्यें त्यांच्या उस्तादांनीं त्यांना चार वर्षांत अवघ्या आठच चिजा शिकविल्या, त्याच उस्तादांनीं पुढील आयुष्यांत बऱ्हाणपुरीं दोन वर्षांत तीनशें चिजा दिल्या! मनरंग घराण्यांतील चिजा बुवांना जयपूरच्या महंमदअलीखांकडून मिळाल्या. कव्वालबच्चे घराण्यांतील सादक अलीखां यांचा आणि बुवांचा योग नेपाळदरबारीं नोकर होते तेव्हां आला, आणि बुवांचे आणखी एक गुरु इनायत हुसेनखां यांच्या कृपेमुळें या सादक अलीखांकडून त्यांना थोडें शिक्षणहि मिळालें. 'आवत घर आये' ही तिलककामोदांतील, नजाकतदार चीज बुवांना त्यांच्याकडूनच मिळाली. ती श्री नाटकांत चाल म्हणून पेंढारकरांना दिली. सादक अली हे ख्यालाच्या आडाचौताल, झुमरा, त्रिताल-सारख्या तालांतून बांधलेल्या ठुंबऱ्या गात असत. त्या ठुंबऱ्या म्हणजे आमच्या ख्यालाचे अस्ताई-अंतेच होत. अशा सर्व रागांतल्या ठुंबऱ्या त्यांना येत. सादक अलींनीं दिलेली काफी रागांतील 'जावो जी जावो काहे करत बरजोरी—' ही ठुंबरी एका मैफलींत बुवा गाऊं लागले तेव्हां तबलियाला व श्रोत्यांना तिची समच सांपडेना. तेव्हां बुवांनींच म्हणतांना क र त मधील 'र' या अक्षरावर टाळी दिली तेव्हां त्रितालाचा ठेका सुरू झाला व या ठुंबरीची ठसकेदार गति ऐकून श्रोत्यांनीं टाळ्या दिल्याचें आठवतें. आपल्या ग्वाल्हेरच्या मूळ गायकीवर त्यांनीं अशा अनेक गायकींचे रंग चढविले होते. कोणत्याहि महाराष्ट्रीय गवयानें इतके गुरु करून इतक्या चिजांचा व गायकींचा संग्रह केला नसेल. बुवांनीं चांगले तंतुकार ऐकले असल्यानें सतार व व्हायोलिनवर खूप मेहनत केली होती. फावल्या वेळीं या दोन वाद्यांवर ते हात फिरवीत असत. वझेबुवांचा एकच राग दोन निरनिराळ्या मैफलींत निरनिराळ्या ढंगांसह ऐकावा लागे. मल्हाराचे प्रकार ऐकावेत तर वझेबुवांकडूनच असें मर्मज्ञ म्हणत असत. बुवांनीं मात्र शिष्य व शिष्यिणी मुक्तकंठानें शिकवून तयार केल्या. एके काळीं गंधर्व नाटक मंडळीच्या नाटकांना भास्करबुवा बखले चाली देत असत, तसेंच केशवराव भोसल्यांच्या ललित कलादर्श मंडळीला वझेबुवांनीं अनेक अनवट रागांतील चाली दिल्या आहेत. तसेंच दीनानाथराव मंगेशकरांनाहि. त्या बुवा स्वभावांतहि संगीताबद्दलचे बुवांचे विचार प्रगतिपर व आधुनिक असल्यानें थिएटरांत गवयानें जलसा ठेवण्यांत, नाटकांना चाली देण्यांत बुवांना कधींच कमीपणा वाटला नाहीं. ग्रामोफोन रेकॉर्ड्स् दिल्यावर एका बुजुर्ग गवयानें त्यांना हिणवलें, "बुवासाहेब, तुमची भेटी आतां हॉटेलमध्येंहि भरतील." तेव्हां आपल्या मिस्किल अन् रोखठोक स्वभावाला अनुसरून बुवा म्हणाले, "मग, हॉटेलांत देवादिकांच्या तसबिरीसुद्धां असतात त्यांना जर कमीपणा येत नाहीं—उलट लोक त्यांच्यापुढें भक्तीनें हात जोडतात—तर माझ्याच भेटींना, कां यावा?"

तसेंच अनेक अप्रसिद्ध रागांतील चिजांचा एक संग्रह मराठी भाषेंत व प्रचारांतील रागांतील मैफलींत सहसा न गायल्या जाणाऱ्या निरनिराळ्या ठेवणींच्या व ढंगांच्या चिजांचा दुसरा एक संग्रह हिंदी भाषेंत प्रसिद्ध करून बुवांनीं महाराष्ट्रीय व भारतीय जनतेला उपकृत करून ठेवलें आहे. मराठी भाषेंतील संग्रहांत आत्मचरित्र, रागदारी संगीताचा इतिहास, कलावंतांची माहिती, चिजांच्या रागांची निरूपणासह बारीकसारीक तपशीलवार माहिती दिली असून गायकांस तीं मेहनत करतांना अतिशय मार्गदर्शी होते असा अनुभव आहे, इतकें तपशीलवार विवेचन त्यांत केलें आहे. आमरण बुवा विद्यार्थीवृत्तीनेंच राहिले. कोठेंहि चांगली चीज ऐकली कीं बुवा ती लिहून शिकून घेत असत. ग्रामोफोन रेकॉर्डमध्यें दिलेल्या चिजांच्या गायनांत झालेल्या चुकाहि बुवांनीं प्रांजलपणें कबूल केल्या होत्या व त्यांचें अनुकरण कोणीहि करूं नये असें ते बजावीत. विद्या मिळविण्यास स्वतःला कष्ट पडले तसे आपल्या शिष्यांना पडूं नयेत असेंच त्यांना वाटे. म्हणून अखेरच्या काळांत दुर्मिळ चिजा उदारपणें ते देत असत. जन्मभर संगीत सृष्टींत राहून तंबाखूखेरीज कसलेंच व्यसन त्यांनीं केलें नाहीं. "मला फक्त दोनच व्यसनें आहेत: एक गाण्याचें अन् दुसरें खाण्याचें. जो गवैय्या है सो खवैया भी होता है" असें ते म्हणत. मधुमेह असूनहि डॉक्टरी सल्ल्यावरून साखर खायचें त्यांनीं कधींच सोडलें नाहीं. कुटुंबियांच्या चरितार्थाची नीट व्यवस्था केल्यानें प्रपंचाच्या काळजींतून ते मुक्त झाले होते. विद्यार्थीदशेंतील आयुष्यांत विनोदी वृत्तीची जोपासना केल्यानें, व मन मोकळें असल्यानें बुवांची शरीरप्रकृति मधुमेह असूनहि सुदृढ राहिली होती. खणखणीत आवाजांत गावें अन् पोटभर खावें असाच जीवनक्रम त्यांनीं राखला. "कोणत्या तरी रोगानें शेवटीं मरायचेंच आहे मग संगीताप्रमाणें गोड असलेला मधुमेहच बरा." असें हसत हसत ते म्हणत असत. म्हणूनच कीं काय, अखेर खात-खात अन् गातगात त्यांनीं देह ठेवला. मुंबई रेडियो केंद्रानें बुवांच्या विद्वत्तापूर्ण गायनाचा खूप परामर्श घेतला. त्या केंद्रावर झालेल्या बुवांच्या मैफली अविस्मरणीय होत. इतका तेजस्वी, अष्टपैलू, भरतीदार, स्वप्रयत्नानें पुरुषार्थ साधणारा गवई महाराष्ट्रांत झाला नाहीं.



**भारतीय संगीतास आधारभूत असलेली तंबोऱ्याची तार एकाच रस्त्यावर आणि तीनचार दुकानांतच मिळावी ही परिस्थिति संगीताच्याच नव्हे तर समाजाच्या दृष्टीनेंहि भयावह नाहीं का ?**

# तं बो ऱ्या ची

# ता र

**वि. वा. शि र वा ड क र**

तंबोऱ्याची तार खरेदी करायला तुम्ही कधीं बाजारांत गेलां आहांत काय ? गेलां असलांत तर मी काय म्हणतों तें तुम्हांला लवकर पटेल. आपल्या बाजारपेठेची अवस्था सांप्रत काळीं फार शोचनीय झालेली आहे असा निश्चित निष्कर्ष मीं या प्रकरणावरून काढला आहे. या अवस्थेचीं कारणें नेमकीं कोणतीं आहेत याचा शोध घेणें हें कार्य माझ्या सामर्थ्याबाहेर आहे. बाजाराच्या गूढ गुंजनाचा सारा अर्थ माझ्या तर्कशक्तीला कधींच पुरता उमगला नाहीं. बाजारांतील विविध वस्तूंच्या किंमती ठरवतें कोण, त्या सर्वत्र एकाच पातळीवर रहातात कशा आणि वारें भरल्याप्रमाणें बाजार अकस्मात् कडाडतात किंवा पडतात कां, या प्रश्नांचीं उत्तरें शोधायचा मीं फारसा प्रयत्न केलेला नाहीं. परंतु इमारतीच्या बांधकामाची आपल्याला माहिती नसली तरी ती चांगली दिसते का वाईट दिसते, ती वस्तीला सोईची आहे कीं गैरसोयीची आहे हें आपण जाणूं शकतों.

बाजार ही आजच्या जगांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे याबद्दल मला वाटतें, दुमत होणार नाहीं. ज्या समाजांतील बाजारपेठ व्यवस्थित असते तो समाजहि व्यवस्थित असतो. जेथली बाजारपेठ समृद्ध तो समाजहि समृद्ध. तुम्ही स्वतः कदाचित् बाजारांत जात नसाल, मीहि कधीं फारसा जात नाहीं. आणि तरीहि तुमचें आमचें जीवन बाजारावरती अवलंबून आहे ही वस्तुस्थिति आहे. 'सारे रस्ते अखेरीं रोमला जाऊन मिळतात' या इंग्रजी म्हणीप्रमाणें माणसाच्या जीवनाचेहि सारे रस्ते शेवटीं बाजारास जाऊन मिळतात. आणि म्हणून ज्यांच्या हातीं सामाजिक व्यवहारांचीं सूत्रें आहेत त्यांनीं या गोष्टीकडे वेळींच लक्ष पुरविलें पाहिजे. या सामाजिक संस्थेची व्याप्ति दिवसानुदिवस वाढत आहे. बाजारांत दुकान खोलून बसलेले असंख्य लोक पाहिले म्हणजे या दुकानांवर गिऱ्हाईक म्हणून येण्यासाठीं कांहीं लोक जगांत शिल्लक कसे राहूं शकतात याचा अचंबा वाटतो. परंतु एका वस्तूची विक्री करणारा दुकानदार हा दुसऱ्या वस्तूची विक्री करणाऱ्या दुकानदाराचा ग्राहक असतो हें तत्त्व ध्यानांत घेतलें म्हणजे असें आश्चर्य वाटण्याचें कारण रहात नाहीं. अर्थशास्त्रानुसार समाजांतील सारे व्यवहार—पण जाऊं द्या. प्राथमिक शाळेंतील पहिल्या वर्गापासून ज्याचे हिशेब आजपर्यंत सतत चुकत आले अशा माझ्यासारख्या माणसानें अर्थशास्त्रीय सिद्धांताच्या गहन गुहांकडे पाऊल टाकण्यांत अर्थ नाहीं !

या साऱ्या कहाणीचें मूळ तंबोऱ्याच्या तारेंत आहे. कांहीं कामानिमित्त मी एकदां मुंबईला जायला निघालों. मुंबई हें शहर असें आहे कीं जेथें अनेकांचीं अनेक कामें सतत गुंतून पडलेलीं असतात. काम फार, पण जाणारे थोडे. त्यामुळें जे थोडे लोक जाणारे असतात त्यांना आपल्या कामाबरोबर इतरांचींहि कामें बहुधा बरोबर न्यावीं लागतात. मी जायला निघालों तेव्हां माझे एक गायक मित्र घाईगर्दीनें माझ्याकडे आले.

"तुम्ही मुंबईला जाणार आहांत असं ऐकलं." ते म्हणाले.

"होय, खरं आहे !" मीं कबुलीजबाब दिला.

"केव्हां जाणार ?"

"आत्तां, जरा वेळानं."

"परत केव्हां येणार ?"

"परवां."

"छान ! आमचं काम झालं !" ते आनंदानें उद्गारले. माझ्या आज जाण्यानें व परवां येण्यानें यांचें काम कोणतें व कसें होऊं शकेल हें माझ्या लक्षांत येईना. माझी ही अडचण ओळखून त्यांनींच तावडतोब खुलासा केला.

"आम्ही तुम्हांला एक काम सांगणार आहोंत!"

"सांगा कीं!"

"माझ्या तंबोऱ्याच्या तारा आणायच्या आहेत, तेवढ्या घेऊन याल तर बरं होईल!"

"अवश्य!"

"म्हणूनच म्हटलं, आमचं काम झालं! तुम्ही आमचं काम करणार नाहीं असं कधीं होणारच नाहीं!" गवईबुवा आम्हां उभयतांतील सौहार्द सूचित करून म्हणाले. मला त्यांस दुजोरा देणें आवश्यकच होतें.

"वा वा! तुमचं काम करणार नाहीं असं कधीं होईल काय?"

"दोन दिवसांनीं आमची बैठक आहे. त्यापूर्वी तंबोरा तयार हवा—"

"हो तर! तंबोऱ्याशिवाय काय?"

"परवा तो हा गेला," गवई म्हणाले. "पण त्याला मीं सांगितलं नाहीं. त्याला कांहीं कळत नाहीं यांत. तंबोरा कशाशीं खातात हें देखील त्याला समजत नाहीं!"

मी उपहासानें हसलों. तंबोरा ही खाण्याची वस्तु नाहीं याच्याविषयीं तरी मला मुळींच शंका नव्हती.

"शिवाय म्हटलं, तुम्हांला मुंबईची माहिती चांगली आहे. तुम्ही राहिलेले तिथें! म्हणून अधिक सांगायची कांहींच जरूरी नाहीं!"

"छे छे, मुळींच नाहीं!" माझ्या मुंबईच्या ज्ञानावर त्यांनीं शिक्कामोर्तब केलें हें पाहून मी संतुष्ट झालों. "बरोबर घेऊन येतों. कांहीं काळजी करूं नका!"

तात्पर्य हें कीं, मुंबईला निघतांना तंबोऱ्याच्या तारा आणण्याची एक महान् जबाबदारी शिरावर घेऊन मी निघालों. हळुहळू या जबाबदारीचें स्वरूप माझ्या ध्यानांत येऊं लागलें. आगगाडींत बसल्यावर तंबोऱ्याच्या तारेचें संगीतच माझ्या डोक्यामध्यें रुणझुणत होतें. त्या गोष्टीपुढें माझ्या स्वतःच्या कामाचाहि मला विसर पडूं लागला. आणि हें सारें होण्याचें कारण म्हणजे तंबोरा आणि त्याच्या तारा या विषयासंबंधींचें माझें ज्ञान खरोखरीच फार मर्यादित होतें. तंबोऱ्यांत कुठें तरी भोपळ्याचा संबंध असला तरी तो खात नाहींत एवढेंच माझी माहिती निश्चित स्वरूपाची होती. गवई त्या दुसऱ्या मित्रापेक्षां—ज्यांना त्यांनीं हें काम सांगितलें नाहीं—मी अधिक वरचढ होतों यांत शंकाच नाहीं. इतरहि थोडीशी माहिती मला होती. गाणें कळणाऱ्या भाग्यवंतांतील मी नसलों तरी गाणें आवडणाऱ्या रसिकांत माझी गणना होऊं शकेल असें मी मानतों. त्या दृष्टीनें गाण्याच्या अनेक बैठकी मीं ऐकलेल्या व पाहिलेल्या आहेत. अभिजात गवई पं. जवाहरलाल नेहरूंप्रमाणें वाजाच्या पेटीकडे तिरस्कारानें पहातात व तंबोऱ्याकडे आदरानें पहातात, मोठ्या गवयाला साथीसाठीं दोन तंबोरे पाठीशीं लागतात, तंबोरे धरणारे अधूनमधून गात असले तरी खरे गाणारे ते नसतात, तंबोऱ्यावर साती स्वर काढतां येत नाहींत वगैरे स्थूल गोष्टी मीं तर्कानें जाणलेल्या होत्या. परंतु एवढी माहिती तंबोऱ्याच्या तारा आणायला पुरेशी होईल का?

हें असें नेहमीं होतें. ज्या विषयांत आपली फारशी गति नाहीं त्यांत आपण पारंगत आहोंत असा आविर्भाव इतरांच्या मुर्वतीखातर अनेकदां आपल्याला करावा लागतो. एका गृहस्थाची हकीकत मीं ऐकली आहे. हा गृहस्थ एका दैनिकांत उपसंपादक म्हणून काम करीत असे. वृत्तपत्रामध्यें साऱ्याच विषयांचा, विशेषतः राजकीय विषयांचा परामर्श घेतला जातो. पांच पायांच्या वासरापासून सापेक्षतावादाच्या सिद्धान्तापर्यंत सारेच विषय लांबरुंद मथळे पांघरून वर्तमानपत्रांत मिरवीत असतात. जें वृत्तपत्रांत नाहीं तें जगांत नाहीं अशी आज तरी स्थिति आहे. यामुळें बाहेरच्या लोकांची पुष्कळदां अशी कल्पना होते कीं, वर्तमानपत्रांत काम करणारीं साधींच माणसें सगळ्याच विषयांत माहीतगार व तज्ज्ञ असतात. अशा कांहीं लोकांनीं वरील गृहस्थाला आपल्या गांवीं व्याख्यानासाठीं बोलावलें. येथपर्यंत सर्व ठीक होतें, परंतु विषयहि त्या लोकांनींच सुचवला व त्यांच्या भिडेखातर या गृहस्थासहि तो पत्करावा लागला. विषय होता मार्क्सवादाचीं मूलतत्त्वें...किंवा अशाच आशयाचा अन्य कांहीं. अशा विषयावर बोलायला त्याचें तांत्रिक व निश्चित ज्ञान असायला पाहिजे हें उघड आहे. या गृहस्थांजवळ तें फार थोडें होतें, म्हणजे जवळजवळ अजिबातच नव्हतें. परंतु नाहीं म्हणायला अवघड वाटल्यानें त्यानें होकार दिला होता. गांवांतील शेंकडों सज्जन गंभीर चेहरे करून मार्क्सवादाचीं मूलतत्त्वें ऐकायला बसले. वक्ते व्यासपीठावर उभे राहिले, पण मार्क्सवादाचीं मूलतत्त्वें कांहीं जवळपास फिरकेनात. आकाशांतून उडत येणाऱ्या म्हाताऱ्याप्रमाणें तीं अचानक वाटेल त्या ठिकाणीं येऊन थोडींच दाखल होणार? वक्त्यांनीं पांचदहा मिनिटें आभार, आनंद, श्रीमंत, गरीब वगैरे शब्दांची कांहीं तरी कसरत केली व दहाव्या मिनिटाला क्षमा मागून ते खालीं बसले! माझ्यावरहि एकदां असाच प्रसंग ओढवला होता...परंतु मी सांगत होतों तें तंबोऱ्यासंबंधीं.

समाज-विकास-योजना : : नवे रस्ते



अर्थात् धनोत्पादनाचे नवे मार्ग!

माझ्या मनांत साशंकता निर्माण झाली हें वरती सांगितलेंच. ही साशंकता तंबोऱ्याच्या तारा आपल्याला चांगल्या आणतां येतील कीं नाहीं यासंबंधीं होती. परंतु मुंबईच्या बाजारपेठेंत पाऊल टाकल्यावर आपल्याला त्या मिळतील कीं नाहीं याच्यासंबंधींच मी साशंक झालों.

मुंबईस पोहोंचल्यावर रात्रीं मीं विश्रांति घेतली व दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं तंबोऱ्याच्या तारा आणण्यासाठीं बाहेर पडलों. मी दादरला मुक्कामाला होतों. तेव्हां दूरवर न जातां दादरच्या बाजारांतूनच तारा आणाव्यात, फार तर अर्धा तास त्यासाठीं लागेल, नंतर आपण आपल्या उद्योगाला लागावें असें मीं ठरविलें. दादर आणि त्यानंतर परळ, लालबाग वगैरे भागांतील रस्त्यांवरती सुमारें तीन तास

पायपीट केल्यावर तंबोऱ्याच्या तारेसंबंधींचें एक हृदयविदारक सत्य माझ्या ध्यानांत येऊं लागलें. आणि तें म्हणजे ही वस्तु फार दुर्मिळ आहे हें होय. बाजारपेठेच्या शोचनीय अवस्थेविषयीं मीं जे विचार प्रारंभीं सांगितले त्यांची उगमहि या प्रवासांत, त्यांत आलेल्या अनुभवांत आहे.

आतां तंबोऱ्यासंबंधीं माझें ज्ञान अल्प असलें तरी ही वस्तु कांहीं सामान्य नव्हे. भारतीय पुराणग्रंथांमध्यें तंबोऱ्यांचा आणि तें वाजविणाऱ्यांचा उल्लेख आहे. पुराणांत नारदाबरोबर तुंबरूचाहि महान् गवई म्हणून गौरव केलेला आहे! नारद वीणा वाजवीत असले तरी तुंबरू हे तंबोरा वाजवीत असावेत, हें त्यांच्या नांवावरूनहि सिद्ध होतें. आपल्या अभिजात गायनकलेची सारी इमारत तंबोऱ्याच्या तारेवर उभारली आहे असें जाणकार सांगतात. या क्षणाला भारतामध्यें तंबोऱ्यांच्या सहस्रावधी तारा वाजत असतील व तुटतहि असतील. असें असतांहि आमच्या समाजानें, आमच्या बाजारपेठेनें तंबोऱ्याच्या तारेविषयीं इतकी अनास्था दर्शवावी हें खेदजनक नाहीं काय?

या अनास्थेचा मला आलेला प्रत्यय फार कष्टदायक होता. अपेक्षा कमी असल्या तर अपेक्षाभंगाचें दुःखहि कमी असतें. उलट अपेक्षा फार वाढलेल्या असल्या तर पुढें येणाऱ्या सुखाचे रंगहि मलूल होतात. ताजमहालासंबंधींची आपली प्रतिक्रिया एका लेखकानें अशीच सांगितली आहे. उत्तुंग अपेक्षांचें एवढें मोठें स्वप्न घेऊन तो ताजमहालासमोर गेला कीं त्या सौंदर्याच्या दर्शनसुखापेक्षां त्यानें केलेल्या अपेक्षाभंगाचें दुःखच प्रथमतः त्याला सहन करावें लागलें. मी तंबोऱ्याच्या तारा आणायला बाहेर पडलों तो अशाच मोठमोठ्या अपेक्षा बांधून. आणि म्हणूनच तीन तासांनंतर ही चीज दुर्लभ असल्याचें मला कळलें तेव्हां माझ्या पायांबरोबरच माझें मनहि कष्टी झालें.

माझी अपेक्षा अशी होती कीं, पावलापावलावर नाहीं तरी सुमारें प्रत्येक एकदोन फर्लांगांत तंबोऱ्यांचें दुकान असेल. पायतणांच्या दुकानावर मोठी थोरली चप्पल लावलेली असते त्याप्रमाणें या दुकानावर एखादा भलामोठा तंबोरा बाहेर लोंबकळत असेल, गंगावनांप्रमाणें तंबोऱ्याच्या तारांचे जुडगे दुकानीं लावलेले असतील व दारावरती 'तंबोऱ्याच्या तारांबाबत येथें सर्व व्यवहार सचोटीनें केले जातील' अशी झळझळीत पाटी असेल. जाणत्याच्या आविर्भावानें आपण दुकानदाराशीं बोलणें करूं, तार हातानें चाळवून पाहूं, नुसतीच वाजत असेल तर वाजवूनहि पाहूं आणि ती नापसंत असल्याचें दर्शवून पुढच्या दुकानांत प्रवेश करूं. अशीं पांचसात दुकानें पाहिल्यावर तार खरेदी करूं. म्हणजे गवई मित्राला, चार ठिकाणीं बरेंवाईट पाहून ही तार आणली असें सांगायला हरकत नाहीं! आपल्या जाणतेपणासंबंधींचा त्यांचा आदर तेवढाच अधिक वाढेल. पण कसलें काय? फर्लांगामागून फर्लांग, मैलांमागून मैल मागें टाकले तरी तंबोऱ्यांचें किंवा तंबोऱ्यांच्या तारांचें एक दुकान म्हणून कुठें आढळलें नाहीं.

तंबोऱ्याच्या तारेसाठीं दुकानांवरील पाट्या पहात मी प्रवास करीत होतों आणि प्रत्येक दोनतीन घरांआड मला उपाहारगृह किंवा केस कापण्याचें दुकान आढळत होतें. हीं दुकानें इतकीं बहुसंख्य, किंबहुना असंख्य आहेत याची जाणीव इतक्या तीव्रतेनें मला आतांपर्यंत कधीं झाली नव्हती. हीं दुकानें पाहिल्यावर, खाण्याचा प्रश्न हा मानवी जीवनांतील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न कसा हें तावडतोब प्रत्ययास येई. परंतु खाण्याच्या खालोखाल दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे केस कापण्याचा, ही गोष्ट मनांत बिंबायला जरा अवघड आहे. दुकानांवरूनच निष्कर्ष काढायचा

त्र् ही गोष्ट मान्य करण्यावांचून गत्यंतर नाहीं. या दुकानांची संख्या व गर्दी पाहिल्यावर असें वाटतें कीं, शहरांतले बहुतेक लोक प्रथम केस कापून घेतात, नंतर उपाहारगृहांत जाऊन चहाफराळ करतात, चहापाणी घेत असतांना पुन्हा केस वाढतात म्हणून लगेच पुन्हा केस कापायच्या दुकानांत जातात व तिथें केस कापतांना पुन्हा भूक लागली म्हणजे परत उपाहारगृहांत येतात! असा कांहीं तरी हा अखंड उद्योग असावा. परंतु वस्तुस्थिति अशी नाहीं हें आपल्याला ठाऊक आहे. म्हणूनच मी म्हणतों कीं, सामाजिक परिस्थिति आणि आपली बाजारपेठ यांत भयंकर मोठी विसंगति निर्माण झाली आहे. माणसाला उपाहार मिळायला पाहिजे हें जितकें खरें, त्याचे डोक्यावरचे केस कोणीं तरी अधून मधून कापले पाहिजेत हें जितकें खरें, तितकेंच हेंहि खरें कीं त्याला तंबोऱ्याच्या तारेहि विनासायास मिळाल्या पाहिजेत. समाजाच्या सर्व गरजा बाजारपेठेनें भागवल्या पाहिजेत.

तारा मिळत नाहींत असें पाहून मी ईर्षेला पडलों. लालबागला बसमध्यें बसून मी ग्रँटरोडला गेलों. ग्रँटरोड पाहिला, गिरगांव रस्ता ओघितला, नंतर कोटांत जाऊनहि स्वैर संचार केला. पण कोठल्याहि दुकानावर 'येथें तंबोरे मिळतील' अशीं अक्षरें मला दिसलीं नाहींत. हा उद्योग मला रात्र होईपर्यंत पुरला. तारेच्या मृगजळामागें लागल्यानें माझें स्वतःचें कामहि तसेंच राहून गेलें. परंतु रात्रीच्या गाडीनें गांवीं परत जाणें भाग असल्यानें, तंबोऱ्याच्या तारेचा अथवा माझ्या कामाचा अधिक विचार न करतां मी बसमध्यें बसलों व दादरला परत आलों.

जेवतांना मी माझ्या मित्राला म्हणालों, "का रे, मुंबई शहरानं तंबोऱ्यावर बहिष्कार टाकलेला आहे का?"

"म्हणजे?" तो उद्गारला.

"आज तंबोऱ्याच्या तारेसाठीं मुंबईतले निम्मे रस्ते पायाखालीं घातले, पण कुठेंहि दिसली नाहीं ती!"

"सारी मुंबई पालथी घातली असतीस तरी काय उपयोग?" माझा मित्र हसत म्हणाला, "विशिष्ट वस्तूसाठीं विशिष्ट जागींच जायला हवं. सँढर्स्ट रोडला तीनचार दुकानं आहेत. तिथं मिळाली असती!"

सँढर्स्ट रोड! माझ्या सर्वंकष फेऱ्यांतून तोच रस्ता नेमका राहिला होता. माझ्या मित्रानें माझ्याप्रमाणें जाणकारपणाचा खोटा आव आणला असेल असें मी मानीत नाहीं. सँढर्स्ट रोडवर तंबोऱ्याचीं दुकानें असतील. नाहीं असें नाहीं. परंतु तरी माझी तक्रार कायमच आहे. भारतीय संगीतास आधारभूत असलेली तंबोऱ्याची तार एकाच रस्त्यावर आणि तीनचार दुकानांतच मिळावी ही परिस्थिति संगीताच्याच नव्हे तर समाजाच्या दृष्टीनेंहि भयावह आहे.

गांवीं गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळीं गवईबुवा दारांत दत्त म्हणून उभे राहिले.

"आमचं काम झालं असेलच!" ते उत्साहानं म्हणाले.

सारी भीडमुर्वत बाजूला सारून मी वैतागानें उद्गारलों, "तुमचं तर काम झालं नाहींच, पण माझंसुद्धां काम झालं नाहीं! आणि तें या तंबोऱ्याच्या तारेपायीं!"



## मीं कधींच नाहीं म्हटलें

मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन
होत्या लाटा उधळित अपुली फेनिल कविता,
फुलाफुलांतुन अखंड उमलत होती नवता,
होते वारे वहात, तारे होते चमकत,
बाभळिवरही गुच्छ फुलांचे होते लगडत,
रे कसें वेगळें म्हणूं सांग तुज यांच्यापासुन!
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन!!

उठुनि पहाटे जावें तर तूं रंगच व्हावें
नभीं पहावें तर तूं ढग होऊन झुलावें
या धारांतुन तुझे कृपामय हात दिसावे
किरणांच्या अधरावर स्मित तव फुलत असावें
हें डोळे भरुनी बघतों आहें सारें अनुदिन
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन!!

तूं नाहिंस? या वसंतांतुनी कोण फुले मग?
तूं नाहिंस? दंवबिंदुंत कां मग झगमग झगमग?
तुझ्यावांचुनी बीजामधुनी कोण फुले रे?
तुझ्यावांचुनी रंगांमधुनी कोण खुले रे?
मीं कधिं न पाहिलें तुझें निराळेंपण त्यांच्याविण
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन!!

हेलावे जलसागर माझ्या अंवतीं भंवतीं
खरें सांग हीं नाना रूपें तुझींच नव्हतीं?
मनामनांतुन त्यांच्या होती तुझी चेतना
कर्माकर्मांमधून होती तुझी प्रेरणा.
मीं कसें उणें तुज करूं त्यांचिया सुखदुःखांतुन?
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन!!

तुला पाहिलें ऋतूऋतूंतुन, फुलांफळांतुन,
त्या गगनांतुन, या मातींतुन, स्थितीगतींतुन
संघर्षांतुन, सुखदुःखांतुन, व्यथेव्यथेंतुन,
या सृष्टींतुन अन् भंवतींच्या मानवतेंतुन,
रे कसें शोधुं तुज वेड्यापरि मी तुलाच टाकुन?
मीं कधींच नाहीं म्हटलें कीं तूं दे मज दर्शन!!

—मंगेश पाडगांवकर

इसापनीतींत नसलेली पण...

# अविस्मरणीय तात्पर्य असलेली एक गोष्ट !



मुंबई नजीक एक तारूं एका खडकास आपटून फुटलें. त्या तारवावर एक माकड होतें. तें समुद्रांत पडून गटंगळ्या खाऊं लागलें. तें मनुष्य असावें असें समजून एक मोठा देवमासा त्याच्या मदतीस आला आणि त्यास आपल्या पाठीवर घेऊन किनाऱ्याकडे चालला. वाटेंत तो त्या माकडास पुसतो, "अरे मनुष्या, तुझा गांव कोणता?" माकडानें उत्तर केलें, "मी पुण्याचा राहणारा." देवमाशानें प्रश्न केला, "मग तुला पुण्याच्या गेस्ट हौसची माहिती आहे का?" आपण मनुष्य आहों एवढेंच नव्हे तर आपण पुणेंकर आहों अशी जी देवमाशाची समजूत झाली आहे ती पक्की करावी म्हणून माकडानें उत्तर दिलें, "पुण्याचें गेस्ट हौस ना ? त्याच्याविषयीं काय विचारतां ! पर्वतीच्या एका उंच शिखरावर संगमरवरी दगडानें बांधलेल्या त्या प्रासादतुल्य इमारतीला पाचूच्या पायऱ्या आहेत. तिथें चंदनाचे पाट आहेत, सोन्याच्या ताटवाट्या आहेत...." "बस् बस् ! पुढें बोलूं नकोस !" देवमासा ओरडला. माकडाच्या या लंब्याचवड्या भाषणाचा देवमाशास इतका राग आला की त्यानें त्या माकडास तावडतोब समुद्रांत लोटून दिलें. गटंगळ्या खाऊन आतां तें माकड मरणार असें पाहून किनाऱ्यावरून तें दृश्य पहात असलेल्या पू० कर्मवीर अनंतराव गद्रे यांस त्याची दया आली व त्यांनीं समुद्रांत उडी टाकून त्या माकडास वर काढलें !

तात्पर्य—खोटें भाषण केल्यानें कधीं कोणाचे कल्याण झालेलें नाहीं. '**पूना गेस्ट हौस**' हें पुण्याच्या मध्यवस्तींत म्हणजे लक्ष्मीरोडवर असलेलें एक आदर्श आणि सुप्रसिद्ध भोजन-निवास-स्थान आहे. हें लोकांना माहित असतां त्याची विनाकारण अवास्तव स्तुति करण्याचें काय प्रयोजन ?



अनुक्रमणिका



थिएटरच्या पोर्चमध्यें दादासाहेब निंबाळकरांची तांबडी क्रिस्लर गाडी उभी राहिलेली मला दिसली. गाडींतून उतरलेले दादासाहेबहि दिसले. त्यांच्याबरोबर कोणी नव्हतं. त्यांना सिनेमाचा फार षोक होता, पण बायकोला घेऊन येऊन तिच्याबरोबर म्हणण्याचा नव्हता. जेव्हां जेव्हां ते मला सिनेमाच्या थिएटरांत दिसले होते तेव्हां तेव्हां एकटे दिसले होते. रंगेल म्हणून प्रसिद्ध असलेला हा म्हातारा जिला आठ मुलं झालीं होतीं अशा म्हाताऱ्या, तरुणपणीं जें कांहीं रूप असेल तें घालवून बसलेल्या बायकोला कशाला बरो-बर घेऊन मिरवील, असं माझ्या मनांत नेहमीं आलं होतं. त्याप्रमाणं आतांहि आलं. ते पायऱ्या चढून वर आले. आपलं टक्कल पडलेलं मस्तक गिरेबान कबुतरासारखं एका बाजूला झुकवून, नेहमींच्या संवयीप्रमाणें आखूड काप-लेल्या पांढऱ्या मिशा डाव्या हाताच्या बोटांनीं कुरतडीत, आणि 'यार्डले'च्या उंची लव्हेंडरचा भपकारा सोडीत ते थिएटरच्या मुख्य प्रवेशद्वाराकडे निघाले. त्यांची माझी दृष्टादृष्ट झाली. स्टॉलसचीं दोन तिकिटं काढण्यासाठीं मी रांगेत उभा होतों. तिकिटांना लागणारी रोकड माझ्या मुठींत होती. 'खिसेकापूपासून सावध रहा' या अर्थाची इंग्रजी पाटी वाचली असल्यामुळें मूठ उघडण्याची माझी इच्छा नव्हती. डाव्या हाताच्या मुठीवर उजवा पंजा ठेवून, दोन्ही हात उचलून मीं झाकल्या मुठीचा नमस्कार ठोकला. कंबर पुष्कळच वाकवून पुढं झुकण्याची देखील दक्षता घेतली. "स्टीम नॅव्हिगेशन कंपनी'त नोकरी मिळवण्याच्या खटपटींत मी होतों आणि दादासाहेब निंबाळकर माझी जोराची शिफारस करतील तर मला हवी असलेली नोकरी सहज मिळून जाणार होती हें मी कसं विसरेन ?

म्हणजे विसरण्याचा माझा स्वभाव नव्हता असं नव्हे, परंतु सुमित्रेनं मला नेहमीं शिकवून पढवून माझ्या स्वभावांतला दोष मला टाकायला लावलं होतं. पुरुषांना सुधारण्यासाठीं आपला अवतार आहे अशी सगळ्याच बायकांची समजूत असते कीं काय तें सांगण्याइतका बायकांचा व्यापक अनु-भव मला नाहीं. परंतु माझं अन् सुमित्रेचं लग्न झाल्यापासून सुमित्रा मला सारखी सुधारीत होती एवढं खरं. तिच्या शिकवणुकीमुळें मी सुधारत आहें असं जों जों तिला अधिकाधिक वाटत होतं तों तों ती माझ्यावर अधिकाधिक प्रेम करीत होती. आणि तिला खुष ठेवण्याची ही विशेष कठीण नसलेली युक्ति माहीत झाल्यामुळें मीहि आपल्या वर्तनांत सुधारणा दाखवीत होतों. बायकांची मोहोबत राखण्यासाठीं सारेच पुरुष असं नाटक करतात कीं काय हें सांगण्याइतका पुरुषांचाहि व्यापक अनुभव मला नाहीं. माझ्यापुरतं मी सांगतों. सुमित्रा मला नेहमीं पढवी, "वसंत, माझं ऐक. ऑफिसांतल्या वरिष्ठांशीं, ज्यांच्या वशिल्यानं आपलीं कामं साधण्यासारखीं आहेत त्यांच्याशीं ताठ्यानं वागत जाऊं नकोस. तूं हुशार आहेस, फर्स्ट क्लास एम्. ए. आहेस, सगळं कांहीं आहे, पण आयुष्यांत वर वर चढण्याची कला वेगळीच आहे." त्या कलेची फोड करून ती मला धडे देई. तिच्या हाताखालीं आयुष्यांत वर वर चढायला मी अधिकाधिक लायक होत होतों. सुमित्रेचं




# वर चढण्याची कला

ना. सी. फडके

तूं हवीस म्हणजे अगदीं सगळी सगळी हवीस. तुझ्या
शरीराचा आणि मनाचा अंशन् अंश
माझा—
माझ्या एकट्याचा आहे असं
मला वाटलं पाहिजे.

हें 'कोचिंग' मला मिळालेलं नसतं तर दादासाहेब निंबाळकरांना मीं कांहीं नमस्कार केला नसता. परंतु ते जवळ येऊं लागलेले दिसल्याबरोबर माझं मन म्हणालं होतं, वेड्या, तुला वर वर चढायचंय ना ? वाक, आणि कर नमस्कार ! 'माणसाला जितकं वर चढायचं असेल तितकं त्यानं खालीं वाकलं पाहिजे'— हें सुमित्रेच्या अनेक सूत्रांपैकीं एक सूत्र होतं. अडचणींत रांग धरून उभा असतांनाहि, आणि रोकड पैशावर दाबलेली मूठ उघडतां येत नसतांनाहि मीं दादासाहेब निंबाळकरांना कुर्निसात कां केला तें आतां तुमच्या लक्षांत आलं असेल.

दादासाहेबांनीं माझ्याकडे पाहिलं. त्यांच्यासारखा बडा माणूस मला उलट बंदगी थोडीच करणार ? त्यांनीं आपली गिरेबाज मानहि सरळ केली नाहीं, किंवा मिशा कुरतडणारीं बोटंहि दूर केलीं नाहींत. डोळे मात्र उडविले आणि "हॅलो" असंहि म्हणाले हें माझं केवढं भाग्य ! तेवढ्यावरून मीं मनाशीं खूणगांठ बांधली कीं दादासाहेब निंबाळकरांची मर्जी संपादन करण्याची मला आशा होती. 'स्टीम नॅव्हिगेशन कंपनी'कडे अर्ज टाकण्याचा माझा विचार त्यांना सांगायला आणि जोराचं खाजगी शिफारसपत्र द्या असं म्हणायला कांहीं हरकत नव्हती... मनांतल्या या विचारांनीं मी जरा खुषींत आलें.

तितक्यांत मागून कुणी तरी माझ्या कोटाखालच्या बरगड्या दाबल्या आणि म्हटलं, "अहो, उभे काय राह्यलां ? पुढें सरका कीं.. तुमची पाळी आली. तिकीट घ्या."

मी भानावर आलों, पुढें सरकलों, "दोन स्टॉल" म्हणून खिडकींत पैसे ठेवले, जांभळ्या कागदाचे दोन तुकडे हातांत घेतले, नितक्यांत मागून कुणी तरी सभ्य गचांडी दिली. ती मनावर न घेतां गर्दीच्यापुढून सरकलों. आणि दूर बाजूला सुमित्रा उभी होती तिच्याकडे घाईघाईनें जाऊं लागलों.

पाहतों तों रंगेल म्हातारे दादासाहेब सुमित्रेशीं कांहीं तरी बोलून मोठ्यांदा हसत तिच्यासमोर उभे होते. समोर म्हणजे व्यवस्थित अंतरावर नव्हे, जवळ जवळ तिला खेटून !

मला अर्थातच ती गोष्ट बिल्कुल आवडली नाहीं.

सुमित्रेसारखी देखणी बायको तुम्हांला मिळाली आहे अशी कल्पना करा, तुमचं लग्न होऊन नुकते कुठं सात आठ महिने झाले आहेत अशीहि कल्पना करा आणि सांगा, दादासाहेबांचं तें सुमित्रेपुढें खेटून उभं राहणं, बोलणं आणि हसणं मला आवडलं नाहीं यांत माझी कांहीं चूक झाली काय ? तुमची बायको तरणीताठी आणि देखणी नसली तरी देखील अशा प्रकारचा तुम्हांला राग येईल कीं नाहीं सांगा. माझी सुमित्रा तर ऐन तारुण्यानें मुसमुसणारी आणि सुंदर होती. मग मला राग आल्यावांचून कसा राहील ?

मी दादासाहेबांकडे चांगले डोळे फाडून पाहणार होतों आणि—

परंतु तितक्यांत—

सुमित्रेनें मलाच चोरटा डोळा घातला !

निमिषमात्राचीच तिच्या डोळ्यांची ती हालचाल ! परंतु तेवढ्या त्या हालचालींत एका प्रदीर्घ व्याख्यानाचा अभिप्राय होता. 'हां वसंत ! बेतानं बेतानं ! तुला कसला राग आलाय मी ओळखतें. परंतु मस्तक थंड ठेव ! तुला वर वर चढायचं आहे. 'स्टीम नॅव्हिगेशन कंपनीं'तली मोठ्या पगाराची चांगली नोकरी मिळवायची आहे. जरा वाकलं पाहिजे ! जरा सोसलं पाहिजे ! नीट बोल या दादासाहेबांशीं !

डोक्यांत उसळणारा सारा राग थंड करणं भाग होतं मला. त्याप्रमाणें

लो केला. मनाला असंहि शिकवलं कीं, अरे, हा रंगेल बुड्ढा तुझ्या बायकोशीं विनोदानं बोलण्याचं सुख घेत असेल तर घेई ना कां? तो कांहीं तिला पळवून तर नेत नाहीं ना?...

दादासाहेबांना एकदा नमस्कार केला होता तरी पुन्हा अंग दुमडलं, हात जोडले, दांत काढले, आणि नम्रतेचा करवेल तेवढा कडेलोट करून अगदीं दरबारी हळू स्वरांत विचारलं, "काय, आपण पिक्चर पाहयला आलां?"

"होय. फारच उत्तम पिक्चर आहे म्हणून ऐकलंय." दादासाहेब म्हणाले. "तिकिटांच्या खिडकीजवळ पाहिलं मीं तुम्हांला. मला वाटलं एकटेच आलां असाल. पण पाहतों तों या इथें उभ्या असलेल्या दिसल्या!"

अस्सं! म्हणजे मी एकटा असतों तर माझी किंमत नव्हती तुम्हांला! माझ्याशीं कांहीं बोललां नसतां तुम्ही. पण माझी देखणी बायको मजबरोबर आहे म्हणून माझे स्टॉक्स वधारले आणखी आंत पाऊल टाकण्याऐवजीं उभे राहिलांत होय!...इत्यादि विचारांचं तुफान माझ्या डोक्यांत ऊठूं लागलं. पण सुमित्रेनें मला पुन्हा चोरटा डोळा घातला! मीं डोक्यावर पाणी घातलं. पुन्हा दांतसुद्धां विचकले, आणि दादासाहेबांशीं कांहीं गोड बोलण्यासाठीं तोंडदेखील उघडलं.

पण तितक्यांत माझ्या हातांतलीं निळीं तिकिटं पाहून दादासाहेब मला म्हणाले, "अरे, दोघं मिळून येतां आणि स्टॉलमध्यें कसलीं बसतां?" त्यांनीं माझ्या हातांतलीं तिकिटं काढून देखील घेतलीं.

मी क्षणभर चाटच पडलों. मनांत आलं, या संधीचा फायदा घेऊन दादासाहेबांना म्हणावं, 'स्टीम नॅव्हिगेशन कंपनींतली साडे तीनशें पगाराची नोकरी मिळवून द्या मला म्हणजे मग—

पण दादासाहेब म्हणाले, "आपण तिघं एकत्र बसूं. मी घेतों बदलून तुमचीं तिकिटं." मग त्यांनीं आपल्या दृष्टिक्षेपांतून मला कटापच केलं, आणि सुमित्रेकडे बघत हसून ते म्हणाले, "या, या."

आणि सुमित्राहि त्यांच्या मागोमाग निघाली! माझ्याकडे तिनें एकदां बघायचं तरी! पण छे! जणुं ती दादासाहेबांच्याबरोबरच सिनेमाला आली होती. आणि मी दादासाहेबांचा चपराशी किंवा फार तर प्रायव्हेट सेक्रेटरी होतों! त्यांच्या मागोमाग मी मुकाट्यानें जाणार अशी त्यांची खात्री होती. मी येतों कीं बाहेरच मागें राहतों हें पाहण्याची देखील त्यांना गरज भासत नव्हती! दादासाहेबांचं एक असो. पण सुमित्रेलादेखील वाटत नव्हती! असा राग आला होता मला त्या क्षणीं! थिएटरासारख्या सार्वजनिक जागीं होतों म्हणून, नाहीं तर उजव्या पंजानें तिच्या गालाचं मापच घेणार होतों मी.

घरीं परत येईपर्यंत कसाबसा मीं दम धरला. पण मन मात्र मला राहू देईना. तडातडा बोलावंसं वाटत होतं. पण विचार केला, जरा निराळ्या प्रकारें लढाई केली पाहिजे. प्रत्यक्ष वाग्युद्धांत कांहीं अर्थ नाहीं. त्यापेक्षां 'शीतयुद्ध' पुकारावं हें बरं. "किती सुंदर होतं रे आजचं पिक्चर!" असं सुमित्रा चार वेळां म्हणाली, पण तिचं बोलणंच न ऐकल्याप्रमाणें मी मुखस्तंभ राहिलों. थाटामाटाचे कपडे उतरण्यासाठीं खोलींत जाण्यापूर्वी ती माझ्याजवळ येऊन उभी राहिली आणि हसली. हेतु अर्थातच असा कीं नेहमींप्रमाणें मीं तिच्या गळ्यांत हात टाकावे आणि तिचा मुका घ्यावा. पण माझ्या वृत्ती निराळ्याच अर्थानें गरम झाल्या होत्या. मनाला ओरडून बजावलं, 'शीतयुद्ध! शीतयुद्ध!' कांहीं न बोलतां खोलींत गेलों. बूट काढून आपटले. कपडे पलंगावर फेकून दिले. धोतर गुंडाळलं. गंजिफ्रॉक खसकन् ओढून घातला. आरामखुर्चींत पडलों. सिगारेट फुंकायला सुरुवात केली.

सुमित्रा कपडे बदलून खोलींत आल्याची चाहूल लागतांच दोन्ही हात मागें करून मानेखालीं घेतले, आणि डोळे मिटले.

सुमित्रेनें दिवा लावला आणि विचारलं, "अंधारांत काय बसलास रे?"

मीं उत्तर दिलं नाहीं!

तिनें विचारलं, "तुला चहा हवा असेल ना? करूं का?"

मीं उत्तर दिलं नाहीं. डोळे उघडले नाहींत.

"सांग ना. चहा करूं का तुझ्यासाठीं?" असं विचारून तिनें माझ्या केसांतून बोटं फिरविलीं.

नेहमीं किती सुखाचा वाटायचा तो स्पर्श मला. पण आज माझ्या अंगांत 'झुंझारराव' संचरला होता. मी तडातड बोलणार नव्हतों. पण सुमित्रेला चांगलाच धडा देणार होतों...बॉक्समध्यें बसतांना दादासाहेबांनीं आपल्या उजव्या बाजूच्या खुर्चींत मला टाकलं होतं, आणि डावीकडच्या खुर्चींत सुमित्रेला बसवून घेतलं होतं. सारख्या गुलुगुलु गोष्टी करीत होते ते तिच्याशीं! आणि ती त्यांच्याशीं...मध्यंतराच्या वेळेस त्यांनीं तिला विचारलं, 'ड्रिंक घेऊं या? इथल्या सोडाफौंटनवर फार सुंदर पेयं मिळतात. चला.' सुमित्रेनें मला विचारलं 'तूं घेणार का रे कांहीं?' मी म्हणणार होतों, 'हो घेणार आहे. या रंगेल म्हाताऱ्याचा जीव घ्यावासा वाटतो आहे.' मी बरोबर नसल्याप्रमाणेंच दादासाहेब वागत होते आणि ही मात्र मला विचारीत होती! ड्रिंकवांचून माझा प्राण जात नव्हता खास—पण अपमानाचा सारा राग मनांतच ठेवला, दांत विचकले, आणि म्हटलं, "मला नको. अगदीं नको. तूं जाऊन घेऊन ये."...या साऱ्या गोष्टींच्या आठवणी आतां होत होत्या...

"बोल ना, तुला चहा हवाय का ?" तिनें माझ्या केसांतून पुन्हा बोटं फिरविलीं.

मीं तिचा हात एकदम झटकून टाकला. डोळे उघडून फाडले. आणि म्हटलं, "दिलासा करुन तर हवा. मी कांहीं तुझ्यासारखं सोडाफौंटनवर जाऊन ड्रिंक घेटलं नाहीं!"

"मीं तुला विचारलं होतं—"

"तूं विचारलं होतंस पण त्यानं? दोन तासांत त्या रंगेल म्हाताऱ्यानं माझ्याकडे पाह्यचं तरी होतं ढुंकून! जणुं मी त्याला दिसतच नव्हतों."

सुमित्रा माझ्याकडे पहातच राहिली. मग ती म्हणाली, "अस्सं! एकूण सारी फुणफुण कशासाठीं आहे तें आलं लक्षांत!"

"आलं ना? मग जा. नीघ. मला चहा नको, कांहीं नको. जेवायला-सुद्धां नको."

सुमित्रा जागच्या जागींच उभी राहिली. माझ्याकडे बघत. तिच्या नजरेंत हेलदळू रागाची छया मला दिसूं लागली.

मीं म्हटलं, "पाहतेस काय अशी माझ्याकडे? तुझ्याकडून कांहींच गुन्हा घडला नाहीं असं वाटतंय काय तुला?"

"गुन्हा?" असा प्रश्नात्मक उद्गार तिनें काढला, आणि मग ओठांचा विचित्र चंबू करून व भुंवया उडवून माझ्याकडे बघून ती म्हणाली, "बघा बाई! ज्याचं करावं बरं तें म्हणणार माझंच खरं!"

"होय होय. बरोबर आहे. त्या रंगेल वुद्ध्याशीं अंधारांत कुजबुजत होतीस दोन तास ती माझ्याच बऱ्यासाठीं! तुला तें जसं कांहीं नकोच होतं अगदीं. हातसुद्धां धरला असेल त्यानं तुझा—"

"हां, वसंत! आतां फार झालं हं. तोंड आटप. बायकोशीं असं बोलायला लाज नाहीं वाटत तुला?"

"जिनं नवऱ्याची लाज सोडली अशा बायकोला बोलण्यांत लाज कसली?"

सुमित्रेनें माझ्याकडे अशा कांहीं रागीट नजरेनें बघितलं कीं जणुं माझ्या तोंडांत भडकविण्यासाठीं तिचे हात शिवशिवत होते.

तिनें आपल्या हाताची शिवशिव भागविली तर तिच्याहि चार तोंडांत लगावण्याची मीं मनाशीं तयारी केली.

परंतु तसं कांहीं करण्याऐवजीं तिनें दोन्ही हात माझ्या गळ्यांत घातले, माझा मुका घेतला आणि ती म्हणाली, "किती वेडा आहेस रे तूं? माझ्या प्रेमाची शंका घेतोस? इमानाची? अरे, प्रत्यक्ष मदनाचा पुतळा मला भेटला तरी माझ्या हातून वावगी गोष्ट घडायची नाहीं. माझ्यावर बिश्वास नाहीं तुझा, वसंत?" तिनें माझा पुन्हा मुका घेतला.

इतकं झाल्यावर मग काय विचारतां? आमची स्वारी बिरघळली. मीं तिला जवळ घेतलं आणि म्हटलं, "सुमित्रे, मला मूर्ख म्हण पाहिजे तर, परंतु दुसऱ्या पुरुषानं तुझ्याशीं सलगी केलेली मला नाहीं आवडत. दादासाहेबांशीं तूं तसं कां वागलीस त्याची मला कल्पना आहे. पण तुला खरं सांगूं? मोठ्या पगाराची नोकरी मिळवायसाठीं ही किंमत द्यायला मी नाहीं तयार. मला मोठी नोकरी नको, पैसे नकोत. तूं हवीस—"

"अरे, मी तर आहेंच तुझी. मी कुठें जातें आहें?"

"तूं हवीस म्हणजे अगदीं सगळी सगळी हवीस. तुझ्या शरीराचा आणि मनाचा अंशन् अंश माझा—माझा एकट्याचा आहे असं मला वाटलं पाहिजे."

सुमित्रा म्हणाली, "अरे वेड्या, दुसऱ्या कुणाचा होतो आहे तो? चार गोड शब्द बोलण्याचं आणि हसण्याचं खोटं नाटक करायला काय जातं आपलं? तुझी योग्यता किती मोठी! तुला मोठी नोकरी हवी—"

"नको गं.—अगदीं नको."

"असं नको म्हणूंस. तूं नेहमीं उत्तम कपडे केले पाहिजेस. तुझ्या मनगटावर सोन्याचं घड्याळ पाहिजे. आपलं घर मोटं आणि शृंगारलेलं पाहिजे. तूं सायकलवर हिंडतोस तें मला नाहीं आवडत—"

"मग काय मोटारींत हिंडूं?"

"कां नाहीं? तुझी योग्यता मोटारींत हिंडायची खचित आहे. दादासाहेबांच्या वशिल्यानें स्टीम नॅव्हिगेशनमधली ही नोकरी तुला मिळाली तर दोनचार वर्षांत तुला मोटारींतून हिंडतांना मी पाहीन. आणखी दादासाहेबांचा वशिला खचित मिळेल बघ आपल्याला. उद्यां रात्रीं ते जेवायला आले कीं त्यांच्याशीं धुसफुस करूं नकोस. चांगलं बोल, चांगलं वाग—"

मीं आश्चर्यानें विचारलं, "म्हणजे? तो म्हातारा उद्यां आपल्या घरीं जेवायला यायचा आहे? कुणी बोलावलं त्याला?"

"मीं!"

तें ऐकून मी आवंढा गिळला. माझ्या रागाचा पारा हळुहळू चढूं लागला.

माझी चर्या बदलत चाललेली पाहून ती म्हणाली, "वसंत, माझी एक गोष्ट ऐक. स्टीम नॅव्हिगेशनमधली ही नोकरी तुला मिळवून देण्याचं काम माझ्याकडे सोपव. त्या बाबतींत भांडण करूं नकोस. मला चार मारायच्या असल्या तरी मार. पण त्या आत्तां नाहीं. ती नोकरी मिळाल्याचा हुकूम तुझ्या हातांत पडला कीं मग! मला पेढे द्यायच्याऐवजीं तें बक्षीस दे हवं तर. मीं तें आनंदानं घेईन. पण आतां भांडायचं नाहीं. वाद करायचा नाहीं. या नोकरीचं प्रकरण माझ्यावर सोपवायचं. मी सांगेन तसं वागायचं. हो म्हण पाहूं."

एखाद्या रुसक्या मुलाप्रमाणें मीं म्हटलं, "हो."

तिनें माझा मुका घेतला आणि म्हटलं, "किती शहाणा माझा वसंत. चहा हवा ना तुला? करूं ना थोडा?"

ती स्वैंपाकघराकडे गेली.

चहा घेतांना, नंतर जेवतांना, रात्रीं एकांतांत आणि दुसऱ्या दिवशीं आम्हां दोघांत तो विषय मग निघाला नाहीं. फक्त मी ऑफिसांत जाण्यासाठीं कपडे घालूं लागलों तेव्हां सुमित्रेनें विचारलं, "रात्रीं पाहुणे यायचे आहेत जेवायला. लक्षांत आहे ना तुझ्या?"

मीं म्हटलं, "आहे."

"कांहीं आणायला सांगितलं येतांना तर आठवणीनं घेऊन येशील का?"

"आणीन."

तिनं माझ्या हातांत एक कागद दिला. तो मीं वाचला. चांगल्यापैकीं आपूस आंबे, क्रीमचा डबा, सुका मेवा...अशा जिनसांची यादी होती ती! म्हाताऱ्या दादासाहेबांना अगदीं उत्तमपैकीं चमचमन जेवण देण्याचा सुमित्रेनें बेत केला होता म्हणायचा! आगबोट कंपनींतली नोकरी मला पुढें मिळेल तेव्हां मिळेल, आज दहा पंधरा रुपयांचा फटका मला बसणार होता खरा. परंतु हें नोकरीचं प्रकरण सर्वस्वीं सुमित्रेवर सोपवायचं मीं कबूल केलं होतं. भांडायचं नाहीं, तक्रार करायची नाहीं, इत्यादि तहनाम्याचीं कलमं मीं मान्य केलीं होतीं. मनांतून चरफडत पण वरून हसत कागदाची घडी करून मीं खिशांत घातली.

"आणशील ना सारं आठवणीनं?" सुमित्रेनें खुंटा हलवून बळकट करण्यासाठीं प्रश्न केला.

मीं म्हटलं, "आणीन ग. आणायचं कबूल केल्यावर कधीं विसरतों का?"

"बघ, चिडायला लागलास हं."

"आय ॲम सॉरी." या माफीवर मुक्याचं शिक्कामोर्तब केलं.

सुमित्रा हसली व म्हणाली, "अन् जरा लवकरच ये घरं का. पाहुणे येतील तेव्हां तूं घरांत असायला हवंस."

"असं तुला वाटतंय. पण पाहुण्यांना मी घरांत असायला हवं आहे का?"

"आली का पुन्हा लहर तुला?—"

"आय ॲम सॉरी.—रियली सॉरी." मीं हातांतला रुमाल उंच करून हलविला आणि ऑफिस सुटल्याबरोबर बाजार करून घरीं परतण्याचा निश्चय मनाशीं करीत मार्गाला लागलों.

संध्याकाळीं ऑफिसांतून बाहेर पडून बस पकडली. पण क्रॉफर्ड मार्केटकडे गेलों तों—सारी बाजारपेठ बंद! मार्केटांतले सारे गाळे मोकळे! बाहेरच्या रस्त्यावरच्या साऱ्या दुकानांना लट्ठ लट्ठ कुलपं!

हा काय प्रकार आहे, मला कळेना. चौकशी केली तेव्हां कळलं कीं विक्रीकराच्या निषेधासाठीं साऱ्या व्यापाऱ्यांनीं आज हरताळ पुकारला होता! आंबे, क्रीम, सुका मेवा न खरीदतां घरीं गेलो तर सुमित्रा खचित म्हणणार कीं मीं मुद्दामच जिनसा आणल्या नाहींत. भुलेश्वर मार्केटांत गेलों. तिथेंहि सारा शुकशुकाट! गिरगांव, ठाकुरद्वार असे सारे रस्ते हिंडलों. पण फळवाला किंवा ढकलगाडीवर सुका मेवा विकणारा फेरीवाला औषधालादेखील सांपडेल तर शपथ! हलक्या हातांनीं पण जड खिशानें—

आणि त्याहूनहि जड अंतःकरणानें अखेर बस पकडली, आणि घरीं आलों. बाजार बंद होता ही माझी सबब सुमित्रेला पटणार नव्हती. तिचा माझ्यावर चांगलाच रुसा होणार होता. आगबोट कंपनींतली नोकरी अखेर मला मिळाली नाहीं तर तिला म्हणतां येणार होतं, 'तूं आंबे आणले नाहींस, क्रीम, सुका मेवा आणला नाहींस त्यामुळें लढाई हातची गेली बघ.' सुमित्रेला काय सांगावं आणि तिचा राग कसा टाळावा याबद्दल मनाशीं विचार करीत करीत जिना चढलों. मुंबईतले सगळे बाजार हिंडल्यामुळें मला चांगलाच उशीर झाला होता. मला खात्री वाटत होती कीं बुढ्ढे दादासाहेब येऊन बसलेले असणारच, आणि आमच्या जागेच्या पुढच्याच खोलींत मी येईपर्यंत त्यांचं मनोरंजन करीत सुमित्राहि बसलेली असणार. मला पाहिल्या-बरोबर सुमित्रा माझी चेष्टा करणार, 'आत्तां उगवतो आहेस काय?'...

मी आमच्या जागेचं पुढचं दार ढकललं आणि पाहतों तों काय?—

पाहुणा नाहीं अन् कोणी नाहीं! खोलींत दिवादेखील नाहीं!

माणसाच्या मनांत काय येईल त्याचा नियम नाहीं. मला वाटलं, सुमित्रा आंतल्या खोलींत स्वैंपाकांत गुंतलेली असेल आणि म्हातारे दादासाहेब निंबाळकर खुशाल स्वैंपाकघरांतच उभे राहून किंवा एखाद्या स्टुलावर बसून मिशा कुरतडीत लबाडपणाच्या गोष्टी बोलत असतील. सरळ स्वैंपाकघरांत घुसावं कीं घुसूं नये तें मला क्षणभर ठरवितां येईना. मग जागच्या जागींच उभं राहून हाक मारली, "सुमे!"

उत्तर मिळालं नाहीं. मनांत आलं, खचित स्वैंपाकघरांत—

आवाज चढवून पुन्हा हाक मारली, "सुमे!"

तरी उत्तर नाहीं! मनांत आलं, अरेच्चा!—खाड खाड बूट वाजवीत स्वैंपाकघरांत गेलों.

तिथें दादासाहेब नव्हते! सुमित्राहि नव्हती! स्वैंपाकहि तयार होत नव्हता! बासुंदीचं पातेलं तेवढं शेगडीवर उकळत होतं. भाजी चिरली न जातांच ताटांत पडली होती. फोडले न गेलेले नारळ फक्त आपापली शेंडी गमावून फरशीवर पडले होते. कोथिंबीर, मिरच्या, पुदीना एकत्र मिळून वाटून निघण्याऐवजीं वेगवेगळाच पडून सुकून जात होता!...

मनांत आलं, याचा अर्थ तरी काय? पाहुणा, जेवण—सारंच गारद कसं झालं?

"सुमे! सुमे!" अशा हाका मारीत पुन्हा बाहेरच्या खोलींत आलों. "आहेस तरी कुठें ग?"

निजायच्या खोलींत गेलों आणि पाहतों तों—

उशींत डोकं खुपसून मुसमुसत पालथी पडलेली सुमित्रा दिसली.

मला कांहीं कळेचना!

सुटाबुटासकटच पलंगावर बसलों आणि सुमित्रेला कुशीवर वळवीत म्हटलं, "सुमे!"

माझ्याकडे पाहतांच उठून बसून डोळे पुसण्यासाठीं तिनें हात वर केले, पण डोळे पुसण्याऐवजीं तोंड झाकून घेतलं.

हातांच्या फटींतून दिसणाऱ्या तिच्या ओठांचा मीं मुका घेतला, तिला गदगदां हलवलं, आणि विचारलं, "हें काय? पाहुणे कुठें आहेत?"

"गेले खड्डयांत!" एवढाच उद्गार तिनें काढला आणि ती हुंदके देऊं लागली.

"म्हणजे काय? सांग तरी." मीं तिला पुन्हा हलविलं. उशीखालचं एक पत्र काढून तिनें मला दिलं, आणि ती म्हणाली, "वाच."

उंची, सुंदर, जांभळ्या, जाड, गुळगुळीत नोटपेपरवर लिहिलेलं पत्र होतं तें. त्याला सेंटचा भपकारा येत होता. पत्रांतला इंग्रजी मजकूर मी वाचूं लागलों—

"मत्प्रिय सुमित्रा! हें पाहून तुला आश्चर्य वाटेल. रात्रीं जेवाय-साठीं मी येणारच आहें, मग आत्तां हें पत्र कशासाठीं असं तुला वाटेल. परंतु दोन कारणांसाठीं हें पत्र लिहीत आहें. पहिलं असं कीं, हें पत्र आणणाऱ्या इसमाबरोबर कांहीं वस्तू मी पाठवीत आहें. त्यांचा स्वीकार कर. माझ्या प्रेमाची पहिली लहानशी भेट म्हणून. तूं मला किती आवडतेस तें प्रत्यक्ष तोंडावर सांगायचा मनाला संकोच वाटतो. परंतु तें काम या वस्तू करतील. या पत्राचं दुसरं कारण असं कीं, जेवण झाल्यानंतर आपण एका प्रोग्रॅमला जाऊं या काय? एक जगविख्यात इटालियन व्हायोलिनिस्ट इथें आलेला आहे. काव-सजी जहांगिर हॉलमध्यें आज रात्रीं त्याच्या वादनाचा कार्यक्रम आहे. आपण तिथेंहि जाऊं असं म्हटलं असतं, परंतु पहिल्या रांगेतलीं दोनच तिकिटं मला मिळालीं आहेत. तूं आणि मी जाऊं या. तुला कार्यक्रम फार आवडेल अशी माझी खात्री आहे..

तो सारा मजकूर वाचून मी थक्कच झालों. एकदां त्या पत्राकडे आणि एकदां सुमित्रेकडे बघत राहिलों. काय बोलावं तें मला सुचेना.

सुमित्रा म्हणाली, "तुला तोंड दाखवायचीसुद्धां मला लाज वाटते बघ. हें पत्र घेऊन जो माणूस आला त्याच्याबरोबर त्या साऱ्या वस्तू मीं परत केल्या. आणि चिठ्ठी लिहून पाठविली कीं, आज संध्याकाळीं मी वसंतबरोबर पुण्यास जात आहें, तेव्हां जेवणाचा बेत रद्द समजावा. तें सारं झालं— पण दादासाहेबांनीं असलं पत्र मला पाठवावं याची मला फार फार शरम वाटते. तुला मीं म्हटलं होतं ना चार मुस्कुटांत मार माझ्या? त्या मार आतां."

"हॅः! वेडी तर नाहींस तूं?" तिला मीं जवळ ओढलं आणि छातीशीं घट्ट धरून म्हटलं, "तुझं काय चुकलं?"

"चुकलं रे, फार चुकलं. जग असं असेल अशी माझी कल्पना नव्हती. पुन्हा कधीं मी तुला म्हणणार नाहीं मोठी नोकरी मिळवायसाठीं अमक्याला खुष कर अन् तमक्याला खुष कर. आहोंत तीं फार सुखांत आहोंत आपण." तिनें हनुवटी उचलली आणि ओठ पुढें केले.

तिचा मुका घेतां घेतां मीं डोळे मिटले. आयुष्यांत वर वर चढण्याच्या सुमित्रेच्या व्याख्यानांचे सारे छापील कागद वाऱ्यावर उडतांना मला दिसले! आगबोट कंपनींतल्या नोकरीचं तारू शीड फाडून खडकावर आपटून समुद्रांत बुडतांना मला दिसलं! तीं दोन्ही दृश्यें पाहून मनाला भयंकर समाधान झालं. मनांत आलं, जीं दृश्यें डोळ्यांना दिसलीं त्यांचं वर्णन करून सुमित्रेला हसवावं. परंतु लगेच शंका आली, ती हसण्याऐवजीं रडायला मात्र लागेल ...

म्हणून मीं डोळे उघडले, तिचं तोंड दोन्ही हातांनीं उंचावून तिला माझ्याकडे बघायला लावलं, आणि तिला म्हटलं, "सुखी आहोंत ना?"

तिनें मान हलविली आणि ती हसली.

"अगदीं खात्री आहे?"

तिनें पुन्हा मान हलविली आणि आणखीच गोड हास्य केलं.

"मग आतां एक शपथ घे."

तिनें मुकाट्यानेंच विचारलं, कसली?

"आयुष्यांत वर वर चढण्याची कळेच्या वाटेला कधीं न जाण्याची!"

ती शपथ घेऊं लागली—पण मीं तिचं तोंड बंद केलं!



अनुक्रमणिका



# केदाराची यात्रा

गतगोष्टींचें तें ओझें—
ठेवूनिया पायथ्याला,
अंगीं, खांदीं, घेतों जें जें
हवें पोसाया प्राणाला—

एका बाजूस सारखी
खोल खोल ‘विसरण’
उभे कडे उरावर
तरी त्यांचें आकर्षण !

—आणि चुकतां पाऊल
सारा हिशेब चुकता !
संगतीचे—सोबतीचे—
थोडी सांगतील वार्ता !

उंच देव शिखराचा
त्याचें ओढतें दर्शन
म्हणून ही पायपीट
म्हणूनच हें कन्दन !

थंडगार वर्फांतुच—
उसळंते उष्ण गंगा,
असें ऐकिलें तें आतां
भोगावेंसें वाटतें, गा !

परतती मधें कोणी
त्यांचें भलें असो जगीं
माझी दिशा जी आंखली
मला वाटेना वाउगी

चालविली संसारांत
बद्रिकेदाराची यात्रा
पुढें पाय—पुढें दृष्टी—
मनीं मृत्युंजय-मात्रा. . .

— वि. म. कुलकर्णी



अनुक्रमणिका

हे अनंत प्रश्न सोडविल्याखेरीज लग्नाला
पूर्णता येणार नाहीं.
ती पूर्णता
जोंपर्यंत येत नाहीं तोंपर्यंत—

# लग्नाचें कडबोळें

सु लो मा  अ म ला

घटस्फोटाचा कायदा आज ना उद्यां अस्तित्वांत येणार यांत मुळींच संदेह नाहीं. समाजाला तो हवा आहे. मुंबई प्रांतांत सन १९४७ ते १९५१ पर्यंतच्या कालावधींत घटस्फोटासाठीं एकूण ५३५६ अर्ज आले. हा प्रचंड आंकडा आजच्या वैवाहिक जीवनाची खरीखुरी गरज काय आहे याचा एक सुंदरसा 'ब्रॅरामीटर'च आहे. पण—

घटस्फोटाचा कायदा आज कुणासाठीं करण्यांत येत आहे? हिंदु संस्कृतीची बिरुदावली बांधणाऱ्या उच्चवर्णीयांखेरीज इतर सर्व जमातींत घटस्फोट धर्ममान्य, समाजमान्य नि कायदामान्य ठरला आहे. तेव्हां अवघ्या १५ टक्के पांढरपेशासाठीं असा कायदा करून विशेष असें काय साधण्यांत येणार आहे? घटस्फोट संस्कृतिविकासाचें प्रतीक आहे कीं तो अधोगतीचें लक्षण आहे? आमच्या मतें तो कशाचेंच प्रतीक नाहीं. कुटुंबस्थैर्यासाठीं अनेक कायदे झाले नि कालांतरानें ते नष्ट होऊन नवे कायदे आले. जगांत लग्नसंस्था अद्यापि पूर्णत्वाला गेली नाहीं. त्यामुळें अमुक चांगलें नि अमुक वाईट असा सिद्धांत काढतांच येत नाहीं. फिरून लग्न, रूढि नि नीति यांनीं विशिष्ट कालांत तत्कालीन गरजांप्रमाणें विशिष्ट रूपें धारण केलीं. तेव्हां लग्नाच्या अनंत प्रकारांत अमुक चांगला असें बोट ठेवून निश्चयानें सांगतां येत नाहीं. आज समाजाच्या कांहीं राखीव लोकांना घटस्फोट हवा एवढें मात्र मान्य करावयास हवें.

'लग्न' हा विषय जितका गंभीर तितकाच विचित्र नि विनोदी आहे. कारण, लग्नसंस्था अस्तित्वांत आल्यापासून किमानपक्षीं एक हजार विवाहपद्धती जगाच्या पाठीवर अस्तित्वांत आल्या! एका समाजाची गंभीर पद्धत दुसऱ्या समाजाला विनोदी वाटते, तर दुसरा गंभीरतेकडे विनोदानें पाहूं लागतो. क्षणभर विचार करा—क्षणभर लग्नसंस्थेचा इतिहास डोळ्यांपुढें आणा, तुम्हांला नक्की पटेल कीं, 'लग्नानें' जितका विनोद निर्माण केला तितका शंभर गडकरी नि शंभर अत्रे निर्माण करूं शकणार नाहींत! पुराव्यासाठीं कांहीं उदाहरणें मुद्दाम देत आहें—

(१) आपल्या वयांत आलेल्या पोटच्या पोरीशीं लग्न करण्याची कल्पना आज कुणाला तरी पटेल का? पण एक काळ असा होता कीं, 'बाप आणि मुलगी' यांचीं लग्नें होत व तत्कालीन समाज त्याला मान्यता देत असे. हिंदु संस्कृतींत असा विवाह रूढ होता. ब्रह्मदेवानें मुलीशीं लग्न केलें होतें. विशिष्ट प्रजापतीनें शतरूपा नांवाच्या आपल्या मुलीशीं विवाह केला. मनूनें इलाशीं, जन्हूनें जान्हवीशीं—अर्थात् आपल्या कन्येशीं—विवाह केले आहेत. मुलानें आपली मुलगी बापाला बायको म्हणून दिली. सोम, दक्ष व मरिषा यांचा पुराण इतिहास अशा विवाहांचा स्पष्ट उल्लेख करतो. अशा विवाहांचा उल्लेख महाभारतकार व्यास करूं लागतांच जनमेजयांना कसेंस्या कसेंच वाटलें. त्यांनीं व्यासांना पृच्छा करतांच व्यास म्हणाले, "ही गोष्ट त्रिवार सत्य आहे नि हा समाजधारणेचा धर्म आहे."

सख्खे बहीणभाऊ सर्व समाजांत प्राचीन काळ विवाहबद्ध होत. हवाई बेटें, पेरू, इजिप्त, रोमन लोक, जपान, अथेनिअन्स, सेमिटिज अन् खुद्द हिंदु समाजांत बहीणभावांचीं लग्नं झालेलीं आहेत. ऋग्वेदांत यम नि यमी या सहोदरांच्या विवाहाचा उल्लेख आढळतो. तैतरेय ब्राह्मणांत सीतासावित्री नि सोम या बंधुभगिनींचा विवाह मशहूर आहे. सावत्रबहीण, आतेबहीण, मावसबहीण, धर्मपत्नी म्हणून आजहि मिरवत आहेत. सजातीय, सगोत्री विवाह यांची बेळमेळ कुणाला मान्य आहे, कुणाला मान्य नाहीं. प्रथमपत्नी वारल्यास तिच्याच बहिणीशीं पुनश्च विवाह करण्याची पद्धत शिष्टसंमत नाहीं. कौटुंबिक स्थैर्यासाठीं समाजानें विवाहाच्या प्रश्नावर अनेक कोलांट्या घेतल्या. कधीं मालमत्तेसाठीं, कधीं पुत्रप्रजेसाठीं, कधीं स्वर्गप्राप्तीसाठीं—अनेक कारणांसाठीं आज घृणात्मक वाटणारे विवाह समाजानें घडवून आणले आहेत.

(२) अपहरणविवाहपद्धति (marriage by capture) आज सुसंस्कृत समाजांत जवळ जवळ नाहीं. मुलीची संमति असो वा नसो, तिचें अपहरण करून विवाहबद्ध होणारा समाज सर्वत्र होता. या अपहरणांत कांहीं समाजांत मुलीच्या नातेवाईकांना मारून मुलगी पळविण्यांत येत असे. ब्राझिलिन लोकांत, कॅलिफोर्निअन लोकांत ही पद्धत सर्रास होती. ओरिसा प्रांतांत जय्या लोकांत आजहि असे विवाह होतात. बंगालमध्यें





अनुक्रमणिका

हॉस जातीचे लोक व चिनागांग भागांतील वन्य लोक सक्तीनें मुली पळवून विवाह करतात. पुरातन काळांत—कृष्ण-रुक्मिणी, सुभद्रा-अर्जुन, उषा-अनिरुद्ध, प्रभावती-प्रद्युम्न, भानुमति-निकुंभ, अशीं अनेक अपहरणविवाहाचीं उदाहरणें देतां येतील. आज फक्त वयांत न आलेली मुलगी आईबापांच्या विरोधाला न जुमानतां पळविली तर तो गुन्हा होतो. आमच्या देवादिकांनीं केलेले विवाह आज निषिद्ध ठरतात हा विनोद नाहीं तर काय ?

(३) जरठविवाह, बालविवाह आज समाजानें गुन्हे ठरविले. पण याहिपेक्षां ज्याला आपण 'व्यभिचार' म्हणतां तोहि आमच्या समाजास एक वेळ मान्य होता. अपत्यसंभवासाठीं कां होईना, सर्व संस्कृतीनें व्यभिचारी संभोगाला सकामतेनें मान्यता द्यावी हें आज आश्चर्याचें असलें तरी कालमानानें तें रास्त होतें. 'आत्मावै पुत्रनामासि'—पुत्र हा आत्मा आहे, तो लाभल्याशिवाय स्वर्गप्राप्ति होत नाहीं, अशी ज्या समाजाची दृढ कल्पना होती तो समाज येनकेन प्रकारेण पुत्रप्राप्ति करून घेत असल्यास मुळींच नवल नाहीं. कुंती नि माद्री यांना ज्या वेळीं पंडूकडून मुलें होईनात त्या वेळीं पंडुराजानें त्यांना दुसऱ्यांशीं समागम करावयास लावून महाभारताचा विस्तार केला. ख्रिश्चन लोकांत नि हिंदुधर्मांत नवरा वारल्यावर दीराशीं लग्न करण्याची परंपरा होती. हॅम्लेट नाटकांत अशा विवाहाचा उल्लेख आहे. कामशास्त्रांत 'ऑनॅनिझम' म्हणजे स्त्रीयोनींत वीर्यस्खलन होऊं न देतां तें जमिनीवर करणें—म्हणजे ऑनॅनिझम होय ! पाश्चात्य देशांत पुरातन काळीं ऑनन नांवाच्या व्यक्तीचा राजबंधु वारला. धर्मरूढीप्रमाणें त्याला राजबंधूच्या राणीशीं विवाह करावा लागला. तो त्यास आवडला नाहीं. अन् म्हणून संभोग घेतांना ऑनन वीर्यस्खलन जमिनीवर करी. हीच पुढें संततिनियमनाची एक पद्धत समजण्यांत आली व येत आहे. या पद्धतीस 'ऑनानिझम्' असें म्हणतात.

'कुमारी माता' अर्थात् कुठलाहि विवाह न करतां संभोग घेणें हिंदु समाजाला संमत होतें. कुंतीला कौमार्यावस्थेंत संभोगप्रवृत्त करणारें सूर्याचें भाषण महाभारताच्या आदिपर्वांत कुणालाहि वाचतां येईल. कुंती अशा संभोगाला ज्या वेळीं रुकार देईना त्या वेळीं सूर्य तिला म्हणतो, "यांत वाईट काय आहे ? आपणाप्रमाणें आपल्या पूर्वजांनीं हेंच केलें आहे. भीष्मानें आपला भाऊ वारल्यावर आईच्या सांगण्यावरून असेंच केलें ना ?"

'कुमारी माता' किंवा 'विवाहपूर्व संभोग' हा समाजाच्या संक्रमणकालांत सर्वत्रच रूढ होता. परंतु यासंबंधांत अनेकांचा मतभेद आहे. 'प्रजासंभव' हा लग्नाचा एक मुख्य हेतु मानला तर विवाहपूर्व संभोग निषिद्ध कसा मानावा ? तो प्रकार लग्नाचाच एक प्रकार कां मानूं नये ? असें म्हणणारा एक वर्ग आहे. कसलेंहि नैतिक बंधन न मानतां, अपत्याची लालसा न करतां, स्त्रीपुरुष एकत्र आलीं तर या प्रकारास लैंगिक तज्ज्ञ सरसहा 'व्यभिचार'—'बाहेरख्याली' अशा संज्ञा देतात. एक काळ असा होता कीं, त्या वेळीं वाङ्निश्चयापूर्वीं नियोजित वधूवर एकत्र राहून संभोगसुख अनुभवीत, व तदनंतर विवाहबद्ध होत. हिंदुस्थानांत टोणवाटांत रहाणाऱ्या आदिवासियांमध्यें लग्नपूर्वकालांत वधूवर आजहि संभोग घेऊं शकतात. नाशिकच्या पेठ भागांतील आदिवासियांत लग्नाच्या कांहीं आर्थिक अटी असतात. मुलानें मुलीच्या बापास कांहीं ठराविक रक्कम द्यावयाची असते. ही रक्कम मुलास एकदम देतां आली नाहीं तर तो पहिला हप्ता देऊन वधूच्या बापघरीं 'ओलीस' म्हणून राहतो. या काळांत वर सासऱ्याच्या घरीं 'घरजांवई' म्हणून नांदतो. लग्नापूर्वीं संभोग घेऊं शकतो. रक्कम फिटण्यास अवधि लागला व मध्यंतरकाळांत त्यास अपत्य झालें तर तें मुलीचें अपत्य मानण्यांत येतें. मुलाचा त्या अपत्यावर हक्क नसतो. दुर्दैवानें मुलास बाकीची रक्कम देतां आली नाहीं तर तें लग्न रद्द मानण्यांत येतें. मुलगा पुनश्च ब्रह्मचारी व मुलगी कुमारिका मानली जाते. इतकें असूनहि विवाहबद्ध होतांच या समाजांत नीति नि पावित्र्याचे नियम फार कडक आहेत. वेश्यागमन या समाजानें अत्यंत त्याज्य मानलें आहे.

लग्नपूर्व काळांतील संभोगाचे दोन प्रकार आहेत. 'देहविक्रय' हा वेश्येच्या जातींत येतो. तर वरील आदिवासियांचा प्रकार सद्हेतूच्या कक्षेंत येतो. घटकंचुकी, पाहुण्यांच्या आदरातिथ्यासाठीं शय्या आणि शय्याराणी देण्याचा प्रघात, हीं व्यभिचारांत मोडूं शकतात. पण एक वेळ सर्व देशांत हे प्रकार होते. धर्मगुरूबरोबर विवाहापूर्वी समागम करणें हाहि व्यभिचार होईल. विवाहपूर्व संभोगाचे असे अनेक कप्पे आहेत. आज रशियांत काय परिस्थिति आहे ? लैंगिक भुकेची भगभग भागविण्यासाठीं कुणीहि स्त्रीपुरुष वर्षानुवर्षें एकत्र राहूं शकतात. फक्त अपत्य झालें म्हणजे त्यांना आपण 'नवराबायको' असल्याचें जाहीर करून मुलांची जबाबदारी घ्यावी लागते.—थोडक्यांत पूर्वी जें होतें तेंच एका समाजांत, एका देशांत, आज रूढ झालें तर अन्यत्र तो गुन्हा ठरत आहे. आकाशांत ढगांचे रंग जितक्या पटींनीं बदलत नसतील इतक्या पटींनीं—गणितश्रेढींनीं—लग्नाच्या कल्पना, रूढी, परंपरा, नीतिमत्त्व, पावित्र्याचें प्रतीक बदलत गेलें आहे. वैचित्र्य हा विनोदाचा एक आत्मा मानतात. हें वैचित्र्यच 'लग्न हा विनोद आहे !' असें विधान करण्यास पुष्टी देत नाहीं का ?

यानंतर (१) एकभार्या (२) द्विभार्या (३) बहुभार्या लग्नपद्धतींचा थोडक्यांत विचार करूं या. राम आणि सीता, हरिश्चन्द्र-तारामती, नल-दमयंती, वगैरे पंचपतिव्रता नि पंचपति यांव्यतिरिक्त एकभार्यापंथी समाज फारच थोडा आहे. तो तसा अल्पस्वल्प असल्यामुळेंच या पतिव्रतांना महनीय व आदरणीय स्थान लाभलें. याचा अर्थ समाजाला या पवित्र जोडप्यांप्रमाणें घरोघर एकभार्या–एकपतिविवाह हवेत, असें मनापासून वाटतें. पण अनंत वर्षें समाज यासाठीं खटपट करूनहि त्याला तें साध्य होऊं शकत नाहीं. कारण एकपतित्वाचें बंधन स्त्रीवर हिंदु समाजानें अनंत काळ लादलें, तथापि पुरुषांना सर्व मार्ग मोकळे ठेवले. त्यामुळेंच—या विषमतेमुळें अशीं आदर्श जोडपीं आज निर्माण होऊं शकलीं नाहींत. याचा अर्थ आज एवढाच घ्यावयाचा कीं, स्त्री विवाहावस्थेंत, वैधव्यावस्थेंत एकपति-

मार्गी राहूं शकते. पण द्वीतीय विवाहाचें बंधन नसल्यानें पुरुष एक, दोन, फार काय हजारों बायका—सर्व समाजांत—करूं शकतो. याला प्रतिबंध घालण्यासाठीं द्विभार्याप्रतिबंधक कायदा अस्तित्वांत आला. या कायद्यानें 'राम-सीता' खास निर्माण होणार नाहींत. कारण त्याला मारक म्हणून (antidote) आज 'घटस्फोट' अस्तित्वांत आला. पावित्र्य, चारित्र्य, शील, नीति वगैरे वगैरे जी कांहीं संज्ञा आपण देतों, ती यामुळें अबाधित राहूं शकत नाहीं. स्त्री गेली—दुसरी मिळेल ! नवरा गेला—दुसरा मिळेल ! हेंच तत्त्व आज आपण रूढ करूं पहात आहांत ना ? ꠶नग रोम्प्राज्यांत 'राम-सीता' आतां सर्रास कोठून निर्माण होणार ?

'समाज' हें एक अटरा समस्यांचें कड-बोळें आहे. आणि संस्कृती—तिच्या अनंत व्याख्या होतील, तिच्यासाठीं अनंत मुद्दे होतील, पण संस्कृति ही चीज आहे तरी काय ? हें कुणीच सांगूं शकत नाहीं. गतानुग-तिकपणामुळें आम्ही अंधश्रद्धी बनलों. आजच्या रूढ समाजनीतीला 'द्रौपदी' विवाहपद्धति मान्य होईल का ? एक स्त्री व तिचे अनेक पती—ही



कल्पनाच आज आम्हांस किळसवाणी वाटते. पण त्याचबरोबर एका स्त्रीनें दहा घटस्फोट घेतले व अकरावा विर्वाह केला तर—त्या विवाहास मान्यता द्यावयास समाज आज 'घटस्फोटा'च्या कायद्यानें तयार होत आहे ना ? वनावनांतून फिरणारीं हरणें, बदकें व इतर पशू यांच्यांत नि माणसाच्या संभोगलालसेंत फरक काय रहातो ? एकीला आम्हीं 'पशुवृत्ति' म्हणावें व दुसरीला 'विवाह' म्हणावा. बडे बडे शब्द वापरून आपला मानवी प्रतिष्ठितपणा प्रस्थापित करण्या-पलीकडे आपण अधिक काय करतों ?

इराण वगैरे भागांत आजहि हंगामी विवाह आहेत. आजहि हिंदुस्थानांत बहुभार्यापद्धती आहे. वेश्या, देवदासी वगैरे वर्गहि पृथ्वीच्या पाठीवर आहेत. संघीय लग्नें (group marriages) आजहि घडून येतात. विवाहपूर्व काळांत—अपत्य-संभवापूर्वीच्या काळांत—संभोग घेण्याची प्रवृत्ति कृमिकीटकांची आहे. अंडीं घातल्यानंतर त्यांची निगा न ठेवणारी मादी कृमिकीटकांत आज असंख्यांनीं आहे. मग तिला 'कीटक' कां म्हणावें व रशियांतील स्वैराचारास 'कीटकवृत्ति' कां म्हणूं नये ? स्त्रीनें विधिपूर्व संभोग घेतल्यास तिला 'वाममार्गी' 'व्यभिचारी' 'छिनाल' म्हणून संबोधावें नि पुरुषानें 'परदारागमन' केल्यास त्यास बेशक शिष्ट, सभ्य म्हणून मानावें.

मेक्सिको, पेरू, जपान, चीनमध्यें धर्मपत्नी एक मानल्यावर पुरुषानें वाटेल तितक्या 'बायका' माथीं मारून घ्याव्यात ही आमची नीति व हाच आमचा समाजदंडक ! श्रीकृष्णानें १६१०८ बायका कराव्यात याचा अर्थ कुठल्याहि काळांत विवाह-शास्त्र पूर्णतेला गेलें नाहीं असेंच म्हणावें लागतें. प्रसिद्ध सोलोमन राजास ७०० धर्मपत्न्या व ३०० रखेल्या होत्या. वेर्नीनच्या राजास ४००० बायका होत्या. यांपैकीं त्यानें आपल्या एकनिष्ठ सेवकांस 'देणगी' म्हणून बऱ्याच बहाल केल्याचें इतिहासांत नमूद आहे. युगांडाच्या मेटसा राजास ७००० बायका होत्या. हैदराबादच्या मागील निजामास ३६५ बायका होत्या. 'बहुभार्या' बाळगणारे पुरुष व त्यांची जंत्री करूं गेल्यास त्यांचा एक महाग्रंथच तयार होईल. प्रत्येक धर्मांत, प्रत्येक समाजांत पुरुषांना बहुभार्या करण्याचा सवता सुभा दिलेला आहे. मुसल्मानांस कुराणानें चार बायकांची परवानगी दिली आहे. 'एकभार्या' पद्धति रोमन लोकांत होती. तथापि पुरुषांना अनेक रखेल्या ठेवण्याची मुभा दिली होती. फिजी बेटांत पुरुषाला २१ ते १०० बायकांचा परवाना मिळूं शकतो.

समाजानें बहुभार्यापद्धती पुरुषाच्या सुख-सोयीसाठीं व मालमत्तेचा बडेजाव मिरविण्या-साठीं मान्य केली होती. अंदमान भागांत मात्र 'एकभार्या' पद्धत फार पुरातनकाळची आहे. सर्व धर्मांनीं बहुभार्यापद्धतीस मान्यता दिली असली तरी परिस्थितीनें सामान्य मनुष्य एका बायकोवरच संसार करतो. ख्रिश्चन धर्म, हिंदुधर्म, ज्यू, मुसल्मानजातीय लोक आजकाल एका भार्येचें स्वामित्व पाळतात. 'लग्न' हें असें अठरा समस्यांचें कडबोळें आहे. समाजाचा सुसंस्कृतपणा विवाहाला अधिक शुद्ध नि सोज्वळ स्वरूप देऊं शकेल अशी आशा करणें फोल आहे. कारण समाजशास्त्रज्ञांना जागतिक दृष्टि-कोनांतून एकच गोष्ट निदर्शनास आली. ते म्हणतात कीं, "समाज जसजसा सुसंस्कृत होतो तसतसा लैंगिक स्वैराचार, दिवाहपूर्व संभोग, वेश्याबाजी वगैरे उतास येतात. अडाणी लोकांत नीतीची जी कडक शिस्त आणि बंधनें आढळ-तात तीं सुसंस्कृत समाजांत आढळत नाहींत."
('The more advanced is civilizaton, the greater is the number of illegitimate births, and the more widespread is prostitution'.— History of marriage, by Westermark) हा सिद्धांत खरा मानला तर आजचा घटस्फोटाचा कायदा पुच्छ प्रगतीचें लक्षण आहे असें म्हणूं या ! वैवाहिक जीवनांत क्रांति घडवून आणावयाची असल्यास—

(१) स्त्री आणि पुरुष यांना एकच नीतितत्त्व लागू करावयास हवें.

(२) वेश्यागरें—बंद हवींत.

(३) चोरटे समागम त्याज्य ठरवून कडक शिक्षेला पात्र व्हावेत.

(४) समानलिंगी संबंध बंद कसे होणार ?

(५) लैंगिक नीति म्हणजे काय हें निश्चित ठरलें पाहिजे.

(६) प्रजावर्धन हा संभोगाचा आद्य हेतु मानावा काय ?

—अनंत प्रश्न सोडविल्याखेरीज लग्नाला पूर्णता येणार नाहीं. ती पूर्णता जोंपर्यंत येत नाहीं तोंपर्यंत गांभीर्याच्या चौकटींत लग्न हा वैचित्र्याचा, विनोदाचा एक फार्सच ठरणार ! हिंदु समाजास वैवाहिक पुनर्घटना केल्याशिवाय आपलें पावित्र्य अबाधितपणें ठेवतां येणार नाहीं हें निश्चित !



**निंबोणीच्या झाडामागें थकूनभागून लपणारा चंद्र त्यांना दिसत नाहीं.
पाऊसपाणी = $H_2O$ हें त्यांना कळतें; परंतु खोटा पैसा दिला कीं चिडून पाऊस कसा मोठा येतो हें त्यांना कळूं शकत नाहीं !**

# निं बो णी च्या झा डा मा गें !

मं गे श पा ड गां व क र

संध्याकाळची वेळ. झाडें कसल्या तरी गूढ तंद्रींत उभीं होतीं. हवेंत प्रसन्नता भरून राहिली होती. अशा वेळीं अंगणांत मोकळ्यावर खुर्च्या टाकून मजेंत गप्पा करण्यांत किती आनंद असतो हें अनुभवाशिवाय कळायचें नाहीं. नेहमींप्रमाणें त्या दिवशीं आम्ही गप्पा करायला बसलों होतों. गप्पा अगदीं ऐन रंगांत आल्या होत्या. इतक्यांत कुणी तरी आकाशांत पाहिलें. पिवळसर सोनेरी रंगाचा चंद्र उगवला होता. या रंगाच्या पार्श्व-भूमीवर चंद्रावरचा काळा ससा उठून दिसत होता. आजुबाजूच्या आकाशाला कांहीं निराळेंच मार्दव आलें होतें. ढगांच्या मनांत सोनेरी आनंद चमकत होता. इतक्यांत अंगावर पाण्याचे दोनचार कोवळे थेंब आले. बघतां बघतां श्रावणांतली मिस्किल लहरी सर आम्हांला भिजवूं लागली. आम्हांला कुणा-लाहि उठण्याचें भान नव्हतें. असें दृश्य नेहमीं थोडेंच दिसतें ? चंद्र—आजुबाजूचा तो सोनेरी रंग—आणि त्यांत पावसाची नाजुक झिमझिम ! एखाद्या कथाकादंबरींत या दृश्याचें वर्णन आलें असतें तर विश्वाससुद्धां बसला नसता. पण त्या क्षणीं हें अद्भुत सुंदर दृश्य आम्ही डोळ्यांनीं पहात होतों. इतक्यांत कुणी तरी म्हणालें, “पहाना बिचाऱ्या चंद्राची फजिती ! मोठ्या दिमाखानें सजून आला होता. त्याचा सगळा सोनेरी साज आतां भिजून गेला असेल नाहीं ?” आम्ही सगळे कौतुकानें हसलों. इतक्यांत एकजण मोठ्यानें म्हणाला, “मूर्खपणाची कमाल झाली बुवा ! अहो, चंद्र कधीं भिजेल काय ? चंद्र आणि पृथ्वी यांत......”

चंद्र आणि पृथ्वी यांत किती अंतर आहे हें आम्हीं सर्वांनींच लहान-पणीं भूगोलांत पाठ केलें होतें. अशा या सुंदर क्षणीं या सद्गृहस्थांना हें ज्ञान आम्हांला पुन्हा पाजूं देण्याची संधी आम्हांला द्यायची नव्हती ! आम्हांला मनांतल्या मनांत ते गृहस्थ हसत असतील, मूर्खांत काढीत असतील याची आम्हांला जाणीव होती. तरीहि धुंद होऊन आम्ही चंद्राकडे बघत होतों... आमच्या डोळ्यांसमोर चंद्र भिजतच होत

या गोष्टीला बरेच दिवस झाले. परंतु त्या गृहस्थाची आठवण माझ्या मनांत अगदीं घर करून आहे. खरेंच, त्या गृहस्थाला भोंवतींच्या सृष्टींतलें आणि जीवनांतलें सौंदर्य टिपून घेतां येत असेल का ? कीं सगळ्याच गोष्टीं-वर आपल्या तर्काचें शस्त्र तो चालवीत असेल ? त्या दिवशीं आम्हां सगळ्यांना त्यानें मूर्खांत काढलें. त्याच्याइतकेंच किंबहुना त्याच्याहून अधिक शास्त्रीय ज्ञान आम्हांला होतें याची त्याला कल्पनाहि असूं नये ? शास्त्रीय सत्य आम्हांला माहीत होतें; परंतु त्या सत्याच्या ओझ्यानें आमचें मन वाकलेलें नव्हतें. अंतरिक्षांत चन्द्राला ग्रह म्हणून जेवढें स्थान होतें तेवढेंच वास्तवपूर्ण स्थान त्याला आमच्या कल्पनेच्या जगांतहि होतें. त्या जगांत श्रावणांतली नाजुक रिमझिम चन्द्राला भिजवूं शकत होती. आणि भिजत असलेल्या चन्द्राला आम्ही हसत होतों. इतकें नटून थटून येऊनसुद्धां सगळा सोनेरी साज भिजून चन्द्राची फजिती झाली म्हणून त्याला चिड-विण्याची अनावर ऊर्मि आमच्या मनांत उसळत होती. मनाच्या त्या जगांत हें सारें वास्तव होतें, खरेंखुरें होतें, जिवंत होतें. मनांतलें हें जग कांहीं आजचेंच नव्हतें. किती तरी दिवसांपासून, पिढ्यापिढ्यांतून तें वाढत आलें होतें. किती तरी दिवसांपासून......

मला माझें बालपण आठवलें. चांदणी रात्र असली कीं आमची आजी आम्हां मुलांना बाहेरच्या अंगणांत घेऊन बसत असे. तें एक जादूचें जग होतें. अंगणांत सतरंजी टाकून आम्ही बसत असूं. आणि मग आमची आजी आम्हांला चांदोबाचें गाणें म्हणून दाखवी—

> चांदोबा चांदोबा भागलास का
> निंबोणीच्या झाडामागें लपलास का
> निंबोणीचें झाड करवंदी
> मामाचा वाडा चिरेबंदी...

चांदोबाचें गाणें आजीच्या तोंडून ऐकतां ऐकतां कुठल्या तरी झाडामागें

अनुक्रमणिका

गुपचुप उभ्या असलेल्या चंद्राकडे आम्ही पहात असूं. पानांच्या झरोक्यांतून चंद्राचें दर्शन होई. थकलेला भागलेला तो चंद्र ! मी आजीला विचारीं, "आजी, चांदोबा भागला कां ग ?" चांदोबा आजीच्या ओळखीचा होता. त्याच्या सगळ्या गोष्टी तिला माहीत असत. आजी सांगायची, "भागेल नाहीं तर काय ? भटक्या नुसता. आकाशभर फिरत असतो." मीं पुढें विचारीत असें, "आणि आजी, निंबोणीच्या झाडामागें तो कां ग लपतो ?" माझ्या साऱ्या प्रश्नांचीं मला उत्तरें मिळत. तीं उत्तरें मीं अजूनहि जपून ठेवलीं आहेत. तेव्हांपासून चांदोबा माझा सोबती झाला तो अजूनपर्यंत ! त्या वयांत एकटा असलों कीं चांदोबाकडे मी टक लावून पहात असें. माझें मनोगत त्याला सांगत असें. तोहि माझ्याशीं खूप बोलायचा. निंबोणीच्या झाडामागें लपणारा माझा हा दोस्त मला किती जवळचा वाटायचा हें शब्दांनीं सांगतां येणार नाहीं !

पावसाची आणि माझी दोस्ती जमली तीहि अशीच. मला अजूनहि तो दिवस आठवतो. त्या दिवशीं काळ्याकुट्ट ढगांनीं जेव्हां आकाश भरून गेलें, विजा चमकूं लागल्या, गडगडाट होऊं लागला तेव्हां मी किती घाबरून गेलों होतों ! कुठल्या तरी गोष्टींतला राक्षस हातांत विजेची तल्वार घेऊन डरकाळ्या फोडीत येत आहे असेंच त्या वेळीं मला वाटलें होतें. पण नंतर कोणी तरी मला पावसाचें गाणें शिकवलें. तें गाणें म्हणतां म्हणतां पाऊस माझा दोस्त झाला. मी उगीच घाबरलों होतों. 'येरे येरे पावसा' असें म्हणून जेव्हां मीं त्याला बोलावलें तेव्हां तो एखाद्या मित्रानें धावत यावें तसा धावून आला. दूर आकाशांत असूनसुद्धां माझें बोलवणें त्याला ऐकूं गेलें होतें. धारांचे लांबलचक पाय जमिनीवर ठेवून माझ्यासाठींच तो इतक्या दुरून खालीं येत होता. खोटा पैसा त्याला दिला कीं तो केवढा चिडायचा ! चिडूनं तो अधिकच जोरानें पडायचा.

चंद्राशीं, पावसाशीं, झाडांशीं, पानांशीं तेव्हांपासून माझा स्नेह जडला. त्या सर्वांवरचीं गाणीं त्या वेळीं मला पाठ येत होतीं. पहाटे पक्षी ओरडूं लागले कीं ते मलाच उठवण्यासाठीं गातात यावर माझा विश्वास बसत होता. माझ्या आजुबाजूच्या सृष्टीशीं मी नातें जोडून होतों. त्या छोट्या छोट्या अर्थशून्य गाण्यांनींच हें नातें जोडलें होतें. त्या गाण्यांनीं हें नातें दृढ केलें होतें.

अर्थशून्य गाणीं ! पण केवढें अर्थाचें विश्व त्यांत भरून असतें ! सारीं शास्त्रें कोळून पिऊनसुद्धां जीवनाचा जो अर्थ कळत नाहीं तो अर्थ या निरर्थक गाण्यांच्या शब्दाशब्दांतून जाणवतो. पहिल्या प्रथम सृष्टीवर प्रेम करायला हींच गाणीं शिकवतात. आकाशांत दूर असलेला चंद्र. त्याचा आणि आपला काय संबंध ? परंतु तो चंद्र थकून भागून निंबोणीच्या झाडामागें कां लपला आहे हा जिव्हाळ्याचा प्रश्न विचारायला हीं गाणीं शिकवतात. एकाद्या जवळच्या स्नेह्याला बोलवावें तसें प्रेमानें अंतःकरण भरून पावसाला 'येरे येरे पावसा' असें आमंत्रण द्यायला हींच गाणीं प्रेरणा देतात.

मला पुष्कळ वेळां वाटतें कीं, शास्त्रीय दृष्ट्या 'अवास्तव' असलेल्या गोष्टींवर हीं गाणीं लहानपणापासून प्रेम करायला शिकवतात म्हणूनच साध्याहि विषयांतलासुद्धां आशय आणि सौंदर्य टिपून घेण्याची शक्ति मोठेपणीं मनांत येते.

चंद्र भिजण्याच्या कल्पनेला हास्यास्पद ठरवणाऱ्या त्या गृहस्थाचें मला आश्चर्य वाटलें तें एवढ्याचसाठीं. लहान असतांना निंबोणीच्या करवंदी झाडामागें थकून भागून लपणारा चंद्र त्यांनीं कधींच का पाहिला नव्हता ? मामाच्या चिरेबंदी वाड्यांत येऊन तूपरोटी खाऊन जाण्याचा आग्रह त्यांनीं चंद्राला कधींच का केला नव्हता ? सहस्रधारांनीं कोसळणाऱ्या पावसाला खोटा पैसा देऊं करून त्यांनीं कधींच का चिडवलें नसेल ? नाहीं तर पावसाच्या सरींत चंद्र भिजण्याची कल्पना त्यांना परकी कां वाटावी ?

माणसें मोठीं झालीं कीं लहानपणा विसरतात. वयाबरोबर मनेंहि प्रौढ होतात. जाड कांचेच्या चष्म्यांतून डोळे किलकिले करून मोठ्या गंभीरपणें जीवनाकडे पाहूं लागतात. प्रौढपणाच्या त्या जाड कांचेंतून तर्काला दिसणारें सत्यच तेवढें त्यांना पटतें. हृदयानें समरस होऊन जाणून घेण्याचें सत्य जाणिवेच्या कक्षेतून हळुहळू निसटूं लागतें. मग निंबोणीच्या झाडामागें थकूनभागून लपणारा चंद्र त्यांना दिसत नाहीं. पाऊस=पाणी=$H_2O$ हें

त्यांना कळतें; परंतु श्रावणाच्या नाजुक सरींत चंद्र कसा भिजतो, खोटा पैसा दिला कीं चिडून पाऊस कसा मोठा येतो हें त्यांना कळूं शकत नाहीं. जादूचें हें सारें जग त्यांना हास्यास्पद वाटूं लागतें.

कांहीं दिवसांपूर्वी कुठल्याशा एका मॉंटेसरी शाळेंत मुलांना उपनिषदां-तले कांहीं श्लोक शिकवून तेच त्यांच्याकडून गाऊन घेतात असें मला तेथल्या एका शिक्षकानें सांगितलें. तें ऐकून मला अक्षरशः धक्का बसला. अशा या शिक्षणानें चंद्र पावसांत भिजतो या कल्पनेला मूर्खपणाची कल्पना असें ठरवणारीं माणसें निर्माण होतील याचें मला भय वाटलें. मी त्या शाळेंत शिक्षक असतों तर निंबोणीच्या झाडामागें लपणाऱ्या चंद्राचींच गाणीं मीं त्यांना शिकवलीं असतीं. सौंदर्याचीं आणि प्रेमाचीं महान् उपनिषदें त्या गाण्यांमध्यें आहेत असेंच मला वाटतें.

जर्मनींत राहून आलेला माझा एक मित्र हिटलरच्या! हुकूमशाही राज-वटींतल्या अनेक गोष्टी मला नेहमीं सांगत असतो. त्या गोष्टी कितपत खऱ्या आहेत हें मला माहीत नाहीं. पण त्या मोठ्या गमतीच्या आहेत यांत शंका नाहीं. त्यांतली एक गोष्ट मला नेहमीं आठवते. हिटलरनें तेथें म्हणे असा कायदा केला होता कीं, प्रत्येक माणसानें आठवड्यांतून एक दिवस तरी बूट न घालतां उघड्या पायांनीं हिंडलेंच पाहिजे. जमिनीच्या स्पर्शाची सवय पायांना व्हायलाच हवी.

या गोष्टीवरून कांहीं वेळां एक गमतीचा विचार माझ्या मनांत येतो. इथें जर अशा तऱ्हेचा कायदा करण्याची पाळी आली तर कोणता कायदा करायचा याचा मी विचार करूं लागतों. माझ्या कांहीं गोष्टी अगदीं ठरून गेल्या आहेत. कायदा करायचाच झाला तर मी अगदीं कडक कायदा करीन कीं, प्रत्येक प्रौढ माणसानें महिन्यांतून एकदां तरी निंबोणीच्या झाडामागें लपलेल्या चंद्राचें दर्शन घेतलेंच पाहिजे. आणि 'चांदोबा चांदोबा भागलास का' हें गाणें मोठ्यानें म्हटलेंच पाहिजे. पावसाळ्याच्या दिवसांत हातांत पैसा धरून 'येरे येरे पावसा' अशी पावसाची आळवणी त्यांनीं केलीच पाहिजे. आणि तुंबून राहिलेल्या पाण्यांत कागदी होड्या करून त्यांनीं सोडल्याच पाहिजेत......

खरोखरीच, प्रौढपणाच्या जाड जाड कांचा डोळ्यांवर बसवून किलकिल्या डोळ्यांनीं भयानक गंभीरपणें जीवनाकडे पाहणारीं माणसें निर्माण व्हायला नको असतील तर हे कायदे केलेच पाहिजेत. इतकेंच नव्हे तर डोळ्यांत तेल घालून त्यांची अंमलबजावणी केली पाहिजे.



चौपाटीच्या लहान् सागरा !
स्वप्नांचीं कबुतरें हींच का
तुझ्या कुशीला विलगुनि होतीं ?
एक आण्याचे चणे खावया
जमलीं माझ्या पायाभंवतीं !

चौपाटीच्या महान् सागरा !
खबर नको देऊं दुनियेला
'बेचाळिस'चा शूर शिपाई
माध्यान्हीची वेळ टळेना
'म्हणून बाकाखालीं निजला'!

—प्रभाकर जोशी


दिवाळीची चमचमीत, खुसखुशीत
आणि खमंग मेजवानी रुचकर
आणि पुष्टिकारक 'व्हेजिप्रो'नें साजरी करा!
Vegipro
VANASPATI वनस्पती
CONTAINS VITAMIN D
BEST FOR ALL COOKING
THE AMRUT OIL MILLS LIMITED
Recipes
FROM A
PRINCE'S PALACE
WITH
HINTS FOR
NUTRITIOUS COOKING
'रेसिप्स फ्रॉम अ प्रिन्सेस पॅलेस' — या विनामूल्य पुस्तिके-
साठीं खालील कुपन आजच भरून पाठवा
मोफत
संपूर्ण नांव :
पत्ता :
AMRUT OIL MILLS LTD., SEWREE, BOMBAY, 15.



याच्या सेवनानें
अशक्त व कृश
मुलें सशक्त होतात.
हें
मुलांना मानवतें
व आवडतें.

**डोंगरे यांचें बालामृत**



के. टी. डोंगरे आणि कं. मुंबई ४



# असंच एक आटपाट

दुर्गा भागवत

आटपाट नगरांतल्या त्या कहाण्या, आमचें कौटुंबिक जीवन प्रेमाच्या आणि कर्तव्याच्या आदेशानें उजळून टाकणाऱ्या त्या कहाण्या साऱ्यांना माहीतच आहेत.

पण त्या कहाण्यांच्या पलीकडचेंहि दुसरें एक कहाण्यांचें विश्व आहे. त्या कहाण्या बहुतेक ब्राह्मणांच्या. पांढरपेशांच्या. पण किती तरी अशीं व्रतें आहेत, पुरातन समजुती आहेत, कीं त्यांचें स्पष्टीकरण या मनोहर पण चिमुकल्या संग्रहांत होणें शक्य नाहीं. थोडीशी इकडे तिकडें नजर टाका, पुराणें बारकाईनें वाचा, महाराकुणब्यांच्या कथागीतांची पहाणी करा कीं हें अज्ञात व विशाल कथाविश्व हळू हळू खुलें होऊं लागतें. प्रचलित समजुतींना हादरे बसतात. दृष्टीस पडूं नये तेंच नेमकें दिसतें. कानीं पडूं नये तें पडतें. आमच्या कहाण्यांतील संकुचित, सोज्ज्वळ जग विराम पावतें. अद्भुतता विशाल होते. नीतीच्या कल्पना प्रखर असल्या तरी वेगळ्या वळणानें धांवतांना दिसतात. मानवी कल्पकता निरंकुश संचार करतांना आढळते. एवढेंच नव्हे तर या कहाण्यांत आपरलेलें तर्कशास्त्र अगदीं अजब असलें तरी इतकें बिनतोड आहे कीं त्याच्यावर टीका करणेंहि कठीण आहे. याप्रमाणें तर्क, विनोद, भावना, काव्यमयता, कल्पकता, गांभीर्य सारें कांहीं एक होऊन त्यांतून हें वाङ्मय निपजलें आहे. भारतांतल्या जातीजातींतून, प्रांताप्रांतांतून तें अखंड वहातें आहे. ऐका त्या. जो अल्हाद त्या वाचतां ऐकतांना मला झाला तोच तुम्हांलाहि होवो.



## पिंपळाला प्रदक्षिणा

थीपारपुरम् देशांत एकशें एक राजे एकदमच राज्य करीत होते. ते शिवभक्त होते. शिवाला प्रसन्न करून त्याच्याकडून त्यांनीं अमरपदाचा व अजिंक्यपदाचा वर मागून घेतला. तो वर मिळाल्यावर ते राजे इतके उन्मत्त झाले कीं त्यांनीं साऱ्या माणसांना जिंकून त्राहि भगवन् करून सोडलें. सारी त्रस्त प्रजा शिवाला शरण गेली आणि म्हणाली, "प्रभो, हा वर आपण या दुष्ट राजांना कां दिला ?" तेव्हां पश्चात्ताप पावून शिव त्यांचें पारिपत्य करायला गेला. पण स्वतःच पराभूत झाला. स्वतःचा जीव बचाविण्यासाठीं पळूं लागला. त्या वेळीं विष्णूनें भयभीत अशा त्या शिवाला म्हटलें, "पलीकडल्या तळ्यावर त्या राजांच्या बायकां नहायला येतात. त्यांच्या पातिव्रत्याचा प्रभाव इतका मोठा आहे कीं, त्या किनाऱ्यावरच्या वाळूचे पितळेचे हंडे बनवतात आणि मग त्यांतून पाणी भरून घरीं नेतात. त्या भांड्यांतल्या पाण्याच्या प्रभावानें त्यांचे पती इतके बलाढ्य झालेले आहेत. त्या सतींच्या पुण्यामुळें जरी एवढें सामर्थ्य त्यांच्या नवऱ्यांना आलें असलें, तरी एक अनिवार्य दुःख त्यांना पोळतें आहे. तें म्हणजे, या साऱ्या बायका वांझ आहेत. तूं पिंपळाचें झाड हो. मी होतों ऋषि. उद्यां त्या स्नानाला आल्या कीं त्या साहजिकच माझ्याकडे येतील आणि मूल व्हायला कुठला तरी उपाय सांगा म्हणून म्हणतील. मी मग त्यांना पिंपळाच्या झाडाला



# नगर होतं......

मिठी मारायला सांगेन. अशा तऱ्हेनें तूं त्यांचें पातिव्रत्य हरण कर, म्हणजे हे राजे तत्काल दुर्बळ होतील."

शिवानें त्याप्रमाणें पिंपळाचें रूप घेतलें. विष्णूनें सांगितल्याप्रमाणें त्या राण्यांनीं पिंपळाला दृढ आलिंगन दिलें आणि त्या वाळू मळून तिचीं भांडीं करूं लागल्या. पण आतां वाळूचे कण एकमेकांना चिकटेनात. कुठून तरी दुसरीं भांडीं आणून त्या बायकांनीं पाणी घरीं नेलें. पण तें दूपित अन्न खातांच त्यांच्या पतींची सर्व शक्ति क्षीण झाली आणि शिवानें त्यांचा नाश केला. या राण्यांना पुढें एकशें एक मुली झाल्या. या मुलींना नवऱ्यांच्या मागून कसें पोसावें, म्हणून त्या आयांना काळजी पडली. त्या शिवाकडे गाऱ्हाणें घेऊन गेल्या. तेव्हां शिव म्हणाला, "या मुली शक्ति-देवता म्हणून ओळखल्या जातील. त्या लोकांना पीडतील. आणि मग त्यांना प्रसन्न करण्यासाठीं माणसें त्यांना नित्य बलि अर्पण करतील. पूजा देतील. अशा तऱ्हेनें त्या आपला निर्वाह चालवूं शकतील."

[ द्रविडी धनगर लोककथा ]

●

## दुसरी प्रदक्षिणा

देवांचें आणि राक्षसांचें युद्ध चालू होतें. देवांनीं शिकस्त केली. हजारों राक्षस मारले. पण काय चमत्कार होई! राक्षसांच्या प्रत्येक गळलेल्या रक्ताच्या थेंबांतून नवे राक्षस निर्माण होत. जन्मतःच ते वाढलेले असत् आणि मग ते लढूं लागत. एका राक्षसाच्या रक्तबिंदूतून शेंकडों नवे राक्षस निर्माण होत. राक्षसांची ही अचाट उत्पत्ति पाहून देव थकले. त्यांनीं सभा भरवली. राक्षसांची संख्या कमी व्हायला काय करावें याबद्दल त्यांनीं विचार चालवला. आणि ब्रह्मदेवांना कल्पना सुचली. राक्षसांना तेव्हां लिंग नसे: ना स्त्रीचें, ना पुरुषाचें. ते नपुंसक होते. राक्षसांची उत्पत्ति अशी रक्तस्रावांतूनच होत असे. आणि म्हणून त्यांची प्रजा बेसुमार वाढत असे. तेव्हां माणसांसारखी प्रजानिर्मितीची पद्धत जर या राक्षसांना शिकवली तर त्यांची प्रजा मर्यादित होईल. शिवाय संभोगसुखाचें आकर्षण राक्षसांना होतेंच व तें मिळत नसे म्हणून ते दुःखी असत. तेव्हां ब्रह्मा, विष्णु, महेश हे ब्राह्मणांचीं रूपें घेऊन, हातीं पोथ्या घेऊन राक्षसांच्या नगरींत आले. राक्षसांचा घोळका जमला. सगळ्यांच्या पत्रिका ब्राह्मण भराभर तयार करूं लागले. देवासुरांच्या घनघोर युद्धांत आपण कदाचित् कायमचे नष्ट होऊं ही धास्ती राक्षसांना असल्यानें आपली संतति आणखीहि खूप खूप वाढावी अशी इच्छा त्यांच्या मनांत होती. ब्रह्मदेव म्हणाले, "आहे त्यापेक्षां खूप खूप प्रजा तुम्हांला हवी का?" "होय." राक्षस एकमुखानें म्हणाले.

"तर मग असं करा, ज्यांना मुलं हवीं असतील त्यांनीं उद्यां गांवाबाहेरच्या पिंपळाला प्रदक्षिणा घालून मिठी मारावी."

मग विष्णु पिंपळाचा बुंधा झाला. शिव मुळं, आणि ब्रह्मा शाखा. त्या झाडांच्या बुंध्याला ज्या राक्षसांनीं आलिंगन दिलें, त्यांना योनिमार्ग उत्पन्न होऊन त्यांच्या स्त्रिया झाल्या. आणि पिंपळापासून त्यांना गर्भ राहिले. त्यांना शंभर मुली व एक मुलगा झाला. त्यांनाच शक्तिदेवता म्हणतात.

[ द्रविडी मातंग लोककथा ]

●



## पांचवी पूजतात त्या दिवशींची

सटवीची मुलगी नटवी. ती आईला काय बोलते, "काय बाई समद्यो लोकांच्या नशिबामंदी समदं लिवतेस. माझ्या नशिबांत काय लिवतेस सांग."

सटवी म्हणाली, "मी काय सांगूं?"

नटवीनें नेट धरला, "तूं नाहीं सांगितलंस तर मी तुला तोडून खाईन. तू दुनियाभर लिवाघालायला जातेस तर मी जाऊन देणार नाहीं. माझे कपाळीं काय लिवलंस तें सांग."

सटवी बोलली, "सोड, मला जाऊं दे. मला लिवणं करायला वखत झाला. दुनिया खोळंबली आहे. ऊठ वाटेंतून."

तशी नटवी काय बोल्ते, "नाहीं सोडणार वाट.

माझे कपाळीं काय लिवलं
मला बोलून नांव सांगावा
माझ्या रामा र जी जी र जी जी जी—

मला तें सांग. तर मी जीव ठेवीन. नाहीं तर वाहीं."

तेव्हां सटवी म्हणाली,

"बाई तुला गे नवरा नाहीं
नंवरा नाहीं ग जी जी ग जी जी जी—

जे वाटेनं तूं जाशील त्या वाटेनं जो कुणी येईल त्याची न् तुझी नजरानजर होईल. तसाच तुला गर्भ राहील, तो तुझा मुलगा.

मग तान्हा तुझा नवरा होईल
नवरा होईल ग जी जी ग जी जी जी... "

नटवीनें कानांवर हात ठेवले. "मी कुणा पुरुषाची सांवली अंगावर घेणार नाहीं. कुणाशीं बोलणार नाहीं. चालणार नाहीं. नुसत्या नजरेनेंसुद्धां पहाणार नाहीं. मग कसा मला गर्भ राहील? माझा मुलगा कसा माझा नवरा होईल?"

सटवी म्हणाली, "माझं लिवणं खोटं व्हायचं नाहीं. तुझ्या पाळीला हेंच नशीब होतं. तें तुला आलं." सटवी लेखणी घेऊन निघून गेली.

नटवी घर सोडून निघाली. सटवीच्या बोलांची पारख करायला. तें खोटें ठरवायला. नटवी रानावनांतून चालली. माणूस दिसणार नाहीं अशा वाटेनें फिरली.

—वाटेनं निघाली ना ग ती बाई
जंगलांतनं आला भिल्ल
माझ्या रामा र जी जी ग जी जी जी—

तों काय झालं? समोरून येणाऱ्या त्या भिल्लाची आणि नटवीची नजरानजर झाली. भिल्लाचे लाल डोळे. धारेची नजर. झटकन् सटवीनें नजर दुसरीकडे वळवली. भिल्ल आपल्या वाटेनें गेला. नटवी पुढें चालली. तों काय झालें? त्या भिल्लाचा पिसाब ओलांडून ती गेली. तिला काय माहीत तें? पण पिसाब ओलांडला तशीच ती गरवार राहिली. तिला पोट राहिलें. पोट वाढलें तशी ती घाबरली. 'माझं कुणाशीं बसणं नाहीं. उठणं नाहीं अन् हें काय झालं?" नटवी बिगरभोगाची. बिगरलगनाची. तिला गरवारपण काय ठावें? तिला वाटलें कीं हें पोट असें कां फुगलें? पण दिसामाशीं पोट वाढूं लागलें. नटवी मनांत उमजली. भिल्लाची नजर तिला आठवली. सटवीचें लिहिणें आठवलें. "रांड जें बोलली तें अर्धें तर खरं झालं. पण पोर मी मारून टाकीन. मग कसा तो माझा नवरा होईल?" नटवी आपल्याशींच बोलली. नऊ महिने, नऊ वेळा भरल्या. नटवीच्या पोटाला कळ लागली. जंगलांत ढोरें जमायच्या जागीं नटवी गेली. तिथेंच ती बसली. तिथेंच बाळंत झाली. तिला मुलगा झाला. पण नटवीनं त्याला मारलें नाहीं. पोर झालें कीं माया येतेच. तिनें दगडानें नेसल्या पितांबराचा पदर तोडून फाडला आणि मुलाला त्यांत गुंडाळून ठेवलें. उद्यां गुरें येतील, तीं पाठीवर पाय देतील आणि पोर मरेल. मी कशाला मारूं? तो मेला कीं सटवीचें लिहिणें कसें खरें होईल? असा विचार करून मुलाला तिथेंच सोडून नटवी पुढें निघाली. ती गेली ती एका नगरांत गेली आणि एका बाईच्या शेजाराला राहिली.

इकडे काय प्रकार झाला? ढोरें आलीं पण मुलाला त्यांनीं तुडवलें नाहीं. बाजूला उभीं राहिलीं. ओरडूं लागलीं. गुराख्यानें पाहिलें. "अरेरे! कुणा राजाचं नाळावारासकट पोर दिसतं आहे. चला राजालाच तें देऊं या. कसं राजतेज आहे!" असें बोलून त्या गवळ्यांनीं तो मुलगा प्रधानाला आणून दिला. प्रधानानें तो मुलगा राजाला दिला. राजाला मूल नव्हतें. त्यानें तो मुलगा घेतला आणि म्हणाला, "अग टकलं बांधून राणी बाळंत होऊं दे. हा मुलगा."

राणीनें डोकें बांधलें. बाळंतपणाचें सोंग केलें. लोकांत साखर वांटली. लोक म्हणाले, 'पोट नाहीं दिसलं आणि राणी बाळंत कशी झाली?" पण होतां करतां लोक विसरले.

राणीनें पितांबराचा तो जरीचा फडका स्वतः साबण लावून धुवून व शेवतेल मोगरेल घालून अत्तराच्यां पेटींत बंद करून ठेवला.

तो मुलगा दिशींमाशीं दिव्याच्या ज्योतीं असा वाढूं लागला. बारा वर्षें झालीं. राजा म्हणाला, "याचं लगन करायचं. परधानजी, सुंदर मुलगी शोधा."

प्रधान बोलला, "एका नंगरांत सुंदर पोरगी
हाय असा हो इचार झाला
माझ्या रामा र जी जी र जी जी-

ती मुलगी म्हाताऱ्या आईजवळ राहते. कुणाशीं बोलत नाहीं, चालत नाहीं. घराबाहेर पडत नाहीं. सत्पतिव्रता आहे. बारा वर्षांची कोवळी पोर. सूर्याच्या तेजाची, मुठीच्या भेजाची. बत्तीस-गुणी. छत्तीस-लक्षणी. राजपुत्राच्या मुखवट्यासारखा तिचा मुखवटा. तेंच तेज. तोच रंग." प्रधानानें सांगितलें.

राजा म्हणाला, "लगन ठरवून या."

प्रधान नटवीच्या नगरींत गेला. म्हातारीला म्हणाला,

"अगे बाई ना तुझी मुलगी
आमालान द्यावी हो जी जी ग जी जी जी—

आमचा राजपुत्र बारा वर्षांचा आहे. अगदीं तुझ्या मुलीला साजेसा. त्याच उमरीचा."

म्हातारी म्हणाली, "मी आतां पिकलें. मुलीचं लगन तर करायलाच हवं. होऊं दे लगन."

राजानें लगनाचा आकार (उत्सव) केला. खंडोखंडींचे राजे आले. आतदिवारच्या हळदी, सोमवारीं लगन लागलें. नटवी नवऱ्याबरोबर सासरीं आली, नांदूं लागली.

कांहीं दिवस गेले हो गेले
माझ्या रामा र जी जी ग जी जी जी—

नटवीला राजपुत्राच्या पोटचा मुलगा झाला.

त्याला मुलगा नाहो जाला हो जाला—

दहाव्या दिवशीं नटवी नावून घरांत आली. मुलाला पाळण्यांत घालायला नगरच्या बाया आल्या. राणीला याद आली. ती उठली. तिनें जाऊन तो पेटींतला फडका आणला. 'माझ्या मुलाच्या अंगावर हा शकुनांचा कपडा होता. तसा नातवाचा असूं दे—' असें मनांत येऊन तिनें तो फडका तान्ह्या मुलाच्या अंगावर घातला. तो पाहून नटवी चपापली. ती सासूला म्हणाली—

अगे आतेबाई हा ना ऽ
कपडा तुला कुठं मिळाला
मिळाला मला तूं सांग ग जी जी जी—

सांग तर मी जीव ठेवीन. नाहीं तर नाहीं." तेव्हां राणी बोलली—

"अगे बाई तुझा नवरा
माझ्या पोटचा नाहीं ग जी जी जी—

हा जंगलांत गवळ्यांना मिळाला. त्यांनीं आणला त्या वेळीं त्याच्या अंगावर हा होता."

'माझ्या करमा रे' म्हणून नटवी रडूं लागली. माझ्याच पोराबरोबर माझा संग झाला. याचाच हा पोरगा. जंगलांतल्या भिल्लाची नजरानजर झाली तसा हा मुलगा झाला. माझी आर्धी कुणा पुरुषाबरोबर बातचीत झाली नाहीं.

नटवीनें हातांत खड्‌गा घेतलं आणि बोलली—

माझ्या आईन काल लिवलं
हा नै लिखा चुकेच वरमादिका ग जी जी ग जी जी जी—”

तिनें—

एका घाईन केन तुकडे केलन
माझ्या रामा र जी जी ग जी जी जी

तिच्या त्या मुलग्याची परतपालटी आजीनें केली.

[ देशावरचे महार लोककथा ]



## हरितालिका

हरितालिका म्हणजेच हरिकालिका. हिरव्या गवताची शोभा. हिरवी काळी अशी देवता. दक्षाची कन्या सती ही नीलकमलाप्रमाणें काळी. शंकर कापरासारखे गोरे. दोघांचें लग्न झालें एकमेकांच्या पसंतीनेंच. सतीचें सुन्दर मुखमंडळ शंकरांना आवडे. तिची सुबक सुकुमार देहलता, तिचें प्रेममय भाबडें अंतःकरण, तिचा रागरुसवा, सारें कांहीं त्यांना मोह पाडी. विशेषतः ती चिडली कीं शंकर खूष व्हायचे हें ठरलेलें. शंकर नेहमीं प्रेमप्रसंगीं तिचा हात हातीं घेऊन म्हणायचे, “मी गोरा आणि तूं काळी. तुझ्या बापानें गळ्यांत बांधली म्हणून करून घेतली. नाहीं तर काळी बायको कोण करतो?” मग सती चिडे. लागलीच शंकर तिला जवळ घेत व तिचा रुसवा काढीत.

पण एकदां सारे देव कैलासावर जमले होते. ऋषीहि होते. ब्रह्मदेव आणि विष्णु शंकरांच्या जवळ. विष्णु मूळचाच चेष्टेखोर. त्याला पाहून शंकरांच्या मनांतली विनोदबुद्धि उसळून आली आणि मग आंत घरांत असलेल्या सतीला ‘सती’ अशी हांक न मारतां एकांतांत ‘काली’ किंवा ‘हरिकाली’ असें संबोधीत तशी हांक मारून ते म्हणाले, “अग काली, नीलोत्पलाच्या रंगाची, जरा इकडे ये.” सती शिवगण आणि मातृकांच्या घोळक्यांत अग्रभागीं बसली होती. ती उठली नाहीं. तिला विष्णूच्या मुखावर चमकलेलें हास्य पाहून राग आला. शंकर फिरून म्हणाले, “अग, लवकर बाहेर ये. तूं काजळासारखी काळी असलीस तरी तुझं सौंदर्य इतकं खुलतं कीं कांहीं पुसूं नकोस. म्हणूनच तें मला प्रिय आहे.” आतां सतीला क्रोध आला. तिच्या सहनशीलतेची मर्यादा तुटली. डोळ्यांतून पाणी व क्रोधाच्या ठिणग्या पडूं लागल्या. “या साऱ्या परक्या लोकांच्या देखत तुम्ही काळी काळी म्हणून माझा पाणउतारा कां करतां? जातें आतां. तप करतें. गोरी बायको म्हणजेच ना रूपवान्? होईन गोरी तरच येईन घरीं.” असें म्हणत ती सती घरांतून बाहेर पडली. शंकरांच्या तोंडचें पाणी पळालें. त्यांनीं समजावलें, चुकलों म्हटलें, पण व्यर्थ. सतीनें तप केलें. गोरी होऊन

नवऱ्याच्या प्रीतीचा लाभ व्हावा म्हणून तिनं स्वतःचा देह होमण्याचा निश्चय केला. तिची काळी कांति निघून आली ती अर्धी गवतावर पडली. तेव्हांपासून गवति काळें हिरवें झालें. अर्धी कांति विन्ध्यवासिनी देवता झाली. आणि सतीनें उडी टाकली तोंच हिमालय मेनेबरोबर तिथें आला आणि मेनेनें ती गोरी सती आपल्या ओटींत झेलून घेतली.

हरितालिकेचें व्रत हें असें सौंदर्यप्रसाधनानें पतीची प्रीति संपादिण्याचें होतें ( भविष्यपुराणांतून ). विष्णुधर्मोत्तर पुराणांत वर्षाऋतूचें वर्णन आहे त्यांत हा ऋतु ‘ हरिद्वर्ण ’ म्हणजे हिरव्या रंगाचा आहे असें म्हटलें असून त्याची पूजा ‘ हरितालि दलां ’नीं म्हणजे हरळ्यांनीं किंवा हरताळाच्या पानांनीं करावी असें सांगितलें आहे. हरिकालिकेचें रूपांतर हरितालिकेंत हें जसें झालें आहे व नंतर त्याला पार्वतीच्या शंकरासाठीं केलेल्या तपाची पुस्ती जोडण्यांत आली.

[ भविष्योत्तर–पुराणकथा ]



## नागपंचमी

एका राजाला सात मुली होत्या. राजानें विचारलें, “ तुम्ही कुणाच्या नशिबाच्या ? ” सहा मुलींनीं उत्तर दिलें, “ बाबा, आम्ही तुमच्या नशिबाच्या. ” धाकटी चांगो मात्र म्हणाली, “ मी नाहीं कुणाच्या नशिबाची. मी आपली माझ्या नशिबाची. ” बापाला राग आला. “ तूं आणि तुझं नशीब का ? बघतों माझ्याशिवाय कसं होतं तें. ” असें म्हणून बापानें साती मुलींचीं लग्नें जमवलीं. मोठ्या मुलींना तालेवार तरुण राजपुत्र पाहून दिले, हिऱ्यामाणकांचे अलंकार दिले. रेशमी पैठण्या, दासदासी सारें कांहीं आंदण दिलें. चांगोला नवरा करून दिला, तो हातपाय झडलेला महारोगी नातेवाइकांनीं टाकलेला. लोळत लोळत भीक मागून कसा तरी जगलेला नाक झडलेला. डोळे गेलेला. “ देवा, सोडव आतां, ” असा आक्रोश करणारा. “ नका देऊं तिला भिकाऱ्याला. तरुण तरी बघायचा होता. धट्टाकट्टा तरी असायचा होता. ” आईनें विनवलें. पण बापानें जुमानलें नाहीं. चांगोनें केलेला अपमान त्याच्या जिव्हारीं लागला होता. फाटकें लुगडें नेसवून त्यानें तिचें लग्न त्या कुष्ठ्याशीं लावलें. आणि एका घोड्यावर दोघांना घालून तो घोडा लांब जंगलांत नेऊन सोडा म्हणून हुकूम दिला. आई रडत होती. बहिणी चेष्टा करीत होत्या. “ वा ! काय छान नवरा तुझा. असा आम्हांला नाहीं मिळायचा हो ! ” असें हिणवून बोलत होत्या. पण चांगोच्या मुद्रेवर दुःखाचा लवलेश नव्हता. गंभीर, शांत होती तिची चर्या. “ माझ्या नशिबांत होता तो मला मिळाला. चालेल मला. ” ती म्हणाली. आईनें दिलेले तहानलाडू भूकलाडू घेऊन ती जंगलांत आली. पतीचें मुटकुळें तिनें घोड्यावरून उतरून घेतलें. तो तर मरणाच्याच दारांत होता. ‘ हा गेला तर आपल्याला तरी जगून काय करायचें ’ असें मनांत आणून तिनें त्याची मनोभावानें शुश्रूषा चालवली. त्याला थोडें अन्न खाऊं घालण्याचा प्रयत्न चालवला. आपला वांटा मात्र ती जवळ नागाचें वारूळ होतें त्यांत टाकी. तें खाऊन नाग संतुष्ट झाला. “ मुली, तूं कोण ? ” त्यानें विचारलें. “ मी चांगो. राजाची लेक पण कुष्ठ्याची बायको. मी माझ्या नशिबाची असं म्हणालें म्हणून बापानें कुष्ठ्याला दिली. ” चांगोनें सांगितलें. “ खरंच तूं तुझ्या नशिबाची हो. ” नाग म्हणाला, “ तुझ्या अन्नानें मी संतुष्ट झालों. तूं माझी मुलगी हो. या वारुळाचा राजवाडा करतों. ” असें म्हणून नागानें तिच्या पतीला दंश केला. चांगो घाबरली. पण लवकरच तिच्या पतीचा कायापालट होऊन तो सुंदर आणि तरुण झाला. तिच्याकडे प्रेमानें आणि कृतज्ञतेनें हसून पाहूं लागला. त्यांच्यासमोर एक सोन्याचा रत्नखचित राजवाडा उभा होता. आंत दासदासी ये-जा करीत होत्या. मेण्यांत बसून राजाराणी आंत गेलीं. खोल्यांतून मोत्यापोवळ्यांचे, हिऱ्यामाणकांचे, नीळापाचूंचे ढीग पडले होते. अत्तरांचे, माणकांचे दिवे पेटले होते. केशर-कस्तुरीच्या पक्वान्नांचा घमघमाट सुटला होता. चंदनाचे पलंग होते. सहा महिने पतिसेवेंत आनंदानें घालवून चांगोनें पित्याला आणण्यासाठीं पालखी पाठवली. आणि बरोबर चिठ्ठी लिहिली : “ चांगोचं नशीब पाहून जा. ” बाप आला आणि थक्क झाला तें वैभव पाहून. “ ही सारी नागदेवाची कृपा. ” चांगो म्हणाली.

[ कोरकू लोककथा ]



## सटवी ब्रह्याची कहाणी

सटवाई जंगलांत रहायची. रोज सकाळीं रानांत जाऊन बोरू आणायची; त्याच्या लेखण्या करायची. काजळ दिव्यावर धरायची. त्याची शाई करायची. रात्रीं घराबाहेर पडायची. तिची मुलगी झोंपली म्हणजेच ती बाहेर जायची. एकदां मुलीला जाग आली. तिनें पाहिलें कीं आई बाहेर जाते आहे. तेव्हां ती म्हणाली, " आई, तूं कुठें जातेस ? मला टाकून जाऊं नको. "

सटवाई म्हणाली, " अग, मी कशी राहूं ? ब्रह्मदेवाचा हुकूम आहे. बायका बाळंत झाल्या कीं पांचव्या दिवशीं मी लिहायला जातें. सहाव्या दिवशीं लिहिणं सुकलं कीं पुसलं तें पहातें. "

" तूं काय लिहितेस ? "

" मी जें जें त्या मुलाच्या राशीला येईल तें तें लिहितें. "

" माझ्या राशीला काय आहे सांग. "

" तुला चांभार नवरा मिळेल. तुझं प्रेम तुझ्या मुलावर असेल. "

मुलीला असें सांगून आई निघून गेली. मुलगी विचार करूं लागली. आई म्हणते तें खरें का ? पहावें तें खोटें ठरवतां येतें कीं नाहीं. आणि ती मध्यरात्रीं घराबाहेर पडली. वनामागून वनें तिनें ओलांडलीं. एकदां ती एका तळ्याजवळ आली. इतक्यांत तिथून दोन घोडेस्वार येतांना दिसले. मुलगी झाडावर चढली.

ते दोघे तरुण होते. रूपवान् होते. त्यांपैकीं एक तर फारच सुरेख होता. हुशार होता. तो होता प्रधान आणि दुसरा होता राजा. ते प्रवासी त्या तळ्याकांठीं वडाच्या झाडाखालीं फराळाला बसले. त्यांचें आपसांत बोलणें सुरू झालें. मुलीनें ओळखलें कीं हे राजे-प्रधान असून यांचें एकमेकांवर फार प्रेम आहे. म्हणून तिनें विचार केला—यांतल्या ह्या देखण्या प्रधानाबरोबर लग्न झालें तर आईचें भाकीत खोटें होईल. ती वडाच्या झाडाच्या लहान डिकशा त्यांच्या अंगावर फेकूं लागली. राजे-प्रधान वर पाहूं लागले. तों त्यांना ही देखणी मुलगी दिसली. त्यांनीं तिला खालीं उतरायला सांगितलें.

" मुली, कोण तूं ? " राजानें विचारलें.

" आहें मी अशीच एक. मला घरदार नाहीं. "

" प्रधानाशीं लग्न लावतेस ? "

" हो. "

आणि मग मोठ्या समारंभानें तिचें लग्न प्रधानाशीं झालें. कांहीं काळ मोठ्या आनंदांत गेला. आणि तिला मुलगा झाला. पांचवीच्या दिवशीं सटवीच्याऐवजीं अरी बाळंतिणीच्या खोलींत पुजली गेली. त्याबरोबर प्रधानाच्या बायकोनें विचारलें, " सटवी कां नाहीं पुजली ? "

" आमच्या घरीं आम्ही अरी पुजतों. सटवी पुजण्याची चाल आमच्यांत नाहीं. " सासू म्हणाली.

" अरेरे ! घात झाला ! " अखेर प्रधान झाला तरी जातीचा चांभार. अरीच तो पुजायचा. आईचें भाकीत खरें ठरलें. तिनें मुलाला तसेंच टाकलें, आणि ती पळाली. रात्रींच तिनें अंधारांत घर सोडलें. रानांतून लपून छपून ती दूर दूर निघून गेली. सकाळीं घरांतलीं माणसें बघतात तों आई नाहीं. मुलाचा घसा रडून रडून सुकला होता. त्याला दाईच्या हवालीं केलें. आईचा खूप तपास केला, पण पत्ता लागला नाहीं. दाईच्या दुधावर मुलगा जगला. आजीच्या मायेंत वाढला. तो मोठा झाला तेव्हां त्याला कळलें कीं आपल्याला आई नाहीं. " माझी आई कुठें आहे ? " तो विचारी.

" तुला टाकून ती गेली. तिचा पत्ता नाहीं. " आजी सांगे. पण मुलाच्या मनांतून आईचा विषय जाईना. आपण मोठे झालों कीं [illegible] पत्ता लावायचाच असा त्यानें निश्चय केला. अठरावें वर्ष लागलें आणि तो घोडा घेऊन आईच्या शोधाला निघाला. गांवोगांव तो विचारी पण पत्ता लागला नाहीं. एक दिवस थकून तो चालला असतां संध्याकाळच्या वेळीं नेमका तो त्यांची आई होती तिच्या दारापुढें आला. ती दारांतच होती. तरुण आणि देखणी होती ती. मुलाचें रुप तर काय वर्णावें ? दोघें एकमेकांवर लुब्ध होऊन बघतच राहिलीं. त्यानें तिला विचारलें, " मी मुशाफिर आहें. रात्रीचा आसरा मिळेल का ? "

" अवश्य. " ती म्हणाली.

एकमेकांचीं मनें त्यांना केव्हांच कळलीं होतीं. आतां आईचा त्याला विसर पडला. या स्त्रीच्या प्रीतींतच तो रंगला. इतके दिवस एकांतवासांत

अब्रूनें काढणाऱ्या त्या स्त्रीलाहि आईच्या भाकिताचें विस्मरण पडलें. असें प्रेम तिनें कुणावर केलें नव्हतें, जणुं जन्मोजन्मींची मैत्री होती त्यांची. आनंदांत तिनें स्वैंपाक केला. एकाच ताटांत दोघें जेवलीं. "हा कुठचा कोण—" "ही कोण—" दोघांनाहि विचारण्याची जरूर वाटली नाहीं. जेवणानंतर एकाच शय्येवर दोघें बसलीं. त्याच्या बाहूंचा विळखा तिच्या अंगाभोंवतीं पडला. तिचे हात त्याच्या गळ्यांत. ओठांना ओठ मिळाले. आणि नंतर आजन्म पतिपत्नी म्हणून राहण्याची शपथ त्यांनीं घेतली.

"दिवसांमागून दिवस लोटले आणि व्हायचें तेंच झालें. तिला दिवस गेले. आणि मग त्या स्थितींत तिला पुढचें मागचें सारें आठवूं लागलें. 'हा कोण हें आपण विचारलेंसुद्धां नाहीं.' तिनें त्याला त्याचा इतिहास विचारला. त्यानें तो सांगितला. "माझी आई पांचवीची भरी पाहून घरांतून निघून गेली. तिला शोधायला मी निघालों होतो. तोंच तुझी गांठ पडली आणि इथेंच राहिलों."

हिचें तोंड पांढरें फटक पडलें.

"तूं प्रधानाचा मुलगा ?"

"हो."

"अरेरे ! पोरा, काय माझं दैव ! माझ्या राशीला लिहिलेलं खरं झालं. जळो माझं रूप. जळो माझं चिरतारुण्य !"

"कां ? काय झालं ?"

"मीच तुझी आई."

त्याला आपल्याभोंवतीं पृथ्वी गरगरां फिरते आहे असें वाटलें.

बेभान अवस्थेंत ती घरांत गेली आणि एक सुरा घेऊन तिनें आपली मान कापून घेतली.

प्रधानपुत्र बावरला. खरें सांगावें तर अब्रू जाते, पाप माथीं येतें. आणि न सांगावें तर खुनाचा आळ येणार. काय करावें ? जें काय व्हायचें तें होऊन गेलें होतें. आतां जगलें काय आणि मेलें काय, सारखेंच होतें. तोच सुरा त्यानें तिच्या हातांतून काढून घेतला आणि शेजारीं बसून त्यानेंहि आपली मान कापून घेतली. दोन शिरें अलग उडून पडलीं. दोन धडें एकमेकांना बिलगून कायमचीं झोंपलीं.

[ कोंकणांतल्या कुणबी लोककथांतून ]



## दुसरी सटवीची कहाणी

अर्जुन एकदा धनुष्यबाण घेऊन इंद्रसभेंत गेला. इंद्रसभेंत इंद्राची कन्या बालुराणी नाचत होती. बाजूला अप्सरा उभ्या होत्या. गंधर्व गात होते. देव पहात होते. इंद्राची कन्या ती बालुराणी. काय तिचें रूप वर्णावें? सूर्यां उगवूं नको, चंद्रा मावळूं नको, पायीं पद्में, बेंबींत रत्नें, दवण्याची काडी, मरव्याची जुडी, बोरींतली कीड, अशी ती बालुराणी नाचतां गातांना पाहून अर्जुनाला मूर्च्छा आली. वासुदेवानें वारा घातला, मेघदेवानें पाणी शिंपलें. अर्जुन सावध झाला. उठून उभा राहिला. आणि तोंच बालुराणीची नजर त्याच्यावर गेली. डोळ्यांची बोली डोळ्यांना कळली. बालुराणीनें गायन केलें. अर्जुनाला आपलें मानस सांगितलें: "माझा बाप देवांचा राणा. सारे देव, मानव, तो तुच्छ करतो. त्याच्या तोलाचा जांवई मिळेल तरच माझें लगीन होईल. तेव्हां जो कोणी वीर असेल त्यानें रात्रीं नंदनवनांतून माझें हरण करावें."

बालुराणीचें गाणें ऐकून इंद्रदेव खूष झाला. अर्जुन उमजला.

आणि त्या रात्रीं सारे देव झोंपले तेव्हां ती बालुराणी अर्जुनाबरोबर पळून जाण्यासाठीं निघाली.

"इंद्राची नाग बालुराणी
झाली अर्जुनाची राणी"

असें कवन म्हणत ती म्हणाली, "अर्जुना, तुमच्याबरोबर मी येतें."

"पण तुझ्या घराला सात दरवाजे. एकेका दरवाज्यावर सात हजार पहारेकरी. तुला कसं नेऊं?" अर्जुन म्हणाला. बालुराणी म्हणाली, "मी सुईच्या वेजाएवढी होतें आणि आंब्याच्या कोयींत बसतें. मग तुम्ही मला न्या." आणि मग सुईच्या भोंकाएवढी झालेली ती बालुराणी अर्जुनानें आंब्याच्या कोयींत भरली. ती कोय मांडी चिरून मांडींत घातली आणि अर्जुन मर्त्य लोकांत आला. कुणाकुणाला बालुराणी दिसली नाहीं. सकाळीं इंद्रसभेंत हाहाकार झाला. बालुराणी कुठें गेली? 'जो बालुराणीचा शोध लावील त्याला मी हवें तें बक्षीस देईन.' इंद्रदेवानें पण लावला. देवांच्यामध्येंसुद्धां बालुराणीच्या नखाला कुणी हात लावायचा नाहीं, तर मग इतर कोण तिचा हात धरून नेणार? देव चिंतेंत पडले. त्यांना अर्जुनाची शंकाच आली नाहीं. ना दोघांचें बोलणें, ना चालणें.

इकडे खांद्यावर धनुष्यबाण घेऊन अर्जुन पृथ्वीवर आला. धनुष्यबाण त्यानें काढून ठेवले, मांडी चिरली. बालुराणीला त्यानें बाहेर काढून बसवलें, आणि आपण आंघोळ करायला आडोशाला तळ्यावर गेला. बालुराणीसमोर स्नान कसें करणार? बालुराणी तळ्याच्या जवळच बसून राहिली. त्या वाटेनें जात होती एक कोळ्याची बायको. तिनें बालुराणीला पाहिलें आणि ती म्हणाली, "बाई, तूं कुणाची कोण? वनांत का हिंडतेस?"

"मी इंद्रदेवाची बालुराणी, अर्जुनाची झालें राणी." "बालुराणी? आणि अशी एकटी? मी होतें तुझी मैत्रीण. तुला जेवूं खाऊं घालीन. तुझी सेवाचाकरी करीन."

बिचारी देवकन्या. खोटें बोलणें, जगाचे व्यवहार तिला काय माहीत! तिनें कोळिणीला आपली मैत्रीण केली. बसल्या दोघी बोलत. आणि मग बालुराणीचा एकेक दागिना पाहून कोळीण स्तुति करी. "जरा मी हा घालून पाहूं?" ती म्हणे. इंद्राच्या कन्येला दागिन्यांचा काय तोटा? "घाल हो." बालुराणी म्हणायची. होतां करतां कोळिणीनें सारे दागिने बालुराणीचे घातले. आपले तिला घातले. मग "तुझा पितांबर दे जरा नेसायला," ती म्हणाली. बालुराणीनें पितांबर दिला आणि तिचें लुगडें आपण नेसली. मग ती वंझ्या कोळ्याची बायको बालुराणीला म्हणाली, "पलीकडे विहीर आहे. तिच्या कांठावर आपण बसूं. मी तुझे केस विंचरतें. तोंड तूं पाण्यांत पहा." बालुराणी विहिरीच्या कांठावर बसली आणि तिचे केस विंचरतां विंचरतां कोळिणीनें तिला विहिरींत ढकलून दिलें. बिचारी बालुराणी मर्त्यलोकांत आली. सारे देवांचे गुण गमावून बसली. तिला पोहतां येईना. ती बुडाली. पार तळाला गेली.

वंझ्या कोळ्याची बायको तळ्याच्या पारीं बालुराणीच्या जागेवर येऊन बसली. अर्जुन स्नान करून आला तर हें काय? बालुराणीला कुणी जादुटोणा केला? पृथ्वीवर आल्यावर तिचें रूप कसें पालटलें? आवाज कसा बदलला?

आणि ती वंझ्या कोळ्याची बायको त्याला म्हणाली, "पृथ्वीवरची हवा खराब. माझी काया पालटली. मी काय करूं?" आणि ती रडूं लागली.

अर्जुनानें तिचे डोळे पुसले आणि तिला घेऊन तो घरीं आला.

इकडे विहिरीवर एक ब्राह्मणाची मुलगी पाणी भरायला आली. इतक्यांत विहिरींत एक कमळाचें फूल होतें तें तरंगत तरंगत तिच्या घागरींत आलें. तिनें घागर वर ओढली आणि कमरेवर घेऊन ती घरीं आली. फूल बोलत होतें. भराभरा बोलत होतें. भटाची मुलगी घाबरली. तिनें घागरींतलें पाणी भडाभडा भाताच्या हंडींत होतलें. भात बोलूं लागला.

"मी देवांगना, बालुराणी, अर्जुनाची राणी—
वंझ्या कोळ्याच्या बायकोनें जलांत बुडविली"

तें ऐकून भटाची पोर मनांत भ्याली. तिनें भात ताटांत उपसला. देवापुढें ताट ठेवलें. त्या ताटाची पूजा केली. त्याबरोबर त्या भातांतल्या फुलांतून बालुराणी जशीच्या तशी जिवंत बाहेर निघाली. भटाच्या मुलीला मिठी मारून ती म्हणाली, "अग बाई, तूं माझी पाठची बहीण झालीस मला जीवदान दिलंस." आतां ती अर्जुन आपल्याला परत कसा मिळेल या काळजीनें बुडून गेली.

इकडे अर्जुनाच्या मागें लवकर लग्न लावूं म्हणून 'आव नाहीं, डाव नाहीं, कशाचा ढेणाचा ढेणा' अशा त्या वंझ्या कोळ्याच्या बायकोनें तगादा लावला. आंब्याच्या कोयींतून आणली काय आणि ही देवकन्या बेरूप झाली काय! या दुःखांत अर्जुन बुडाला. त्यानें भटाला बोलावून सांगितलें, "लग्न लावा." भटानें मुहूर्त काढून 'आदितवारच्या हळदी, सोमवारचीं लग्नं,' म्हणून सांगितलें. मुहूर्त ठरला..

बालुराणीला भटाच्या मुलीनें हें सांगितलें. तेव्हां बालुराणी म्हणाली.







अनुक्रमणिका

"लग्न लागूं दे. मग करतें गंमत." तिनें देशोदेशींच्या राजांना आमंत्रणें दिलीं. सारे जण आले. लग्न लागायच्या वेळीं लोक अर्जुनाची नवरी बघून हसायला लागले. भटानें बालुराणीची पत्रिका अर्जुनाला दिली. अर्जुनानें वाचली. काय होतें तिच्यांत? बालुराणीनें वेड्या कोळ्याच्या बायकोची सारी लबाडी लिहिली, पहिल्यापासून शेवटपर्यंत. अर्जुन आनंदित झाला आणि रागावला पण. 'कुठें—कुठें आहे माझी बालुराणी?"

"माझ्या घरीं." भट बोलला, "चला, तिथेंच लग्न लावतों." मग अर्जुनानें वेड्या कोळ्याच्या बायकोला घराबाहेर काढलें. नगरांतल्या आया-बाया तिला लाथा मारूं लागल्या. घरोघरच्या बायका तिला बोलूं लागल्या. सारें वऱ्हाड भटाच्या घरीं आलें. भटानें बालुराणीचें लग्न अर्जुनाशीं लावलें.

स्वर्गांतले देव बालुराणीला शोधीत होतेच. त्यांना पत्ता लागला. इंद्र-देवानें वरून पत्र पाठविलें. आशीर्वाद दिला. बालुराणीला आमंत्रण पाठविलें: "इथेंच तूं रहा. अर्जुनहि राहील." आणि मग इंद्राच्या विमानांत बसून अर्जुन, बालुराणी, भट आणि त्याची मुलगी इंद्रलोकीं गेलीं.

[ महारी लोककथांतून ]



पृथ्वीचें सूर्याशीं लग्न

आकाश वर कां व धरणी खालीं कां? या प्रश्नाचें उत्तर गोंडी लोककथांत द्रुग जिल्ह्यांत एके ठिकाणीं मला सांपडलें. ईश्वरानें सूर्य, चंद्र, धरणी आकाश हीं निर्माण केलीं. धरणी वयांत आली. वृक्षवनस्पतींनीं भरून गेली. जीवजंतूंना पोसण्यास समर्थ झाली असें पाहून ईश्वरानें तिचें लग्न आकाशाशीं करायचें ठरवलें. चंद्रसूर्य यांनाहि पोटांत ठेवणारें विशाल आकाश क्षितिजांनीं अगोदरच धरणीला मिळालें असें पाहून, पृथ्वीशीं याचाच विवाह होणें उचित असें ईश्वराला वाटलें. सर्व देवांना, पशुपक्ष्यांना त्यानें आमंत्रण दिलें. पण कोल्ह्याला मात्र दिलें नाहीं. कोल्ह्याला राग आला. त्यानें डोकें लढवलें. सूड घ्यायचें ठरवलें. हें लग्न होऊं द्यायचें नाहीं असें त्यानें ठरवलें. लग्नाचें वऱ्हाड जमलें. तिकडे कोल्हा गेला. लग्न लागतांना सात फेऱ्या करायला नवरानवरी उठलीं तों कोल्हा ओरडला, "देवाला वेड लागलं. घात झाला. हें लग्न मोडा रे मोडा!" कोल्ह्याला सर्वांनीं हांकून देण्यांचा प्रयत्न केला, पण तो ऐकेना. तो ओरडतच राहिला. शेवटीं ईश्वरानें कोल्ह्याला जवळ बोलावलें आणि विचारलें, "कां रे तूं असें म्हणतोस?" कोल्हा म्हणाला, "कां म्हणजे काय? खरं नाहीं का तुझें डोकें फिरलेलें? कसें तूं हें लग्न जुळवलेंस? देवा, सर्व जीवजंतूंना घात होऊं नये म्हणून तर मी हें बोलतों आहें. खरें सांग, देवा, हें लग्न झालें आणि आकाश आणि पृथ्वी यांचें मीलन झालें, तर सारे सारे जीवजंतू, झाडपाला चिरडून मरणार नाहींत का?" धूर्त कोल्ह्याच्या या प्रश्नानें ईश्वर गडबडला. "खरें आहे कोल्होबा तुझें म्हणणें. हें लग्न होणार नाहीं. पृथ्वीचें लग्न मी सूर्याबरोबर करतों." आणि त्याच बैठकींत पृथ्वीचें व तिच्या प्रियकराचें लग्न मोडलें. आकाश रडलें ओरडलें. त्या अश्रूंनीं धरणी आर्द्र झाली पण ईश्वरानें आतां या गोष्टींना महत्त्व दिलें नाहीं. दाहक व तळपणाऱ्या पराक्रमी सूर्याबरोबर पृथ्वीचें लग्न लागलें. परंतु आपल्या आवडत्या बायकोस त्रास होऊं नये म्हणून सूर्य सांजसकाळीं मीलनाच्या वेळीं अतिशय सुंदर व सौम्य रूप धारण करतो. वरि त्याची सांथ करतात. पृथ्वी पतीबरोबर संसार करते, त्याचा तापहि निमूटपणें सहन करते. पण अजूनहि पर्जन्य आकाशांतून पडलें कीं तिचें हृदय आनंदानें उचंबळतें. तिची काया प्रफुल्लित होते. अशी ही पावसाळ्याची रम्य करुण कहाणी, आदिवासींच्या उत्पत्तिकथांत गोंवली गेली आहे.

[ गोंड लोककथा ]



## सह्याद्रीवर मेघ उतरले

सह्याद्रिवर मेघ उतरले
ब्रह्मांडांतिल वलक घेऊनी
संसाराचें बीज रुजविण्या
अद्वैताचें द्वैत छेदुनी...

कासाविस झालेलं काळिज
स्वतः स्वतःशीं हळूच हसलें
अन् रक्ताची साथ घेऊनी
पुढेंच घुसण्या मणके जुळले...

गडगडण्यांतुन जाणिव आली
ओठांवरती सूक्तें कांहीं
वीज नव्यानें उजळुन जातां
सेवक नाहीं...मालक नाहीं...

घडावयाचें यांतुन कांहीं
ज्याची किंमत ताजी भाकर
पोटापुरती नको आणखी
अन्यायाला देउन ठोकर...

अन्यायाला ठोकर देतां
पुन्हा गावया भाकरगाणीं
अबोल अंकूरांत बोलकी
मातीची पण अमृतवाणी..

मातीची पण अमृतवाणी
धिःकारी ही जल्लोषानें
ऐदी ऐश्वर्याचीं नाणीं,
तिची प्रेरणा वारा जाणे;

तिची प्रेरणा विशाल माझी
तिचें लेकरूं अजिंक्य आहे
सह्याद्रीवर मेघ उतरले
पहिला हा तर शकून आहे,

—दत्ता कदम



उज्ज्वल भविष्य कीं विनाश
हा महाप्रश्न आज मानवापुढें आहे.
ही रणभूमि रक्तलांछित
कुरुक्षेत्र ठरणार कीं
धर्मक्षेत्र ?

# कुरुक्षेत्रावर घडलेली नवलकथा

दि. के. बेडेकर

राजा धृतराष्ट्र संजयाला म्हणाला, “हे संजय ! धर्मक्षेत्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या कुरुक्षेत्रावर एकमेकांना ठार मारण्याच्या इच्छेनें गोळा झालेले माझे पुत्र, पंडूचे पुत्र व कोट्यवधि सैनिक हे काय करते झाले तें मला सांग.”

संजय म्हणाला, “धर्मक्षेत्राच्या ठिकाणीं परस्परांचा वध करण्यासाठीं जमलेल्या त्या क्षत्रियांनीं आपापलीं सैन्यें मोठ्या अद्‌भुत व्यूहरचनेंत उभीं केलीं. दोन्ही बाजूंचे सैनिक युद्धभूमीवर सहजच चढणाऱ्या आवेशानें धुंद झाले होते व आपापलीं शस्त्रें सज्ज करीत होते. कर्ण, दुर्योधन, भीम, अर्जुन प्रभृति महारथी आपल्या शस्त्रांना सांवरीत प्रचंड संहार करूं शकणाऱ्या अस्त्रांचेंहि मनांत स्मरण करीत होते. कुरुक्षेत्राची भूमि घोड्यांच्या टापांनीं, हत्तींच्या पदघातांनीं व भीषण मानवसंहाराच्या समोर दिसणाऱ्या आपत्तीनें भयाकुल होऊन थरथरां कांपत होती. आकाशांत गिधाडें व घारी घिरट्या घालीत मोठ्या आशेनें व अधाशीपणानें युद्धाला प्रारंभ होण्याची वाट पहात होतीं.

अशा वेळीं दोन्ही सैन्यांच्या मध्यावर महारथी अर्जुनाचा रथ येऊन उभा राहिला. अर्जुनानें चौफेर नजर टाकून रणभूमीचें अवलोकन केलें. पांडवांच्या सैन्याकडे पाहून तो जयाच्या आशेनें उत्साहित झाला. कौरवसैन्याकडे तो पहात असतां त्याला आपले भीष्मद्रोणादि पूज्य गुरुजन दिसले व त्याची दृष्टि क्षणभर स्थिरावली. तो विचार करूं लागला कीं हा काय चमत्कार आहे ? ज्या भीष्मपितामहांनीं आम्हां कौरवपांडवांना लहानपणापासून पुत्रवत् मानलें, शस्त्रांचें शिक्षण दिलें व न्यायनीतीचा उपदेश केला तेच पितामह आज या रणांगणावर असत्याच्या व अन्यायाच्या पक्षानें युद्धास सज्ज आहेत ! यांची सत्यनिष्ठा कोठें लोप पावली ? यांच्यासारखे उदारधी व कर्तव्यनिष्ठ महापुरुष जर अन्यायाच्या बाजूनें शस्त्र धरणार आहेत तर मग ‘सत्य’, ‘न्याय’ यांचा अर्थ तरी काय ? मानवाची प्रगति जर सत्यानें व्हावयाची असेल तर आजचें हें दृश्य पाहून मला मानवाच्या भवितव्याची आशाच वाटत नाहीं. मानवहितासाठीं लढणें हें मी कर्तव्य मानूं शकेन, परंतु मला मानववंशाचें भवितव्यच नाशानें भरलेलें दिसूं लागलें आहे. हा दारुण निराशा माझ्या मनाला व्याकूळ करीत आहे.

इतकें बोलून अर्जुनानें आपलें धनुष्य खालीं ठेवलें व तो रथाखालीं उतरला. हें पाहतांच दोन्ही सैन्यांमध्यें मोठी खळबळ माजली. युद्धाला तोंड लागण्याच्या ऐन वेळीं अर्जुनासारखा महारथी गलितधैर्य होईल हें कोणाच्या स्वप्नींहि आलें नाहीं. पण मग अर्जुन रथाखालीं कां उतरला ? मोठेमोठे वृद्ध सेनानी व सामान्य पायदळांतील लोकहि या अपूर्व घटनेमुळें विस्मित झाले.

त्यांच्या मनांतील विस्मयाचा भाव ओळखून पार्थानें आपल्या घनगंभीर आवाजांत दोन्ही सैन्यांतील वीरांना उद्देशून म्हटलें—

‘वीरबंधूंनो ! माझें हृदय क्षत्रियाचें आहे व त्यांत कातरतेचा लवलेशहि उत्पन्न होणें शक्य नाहीं हें तुम्ही जाणतां. परंतु या भीषण संहाराचें भविष्य माझ्या हृदयाला व्याकुळ करीत आहे. ह्या युद्धामध्यें जय आमचा होईल किंवा कौरवांचा होईल. परंतु कोट्यवधि मातांचे पुत्र प्राणांना मुकतील, कोट्यवधि स्त्रिया अनाथ होतील व अजाण मुले पोरकीं होतील. एवढा हा नाश कशासाठीं ? जय मिळाला तरे आम्ही भूमीचे ईश्वर बनूं, पण ती भूमि कोट्यवधि वीरांच्या रक्तानें व स्त्रियांच्या अश्रूंनी भिजलेली असेल. ह्या युद्धांत शस्त्र टाकून मी परतलों तर भ्याड म्हणून माझी हेटाळणी होईल; परंतु या खोट्या निंदेला भिऊन मी या संहारांत भाग घेऊं काय ? माझें मानवी हृदय आज मोहाचें पटल दूर सारून जागें व डोळस झालें आहे. तुम्ही देखील वीर आहांत व वीरोचित मृत्यूलाहि न भिणारे आहांत. तुमच्या शक्तीचा व बुद्धीचा परस्परांच्या संहारासाठीं उपयोग करूं नका. येथून परत जा,

भूमातेची श्रमानें सेवा करा व मानवाला उचित, अशा तऱ्हेनें या भूचा स्वर्ग बनवा.

एवढें बोलून पार्थानें रथाच्या शेजारीं ठाण मांडलें व निर्भय आणि शांत वृत्तीनें तो स्तब्ध उभा राहिला.

त्याचें हें बोलणें ऐकून दोन्ही सैन्यांतील कोट्यवधि सैनिक मंत्रमुग्ध झाल्यासारखे झाले व त्यांच्याहि हृदयांत एक प्रचंड कोलाहल आणि व्याकुळता निर्माण झाली. धृतराष्ट्र ! तो प्रसंगच मोठा अपूर्व होता. युगानुयुगांचें मानवजातीचें दुःख अनुभवून त्या अनुभवामुळें ज्याचें हृदय अनुतापानें शुद्ध झालें आहे अशा नरश्रेष्ठ अर्जुनाचें तें सरळ भाषण प्रत्येकाच्या हृदयाला अंकित करणारें होतें. कुरुक्षेत्राचें खरोखरच पावन धर्मक्षेत्र बनलें, असा तो पुण्यक्षण होता असें मला तरी वाटलें. कदाचित् असें असेल कीं मी एक दासीपुत्र आहें म्हणून त्या नरश्रेष्ठाच्या भाषणांतील आर्तता व सद्भाव माझ्या हृदयाला जास्तच स्पर्श करूं शकला. परंतु युद्ध हाच ज्यांचा धर्म असें सांगितलें जातें ते क्षत्रियहि मानवच आहेत ना ? मातांचा शोक त्यांना का कळणार नाहीं ? विनाकारण होणारा संहार त्यांना का भीषण वाटणार नाहीं ? रणभूमीवर त्या वेळीं जी विलक्षण स्तब्धता पसरली त्यावरून मला वाटतें कीं अर्जुनाच्या हृदयाशीं कोट्यवधींचें हृदय एकरूप झालें.

त्या स्तब्धतेचा भंग करून अर्जुनाचें सारथ्य पत्करलेला श्रीकृष्ण बोलूं लागला. तो अर्जुनाला म्हणाला, 'वीरश्रेष्ठा ! तुझा विषाद हा मोठा विस्मयकारक आहे. कौरवांनीं दुष्ट बुद्धीमुळें वैर केलें आहे व आपल्या कृत्यामुळें त्यांनीं स्वतःचें मरण ओढवून घेतलें आहे. त्यांना मारणें हेंच पुण्यकारक आहे; कारण त्याशिवाय सत्यपालनाचा धर्म हा पृथ्वीवर स्थिर होणार नाहीं.'

यावर पार्थ म्हणाला, 'कृष्णा ! कौरव दुष्ट आहेत हें तूं मला सांगतोस ? आम्हींच वनवासाचा छळ भोगला ना ? परंतु, या दुष्टांच्या बाजूनें भीष्मपितामहांसारखे उदारधी उभे आहेत त्याचें काय ? 'सत्य,' 'अहिंसा' या महान् तत्त्वांचा उपदेश करणारे सज्जन देखील दुर्जनांच्या बाजूनें रणांत उभे राहतात हें दृश्य मला पाहवत नाहीं. हा युद्धाचा प्रसंगच मला अनर्थकारक दिसतो. कारण या प्रसंगामुळेंच माझ्या या गुरुजनांना सत्य व न्याय यांचें भान उरलेलें दिसत नाहीं.'

अर्जुनाच्या या भाषणानें श्रीकृष्ण थोडा वेळ स्तब्ध झाला. परंतु, थोड्या वेळानें तो म्हणाला, "अर्जुना ! तुझ्या मनामध्यें युद्धाच्या कर्तव्यासंबंधीं हा जो तिटकारा उत्पन्न झालेला आहे तो व्यर्थ आहे. मनुष्यानें त्याच्यासाठीं नियत असें जें कर्म असेल तें सदोष असलें तरी त्याज्य समजूं नये. कर्म हें अकुशल, म्हणजे स्वतःच्या व मानवजातीच्या हिताच्या आड येणारें, असलें तरी तें प्राप्त कर्तव्य म्हणून केलेंच पाहिजे. मनुष्याला जास्त अधिकार नाहीं. भीष्मद्रोणादिकांनीं कौरवांचा पक्ष पत्करण्यांत अकुशल व सदोष कर्म स्वीकारलें आहे. कारण तें नियत, शास्त्रविहित व त्यांच्यासाठीं प्राप्त कर्तव्य आहे. त्यांच्या या कृत्यामुळें विषाद उत्पन्न होण्याऐवजीं तूं त्यांच्या या कर्माचरणाचेंच अनुसरण कर.'

यानंतर अर्जुनाशीं श्रीकृष्णानें अध्यात्मज्ञानाविषयीं व योगविद्येच्या गुह्याविषयीं संवाद केला व त्याच्या मनावरील विषादाचें पटल दूर केलें. अर्जुनाच्या मनांत श्रीकृष्णाविषयीं जी भक्ति होती तिचा प्रभाव सफल झाला व तो युद्धाला प्रवृत्त झाला. पुन्हा रथावर चढून त्यानें आपल्या धनुष्याचा टणत्कार केला व त्या नादानें आकाश व धरणी कांपूं लागलीं.

धृतराष्ट्र ! आतां प्रचंड युद्धाला तोंड लागणार एवढ्यांत एक अद्भुत घटना घडली. तिचा वृत्तान्त ऐक.

पार्थधनुष्याच्या टणत्काराचा निनाद हवेंत विरून गेल्यावर जी भीषण शांतता रणभूमीवर अवतरली त्या शांततेचा भंग करणारा एक धीरगंभीर व स्निग्धमधुर आवाज उभय सैन्यांच्या मध्यभागांतून उठला व सर्वजण विस्मयचकित होऊन पाहतात तों भूमींतून एक दिव्य शरीराचा मानव उत्पन्न झालेला सर्वांना दिसला. त्याचें शिर आकाशाला भिडलें होतें, व त्याचे पाय भूमीवर स्थिर होते. त्याच्या अंगावर सुंदर वस्त्रें किंवा चिलखत नव्हतें, मस्तकावर मुगुट नव्हता. अग्निपुत्रासारखा अलंकाररहित व निसर्गाच्या आणि श्रमाच्या देणगीनें लाभलेल्या शरीरसौष्ठवानें नटलेला तो मानव त्या क्षत्रियांच्या समुदायांत बागेंतील फुलझाडांत शोभणाऱ्या महावृक्षाप्रमाणें शोभत होता.

अपार कारुण्य व प्रेम यांनीं भरलेली त्याची दृष्टि उभय सैन्यांवर पडतांच एका नव्या शांततेची व स्थिरतेची वृत्ति प्रत्येकाच्या हृदयांत अवतरली. तो मानव मग पार्थाकडे वळून म्हणाला, 'हे नरश्रेष्ठा ! मानव जातीच्या आजवरच्या रक्तलांछित इतिहासाची पुनरावृत्ति होणार कीं नवाच एक मार्ग मानवाला सांपडणार असा हा क्षण आहे. उज्ज्वल भविष्य कीं विनाश हा महाप्रश्न आज मानवापुढें आहे. ही रणभूमि रक्तलांछित कुरुक्षेत्र ठरणार कीं धर्मक्षेत्र ठरणार ? सत्याचा व प्रेमाचा जय होणार कीं सर्वनाशक पाशवी बलाचा जय होणार ?

मी आदिमानव आहें व भविष्यकालीन मानवजातीची आकांक्षा मीच आहें. वर्तमान काळांतील मानवहि मीच आहें. माझें विराट् स्वरूप व प्रेममय हृदय तूं जाण. तुझी, तुझ्या स्वजनांची, या रणभूमीवर उभ्या असलेल्या मानवांची आणि असंख्य गृहांतून युद्धभूमीकडे सभय डोळे लावून बसलेल्या स्त्रियांची व अजाण मुलांची जीवनाकांक्षा आपल्या हृदयाला कौल लावून तूं जाण. तुमच्या सर्वांच्या उद्धाराचा व अभ्युदयाचा मार्ग तुमच्याच हातीं आहे हें गुह्य मी तुला सांगतों, कारण तें गुह्य नाहीं. मोठ्यानें व निर्भयतेनें तें गर्जून सांग व या साऱ्या बांधवांना युद्धापासून परावृत्त कर.'

त्या अद्भुत आदिमानवाचें तें भाषण पार्थानें ऐकलें व साऱ्या रणक्षेत्रावरील वीरांनींहि ऐकलें. भीष्म, कर्ण, युधिष्ठिर, भीम, अश्वत्थामा, दुर्योधन प्रभृति सर्व महारथींनींहि तें ऐकलें. तें ऐकून अर्जुनाच्या हातांतील गांडीव धनुष्य पुन्हा खालीं झालें व सज्ज केलेलीं शस्त्रें सर्वांनीं खालीं केलीं.

तो आदिमानव मग श्रीकृष्णाकडे वळून म्हणाला, 'योगेश्वरा ! ब्रह्मविद्येचें व योगविद्येचें तूं सांगितलेलें राजगुह्य मीं ऐकलें. परंतु तें ऐकून मी विस्मित झालों नाहीं. तुझ्या विश्वरूपदर्शनांत जें संहाराचें चित्र तूं दाखविलेंस त्यामुळेंहि मी भयचकित झालों नाहीं. कारण मानवाच्या मनांतील प्रेमापुढें कोठलेंहि राजगुह्य मोठें नाहीं व संहाराच्या विश्वरूपापेक्षां सृजनाचें स्वरूप महत्तम आहे. या सृजनाचा स्वामी असलेला मानव मी आहें.'

त्या मानवाच्या या भाषणानें रणभूमीवरील कोट्यवधि वीरांच्या मनांत एक अपूर्व उत्साह निर्माण झाला व त्यांच्या तोंडांतून 'होय ! होय !' असा सहजोद्गार बाहेर पडला.

मग श्रीकृष्णाकडे वळून तो आदिमानव बोलता झाला, 'ईश्वरा, अर्जुनाला शस्त्र हातीं धरण्यास तूं प्रवृत्त केलेंस. निष्काम वृत्तीनें हा संहार करणेंच विश्वाच्या हितासाठीं आवश्यक असल्याचें त्याला तूं पटविलेंस. मग याच निष्काम बुद्धीनें तूं हातांत शस्त्र धर. मुक्त पुरुषानें अज्ञांना



अनुक्रमणिका

मार्ग दाखविण्यासाठीं कर्मत्याग करूं नये हें तत्त्व तूं अर्जुनाला सांगितलेंस ना? मग तूं त्या तत्त्वाचें पालन कर, नाहीं तर धर्म्य युद्धांतहि शस्त्र न धरण्याचें तत्त्व तूं आपल्या उदाहरणानें उपदेशिलेंस असें होईल.'

योवर श्रीकृष्ण कांहींच बोलले नाहींत. तेव्हां तो पुरुष म्हणाला, 'तूं स्तब्ध राहशील हें मला माहीत होतें; परंतु केवळ या असंख्य वीरांना तुझ्या उपदेशाचा अर्थ कळावा म्हणून मीं तुला शस्त्र ग्रहण करण्यास सांगितलें. तूं अकर्ता आहेस व मानवांच्या सुखदुःखांचा अर्थ तुला अगम्य आहे.'

नंतर तो रणभूमीवरील सर्व वीरांना उद्देशून म्हणाला, 'वीर हो! आजच्या या भीषण युद्धप्रसंगापासून मी तुम्हांला निवृत्त करीत आहें; एवढेंच नव्हे तर शाश्वत शांतीचा मार्गहि मी तुम्हांला सांगत आहें, तो ऐका. या युद्धाचें मूळ कारण भूमीचा अपहार आहे. सर्व भूमि ही मानवजातीची आहे. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं सारीं महाभूतेंहि मानवजातीचीं आहेत. यांचा अपहार राजांनीं केला, व राज्यें स्थापन केलीं. राज्याच्या लोभामुळें सुईच्या अग्रावर राहील एवढी भूमीहि पांडवांना देण्यास दुर्योधन तयार झाला नाहीं. या राज्यपदामुळें हिंस्र झालेल्या दुःशासनानें द्रौपदीची विटंबना केली.

तेव्हां सर्व पापांचें, हिंसेचें व युद्धाचें मूळ भूमीच्या अपहारांत आहे. हें मूळच नष्ट केलें पाहिजे. म्हणून या धर्मक्षेत्राच्या ठिकाणीं मी सर्व भूमीचा मानवजातीच्या ठिकाणीं यज्ञ करतों. यापुढें या यज्ञामुळें सर्व मानवांची झालेली ही भूमि कोणाची अशी राहणार नाहीं. ती सर्वांची धात्री राहील. भूमीचे स्वामी बनलेले राजे यापुढें राजे राहणार नाहींत. युद्धप्रसंगाचें आतां मूळच नाहींसें झाल्यामुळें कोणी क्षत्रिय उरणार नाहींत. युद्धांत प्राण गमावणें व द्यूतांत अब्रू गमावणें हा अधर्म यापुढें कोणालाहि आचरावा लागणार नाहीं. यापुढें कोठल्याहि राज्ञीला व सामान्य स्त्रीला बटीक होण्याचा प्रसंग येणार नाहीं; बटीक होऊन दासीपुत्रांना जन्म देऊन त्यांचें जीवन शरमिंदें बनविण्याची पाळी कोणाहि मातेवर येणार नाहीं.'

आदिमानवाच्या या गंभीर वाणीमुळें सर्व क्षत्रिय वीरांच्या आनंदाला भरतें आलें व त्यांनीं उत्साहाच्या भरांत आपापल्या रथांचे अश्व सोडून दिले; धनुष्यें काडकाड मोडून टाकलीं, खड्गें व चिलखतें एकत्र जमा करून त्यांचा एक प्रचंड ढीग रचला. या सार्‍या प्राणघातकी लोखंडांतून आम्ही आतां भूमातेच्या सेवेसाठीं अवजारें बनवूं असें ते एकमेकांना सांगूं लागले.

त्यांचा हा उत्साह पाहून भीष्मादि आचार्यांना, कर्णादि महारथ्यांना व त्या रणभूमीवरील सर्वांनाच मोठा आनंद झाला. तो आदिमानवहि प्रसन्न मुद्रेनें धर्मक्षेत्राचें रूप झालेल्या त्या रणभूमीकडे पहात होता. शेवटीं तो सर्वांना उद्देशून म्हणाला,

'वीरमानवांनो! आतां तुम्ही आपापल्या घरीं जा व आपल्या प्रियजनांना भेटून ह्या युगप्रवर्तक प्रसंगाचें वर्णन करा. त्यांच्या डोळ्यांत उभ्या राहणार्‍या आनंदाश्रूंकडे पाहून धन्य व्हा.

या धर्मक्षेत्राहून परतणार्‍या प्रत्येक जणाच्या मनांत यापुढें प्रेम नांदत राहील, सूडाची भावना नष्ट होईल, लोभाचाहि समूळ नाश होईल. आजवर पापाचरणें केल्यामुळें ज्यांच्या मनांत अजून या नव्या मानवधर्माचा उदय झालेला नाहीं असे अभागी जीव राहतील. हा दुःशासन

पहा! कसा क्रुद्ध नजरेनें पहात आहे. हा दुर्योधनहि उन्मत्तपणानें उभा आहे. यांना ह्या धर्माची दीक्षा देण्याचें कार्य अवघड आहे. पण कृतकर्माचें शासन त्यांना दिलें गेलें व त्यांच्या मनांत अनुताप उत्पन्न झाला म्हणजे तेहि मानव-धर्माचे अधिकारी होतील.

उदारधी परंतु सूतपुत्र म्हणून हिणवला गेलेला कर्ण, दारिद्र्यामुळें ज्यांचा तेजोभंग झाला होता असे हे द्रोणाचार्य, सौजन्य व प्रेम यांची मूर्ति असलेला हा सुदाम, त्यांची महति जाणणारे हे भीष्माचार्य, धर्माचरणाचा सतत विचार करणारा हा युधिष्ठिर या सर्वांनीं मिळून दुःशासनासारख्या अजाण व दुर्वृत्त पुरुषांना शासन करावें व त्यांना सुवृत्त करावें.

वीर हो! आज युगप्रवर्तन झालें आहे असें समजा. कारण नरश्रेष्ठ असा जो हा पार्थ त्याच्या मनांत उद्भवलेल्या महान् वैराग्यापासून, बांधवप्रेमापासून व युद्धद्वेषापासून आजच्या या या धर्मप्रसंगाचा प्रारंभ झाला आहे; सर्व भूमीचें, जलाचें, तेजाचें, वायूचें व आकाशाचें महादान मानवजातीला मिळण्याचा यज्ञ या प्रसंगीं मीं केला आहे आणि युद्धांत शस्त्रें खालीं ठेवून मानवधर्माच्या सेवेसाठीं आजवरच्या हिंसेचा, द्यूताचा व लोभाचा त्याग करण्यास तुम्ही क्षत्रिय आज उद्युक्त झालेले आहांत. आतां मानवाच्या अभ्युदयाचें युग सुरू झालें आहे व आजवरच्या रक्तलांछित लोभाचें कलियुग संपलें आहे. आज या कुरुक्षेत्राचेंच केवळ नव्हे तर साऱ्या पृथ्वीचेंच धर्मक्षेत्र झालें आहे. मीं सांगितलेला हा मानवधर्म अविनाशी व सर्वकल्याणकारक आहे."

इतकें बोलून तो आदिमानव गुप्त झाला व रणभूमीवरील वीर आपापल्या गृहीं आनंदानें परत गेले...

—इतकें सांगून संजय थांबला व धृतराष्ट्रानें त्याला आनंदानें आलिंगन दिलें. धृतराष्ट्र म्हणाला, "संजया! इतकी आनंदाची बातमी सांगितल्या-बद्दल मी तुझें काय प्रिय करूं? माझ्या अंधत्वाचा पूर्वीं कधीं झाला नव्हता इतका खेद मला आज होत आहे! हिंसेच्या व राज्यलोभाच्या युगाचा अंधार होता तेव्हां मला पाहण्यासारखें काय होतें? द्रौपदीची विटंबना होत असलेली तिच्या आर्त हांकेमुळें मला कळली त्या वेळीं माझें आंधळेपण हें एक मला वरदानच वाटलें. पण तो अंधार संपून आज नव्या युगाची प्रभात झालेली पहाण्यास माझें मन उत्सुक असून मला दृष्टि नाहीं हें केवढें माझें दुर्दैव! माझ्या पुत्रांच्या दुष्ट आच-रणाबद्दल त्यांना उचित शासन झालें तर मला दुःख वाटणार नाहीं, कारण शासनाचा वीरोचित स्वीकार करून अनुतापानें शुद्ध होण्याचा मार्ग त्यांना आज खुला झाला आहे. नाहीं तर त्यांच्या मरणाशिवाय व कोट्यवधि वीरांच्या मरणाशिवाय कोणता मार्ग उरला होता? असंख्य मातांचे व स्त्रियांचे शाप आम्हां क्षत्रियांना व सत्ताधाऱ्यांना भोगावे लागले असते. आणि आम्ही चिरंजीव झालों तरी ते आमच्या डोक्यावर व्रणासारखे बनून राहिले असते. पण आज माझें मन आनंदानें आकाशाएवढें व मानवी मनाएवढें मोठें झालें आहे. कारण संहार टळून नव्या जीवनाचा मार्ग माझ्या पुत्रांना व सर्व मनुपुत्रांना लाभला आहे."



तिची आणि माझी चार वर्षांपूर्वी पुण्यास ओळख झाली. ओळखीचें रूपांतर परिचयांत झालें. परिचय वाढून घसट झाली. आणि या घसटींतून एखादें लफडेंकुलंगडें सहज निर्माण झालें असतें. पण तिनें मला वेळींच थोपविलें. त्यानंतर तिला विसरुन जाण्याचा प्रयत्न मीं चालवला आणि तो जमला. शकुंतला—शकू तिचें नांव. तिला विसरण्याच्या चिंतेंत फक्त मी दुष्यंत ठरलों.

अवघ्या चार वर्षांच्या काळांत माणूस किती बदलूं शकतो! तेव्हां पुण्याच्या लॉ कॉलेजांतला मी एक साधासुधा, गरीब विद्यार्थी होतों. आज जळगांवसारख्या संपन्न शहरांतला मी एक नामांकित, प्रतिष्ठित वकील आहें. तेव्हांच्या कळकट कपड्यांची जागा आज गॅबर्डीनच्या सूटनें घेतली आहे. तेव्हांच्या बुरसट चेहऱ्यावर आज रिमलेस चष्मा विराजत आहे. दारिद्र्य आणि चिंता यांनीं कुरतडलेल्या मांसाची जागा आज खनिदेशी तुपापासून तयार झालेल्या चरबीनें माया वाढवून व्यापली आहे.

आमच्या खानदेशांत लाडालाडानें धोंडु, धुपडु, झिपरु, गरबड अशीं नांवें ठेवण्याची पद्धत आहे. असलें एखादें नांव ठेवलें म्हणजे मुलाचें आयुष्य वाढतें अशी आईबापांची समजूत असते. माझें नांव धोंडु झिपरु पाटील. पण हें नांव मीं सरकारदप्तरीं बदलून घेतलें. पूनाफर्ईलमधल्या माझ्या नव्या बंगल्याच्या माडीवर आज 'धनंजयराव जयवंतराव पाटील' बी. ए., एल्.एल्. बी. वकील' अशी सोन्याच्या शाईनें लिहिलेली पाटी झळकत आहे. तेव्हांचा लाजाळू स्वभाव आज फाड फाड फाड बोलणें लोकांवर वजन मारीत आहे आणि तेव्हांच्या मायाळू धबाडूनें आज काळीज गहाण ठेवून धंदा चालविला आहे.

चार वर्षांपूर्वी मीं पुणें सोडलें अन् माझ्या मनाच्या धूळपाटीवरलें शकूचें चित्र खोडलें. जी शकू आपण मिळवूं न शकूं तिची आठवण कशाला? जळगांवला येऊन मीं वकिलीची सनद काढली आणि 'कोर्टाची पायरी' चढलों. बापानें पुढें केलेल्या सरळ, साध्या, चार पुस्तकें शिकलेल्या नवरीचा हात मीं पकडला आणि बाळबोध संसाराला सुरुवात केली. लग्नाची आमंत्रण-पत्रिका शकुंतलेला पाठविण्यास मात्र मी विसरलों नाहीं. पण पत्रिका जशी गेली तशी आठ दिवसांनीं परत आली. 'पत्ता बदलला' असा शेरा तिच्यावर मारलेला होता.

लग्नानंतर दोन वर्षांनीं माझी बाळबोध बायको मला अकस्मात् सोडून गेली; पण एक मुलगा मागें ठेवून गेली. तेवढाच माझ्या मनाला विरंगुळा! वडीलहि त्याच वेतास आटोपले. संसाराचें दुसरें जोखड मानेवर लादून घेण्याच्या आप्तस्वकीयांच्या आग्रहाला न जुमानतां मीं धंद्यांत जास्त लक्ष घातलें. धंद्यांतल्या ववघवीत यशानें माझी नजर फाकत चालली.

पुण्याला समक्ष जाण्याचें कांहीं काम निघालेंच तर तें मी टाळीत असें; सहसा परस्पर भागवीत असें. पण हातांतली केस फार मोठी व तिच्याबाबत पुण्यांतलें काम फार महत्त्वाचें असल्यामुळें या खेपेस टाळाटाळ न करतां मीं पुण्यास जाण्याचें ठरविलें. आणि गाडींत बसलों. गाडी पुण्याच्या रोखानें धावूं लागली आणि शकूनें माझ्या मनांत धुमाकूळ

# बदलेला पत्ता!



ग. ल. ठोकळ

**तुम्ही जितके मूर्ख होतांत तितकेच आजहि अहांत. तुम्हीं जा म्हणून सांगितलं, मी जातें. तुमच्या संमतींत रात्र काढण्याची मला हौस नाहीं.**

घालायला सुरुवात केली. चार वर्षांचा पडदा झिरझिरा होत नाहींसा झाला आणि जुन्या आठवणी साकार होऊन माझ्या डोळ्यांसमोरून फिरूं लागल्या.

तो तिच्या भेटीचा पहिला प्रसंग. मी रहात होतों ती नारायण पेठेंतली टकल्यांची चाळ. माझ्या खोलीसमोरचा दोन खोल्यांचा ब्लॉक बऱ्याच दिवसांपासून रिकामा होता. एके दिवशीं अवचित सामानसुमान आलें आणि माझ्या शेजारच्या खोलींत राहाणारे सुरवेमामा माझ्या खिडकीशीं येऊन म्हणाले, "पाटीलकाका, समोरचा ब्लॉक भरला बरं का!"

सुरवेमामांचा चार वर्षांचा मुलगा मला 'पाटीलकाका' म्हणे. चाळींतले सारे बिऱ्हाडकरू मला याच नांवानें ओळखीत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं समोरच्या गॅलरींत तुळशीच्या कुण्डीजवळ हात जोडून उभी असलेली शकू मला दिसली. वायलचें पांढरें शुभ्र पातळ. पांढरेंच पोलकें. डोक्यावर पदर. खानदेशी गव्हासारखा तांबूस पिवळा रंग, त्यावर उगवत्या सूर्यानें फेंकलेल्या तांबूस, कोवळ्या किरणांची झळाळी. नाक तरतरीत, सरळ. जिवणी मोठी, पण देवळाच्या कमानीच्या महिरपीसारखी. कानांत भरघोस मोत्यांच्या कुड्या. हातांत सोन्याच्या दोन दोन बांगड्या. गळ्यांत सोन्याचा गोफ आणि हिरव्या पोतीची दूड.—मी बघतच राहिलों. किती शांत आणि पवित्र सौंदर्य! कोवळ्या वयांत गांभीर्य किती! तुळशीला पाणी घालतांना तिचा पदर मागें सरकला आणि काळ्या भोर, लकलकीत केसांच्या प्रशस्त अंबाड्यावर रुळणारा मोतीयाच्या पांढऱ्या, टपोर फुलांचा घवघवीत गजरा मला दिसला. पुन्हा एकवार तुळशीला नमस्कार करून पाठ वळवितांना तिची नजर माझ्याकडे वळली. एकच क्षण. त्या क्षणीं पाटीलकाकाचा कायाकल्प झाला. कुठला तरी पडदा सरसर करीत वर गेला व माझ्या मनाच्या मोकळ्या देव्हाऱ्यांत तिची स्थापना झाली. उजव्या हाताच्या बोटांनीं पदर माथ्यावर ओढून ती आंत निघून गेली.

कायद्यांतल्या पोटकलमाचा तपशील बाजूला ठेवून किती वेळ मी तिच्या खोलीच्या बंद दरवाज्याकडे पहात राहिलों. थोड्या वेळानें दरवाजा उघडला आणि आळोखे पिळोखे देत डोळे चोळीत एक व्यक्ति बाहेर आली. थवकट चेहऱ्यावरच्या नकट्या नाकाशीं येऊन भिडणारे फिस्कारलेले लांब केस, गालाचीं हाडें वर आलेलीं, तेलिया रंग, अंगांत पट्ट्यापट्ट्याचा रंगीबेरंगी स्वेटर आणि खालीं मेणचटलेला पायजमा या अवतारांतलें तें ध्यान पाहून मी मनाशीं म्हणालों, 'हें चित्र पहा आणि तें चित्र पहा.'

सुरवेमामा माझ्या खिडकीशीं येऊन बत्तिशी दाखवीत बोलले,

"पाटीलकाका, जोडा पण जोडा शोभतो!"

"नाहीं हो, तिच्या गळ्यांत मंगळसूत्र नाहीं दिसलं."

"एवढं निरखून बघितलं ना तुम्हीं? पाटीलकाका, संभाळा बरं का!"

तेवढ्यांत ती व्यक्ति आंत गेली आणि मामींनीं पुकारल्यानळें मामाहि लगबगीनें चालते झाले.

त्या दिवशीं कॉलेजला सुटी होती. वाचून अभ्यास करायचा असें आदल्या दिवशीं ठरविलें होतें. पण त्या दिवशीं माझा कांडीचा अभ्यास झाला नाहीं. ती पुन्हा कधीं तरी दिसेल या अपेक्षेनें मी समोरच्या गॅलरीवर नजर लावून होतों.

सुरवेमामांनाहि सुटी होती. माझ्या खिडकीवरून त्यांनीं उगीचच तीनचार येरझारा मारल्या. त्यांना आणखी शंका [illegible] नको म्हणून मीं खिडकी लावून घेतली.

संध्याकाळीं सुरवेमामा माझ्या खोलींत आले आणि बोलते झाले: दुपारच्या वेळीं मामी सहज म्हणून सतार ऐकायला गेल्या होत्या. तिच्या गळ्यांतील पोत हिरवीच असून तो तिचा चुलतभाऊ, त्याचं नांव अण्णू,

तो बेकार असून त्यांचा पुण्यांत खाणावळ काढण्याचा विचार आहे वगैरे माहिती मामांनीं मला ऐकवली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी आपल्या जागेवर बसून तयार होतों. ती बाहेर आली. कालच्याप्रमाणें तिची पूजा झाली. हात उंचावून नमस्कार करतांना तिचा पदर ढळला आणि पदराआडचा मोतीयाचा ताजा गजरा मला दिसला. परत वळतांना पदर सावरून तिनें माझ्याकडे पाहिलें. माझ्या काळजांत हूक भरली. दरवाजा लावून घेतांना ती किंचित् हसली असावी, असा मला भास झाला. मीं मनांत म्हटलें, 'काढा, तुम्ही खाणावळ काढा. मी तुमचा पहिला मेंबर.'

माझ्यासारख्या कॉलेजच्या विद्यार्थ्यानें ढुंकूनहि बघूं नये असा लायकीचा तो अण्णू. पण त्याची ओळख करून घेण्यासाठीं मी अधीर झालों. दिलखुलास पण उत्पाती व बडबड्या सुरवेमामांची मध्यस्थी कारणीं लावून मीं मोठ्या युक्तीनें अण्णूची ओळख करून घेतली. अण्णूची सोय झाली. अडल्यापडल्या वेळेला चहाच्या कपासाठीं तो माझ्याकडे येऊं लागला. त्याला अष्टौप्रहर लागणाऱ्या चारमिनार सिगारेटचें पाकीटहि मी टेबलावर ठेवूं लागलों. त्याचें वक्तव्य ऐकून मी दांत विचकून मान डोलवूं लागलों. एक दिवस तो म्हणाला, "पाटीलकाका, पुण्यांत एक ग्येस्ट हौस आहे अन् एक रेस्ट हौस आहे. आपण इस्से बी जादा गंमत करणार. आपण काढणार ग्येस्ट-रेस्ट हौस. म्हणजे ग्येस्टांना रेस्ट देणारें हौस."

एका गोष्टीचें मात्र मला राहूनराहून नवल वाटे. बोलतांना तो नेहमीं तिचा उल्लेख करी, पण दर वेळीं कांहीं तरी चूक करी. एका खेपेस तो तिला चुलतबहीण म्हणे तर दुसऱ्या खेपेस हटकून मावसबहीण म्हणे. एकदां तर त्यानें तिचा आतेबहीण म्हणून उल्लेख केला. मीं मनांत म्हटलें, 'बहीण पक्की विसराळू दिसते. बहीण सख्खी नाहीं एवढें निश्चित !'

अखेरीस तिच्या परिचयाचा योग आला. अण्णू लागेंकाजें मला एकदां तरी चहाला बोलावील, असा अंदाज मीं बांधलेला होताच. माझ्याकडचे बारा चहाचे कप ढोसल्यावर व चारमिनारचीं साडेचार पाकिटें (तमा मी हिशोबी आहें) फस्त केल्यावर अण्णूनें त्याच्याकडच्या चहाच्या पहिल्या कपाला माझी वर्णी लावली. त्या दिवशीं तिच्या हातचा चहा मी पहिल्यानें प्यालों आणि सारी रात्र माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं. ती हसत हसत गोड बोलत होती आणि बोलतांना तिचे पान खाऊन गुलाबी झालेले दांत ओठांच्या फटींतून चमकत होते. मोतीयाच्या सुगंधानें धुंद होऊन मी काय बोलत होतों तें माझें मलाच उमगत नव्हतें. अण्णू तिला 'शके' म्हणून हाक मारी तें मात्र मला कसेंसेंच वाटे.

त्यांच्या घरांतलें सामानसुमान चांगलें उंची होतें. लाकडी पलंग, त्याला मच्छरदाणी, आरशाचें कपाट, फोनो, एक टेबल, तीनचार खुर्च्या, बैठकीला गादीलोड, त्यावर पांढरे शुभ्र चादरअभ्रे, जाळीचा पानाचा डबा वगैरे. किती तरी सुखवस्तु जीवनाच्या जिनसांनीं खोली गच्च भरलेली होती. त्यांची परिस्थिति मला चांगली दिसली. बेळगांवकडे त्यांची शेतीहि बरीच असल्याचें तिनें मला सांगितलें. पुण्यांत खाणावळ घालण्याचा त्यांचा बेत मात्र मूर्त स्वरूपांत उतरण्यास अजून अवकाश होता.

त्या दिवशीं तिच्या घरांत टाकलेलें माझें पाऊल पुढें चांगलेंच रुळलें. माझ्याकडचें वर्तमानपत्र त्यांच्याकडे वाचावयास जाऊं लागलें. तें तसें जाईल या हिशोबानें मी नुकताच घेऊं लागलों होतों. अण्णूच्या खात्यावर माझा चहाचा व चारमिनारचा खर्च चालूच होता. फोनोची एखादी नवीन रेकॉर्ड खरीदली गेली तर ती ऐकायला त्यांच्या घरीं प्रथम मी हजर असें. कांदेपोहे, चिवडा, चकली असा एखादा खमंग जिन्नस तयार झाला म्हणजे अण्णू पाटीलकाकाच्या नांवानें हाका मारी. अर्थात् तिच्या सांगीवरून हें मी ओळखीत असें. तोंड पुशीत मी समोरून आल्याचें सुरवेमामांनीं पाहिलें म्हणजे ते खाकरत खोकरत माझ्या खिडकीशीं येत आणि टोमणे मारून व चिमटे घेऊन मला हैराण करीत. त्यांच्या धाकानें खिडकी बंद करून घेणें मात्र मीं केव्हांच सोडलें होतें.

त्या दोघांच्या सुखवस्तु जीवनक्रमावर टकल्यांच्या चाळींत हळूहळू टीका सुरू झाली. त्या दोघांचें दुपारीं झोपा काढणें, संध्याकाळीं फिरायला जाणें, रात्रीं सिनेमाला अगर नाटकाला जाऊन मध्यरात्रीनंतर परत येणें, दिवसभर पानाचे तोबरे भरणें व वेळींअवेळीं फोनोवर तबकड्या लावणें वगैरे प्रकार त्या चाळींतल्या बाळबोध विऱ्हाडकरूंना विशेष पसंत पडण्यासारखे नव्हते. दुपारच्या वेळीं सुरवेमामींच्या विऱ्हाडीं बायकांचा अड्डा बसला कीं, मला नेमकी तिच्यावरली खरपूस टीका ऐकायला मिळे. कॉलेज सकाळचें असल्यामुळें दुपारीं मी आपल्या खोलींतच असें. ती कुचाळकी ऐकून मी मनांतल्या मनांत जळफळें.

मला मित्र कुणी नव्हतेच. गांवाकडचे परिचित असे तीन चार विद्यार्थी होते. त्यांच्या हिशोबीं मी नर्मदेंतला निरगोळा होतों. त्यामुळें कुणी माझ्याकडे येत नसे आणि मी कुणाकडे जात नसें. ती समोर राहाण्यास आल्यानंतर मात्र कशी कोण जाणे, पण माझ्याकडे येणाऱ्यांची आवक वाढत चालली. बोलायचें माझ्याबरोबर, पण नजर समोरच्या गॅलरीवर ही त्यांची तऱ्हा पाहिली, कीं माझ्या पोटांत कळ उठे. पण करणार काय ?

माझ्याकडे येत जाऊं नका, असें स्पष्टपणें कुणाला सांगण्याइतकी माझी जीभ मख्ख नव्हती.

अण्णूच्या पुण्यांतला परिचित वर्ग हळूहळू वाढूं लागला आणि तिच्या बिऱ्हाडीं येणाऱ्यांचीहि आवक वाढत चालली. सुरुवातीला अण्णूनें शेजाऱ्यापाजाऱ्यांची जी भीडभाड ठेवली होती ती हळूहळू चेपत चेपत पुढें पार नाहींशी झाली. समोरच्या खोलींत पत्त्यांचे डाव आणि कॅरमचे सामने रोजच्या रोज झडूं लागले. अगोदरच अण्णू म्हणजे नंबर एकचा उडाणटप्पू. त्याचे कांहीं दोस्त तर त्याच्याहि सवाई होते. प्रथम माझ्या पोटांत नुसती कळ उठत होती, पण आतां माझी पोटदुखी चांगलीच वाढीस लागली. शकूचा स्वभाव मुळांतच मनमोकळा. संकोचानें वागणें तिला माहीत नव्हतं. अण्णूच्या मवाली दोस्तांबरोबर ती खुशाल बोलत बसे. तिच्या हालचालींवर खिडकीच्या फटींतून उभा पहारा करुन नजर ठेवणें ही माझी नित्याची बाब झाली. जीव मुठींत धरुन एकदां मी तिच्याशीं या बाबतींत बोलल्यें देखील. पण तिनें तें हसण्यावारी नेलें. चाळींतल्या साऱ्या बिऱ्हाडकरूंनीं जेव्हां जास्त च्यावच्याव करायला सुरुवात केली तेव्हां या प्रकाराला थोडा आळा बसला. त्यानंतर एके दिवशीं 'परवानगीशिवाय कोणी आंत येऊं नये' अशी पाटी तिनें आपल्या हातानें दरवाजावर लावली आणि माझा जीव भांड्यांत पडला.

एके दिवशीं माझें लक्ष सहज भिंतीवरल्या कॅलेंडरकडे गेलें. परीक्षा दोन महिन्यांवर येऊन ठेपली होती. गेले तीन महिने अभ्यासाच्या दृष्टीनें अगदीं फुकट गेले होते. कायद्यांची घोकंपट्टी करण्याऐवजीं मी 'शाकुंतल' अभ्यासीत होतों. पोटाला चिमटा घेऊन दरमहा माझी भरती करणाऱ्या वडिलांचे माझ्याविषयींच्या भावी अपेक्षेनें डबडबलेले डोळे मला दिसूं लागले. उशीरां कां होईना, पण मी शुद्धीवर आलों.

शकूचें सौंदर्य न्याहाळण्याची, तिच्याशीं दोन शब्द बोलण्याची आणि तिच्यासंबंधीं जास्त सलगीचे विचार करण्याची माझ्या डोळ्यांना, जिभेला व व मनाला इतकी सवय झाली होती कीं, या सर्व बाबी तोडून टाकण्यास माझा जीव धजेना. त्याच खोलींत, त्याच वातावरणांत राहून मन काबूंत ठेवणें शक्य नव्हतें. अखेरीस जिवाचा धडा करून मीं खोलीला कुलूप लावलें आणि डेक्कन जिमखान्यावरल्या माझ्या एका गांवमित्राच्या खोलींत जाऊन मुक्काम ठोकला. पहिले दोन दिवस जड गेले, पण पुढें अंगवळणीं पडलें. रात्रीचा दिवस आणि दिवसाची रात्र करून मी घनचक्कर अभ्यास करूं लागलों.

यथावकाश परीक्षा झाली. पेपर चांगले गेले. (तसा मी मूळचा हुशार) मध्यंतरींच्या काळांत मी टकल्यांच्या चाळीकडे फिरकलों नव्हतों आणि मुक्काम हलवितांना सुरवेमामांखेरीज कुणाचा निरोपहि घेतला नव्हता. परीक्षा संपल्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळींच मनाशीं एक ठाम विचार ठरवीत मीं दाढी घोटली आणि परीटघडीचे कपडे घालून नारायणपेठेकडे निघालों. जिन्यावरून चढतांना मीं प्रथम तिच्या खोलीकडे पाहिलें. दरवाजा बंद होता. ती पाटी होतीच. सुरवेमामा पोराला खेळवीत बसले होते. पाटीलकाकाला पाहून बापलेकांना आनंद झाला. मामींनीं चहाचें आधण ठेवलें. मामांनीं पेपरसंबंधीं चौकशी केली. फार दिवस तुंबलेल्या आमच्या गप्पा छप्पा जोरांत सुरू झाल्या. मधूनच माझें लक्ष त्या दरवाजाकडे जात असल्याचें पाहून मामा मिस्किलपणानें हसले व आंत मामींना ऐकूं न जाईल अशा बेतानें हलक्या आवाजांत बोलले,

"अण्णू कालच गांवाला गेला. घरांत एकटीच आहे. जा भेटायला."

चहा पिऊन झाल्यावर मी उठलों व जिन्याचा ठिय्या ओलांडून पलीकडे गेलों. माझी छाती धाडधाड उडत होती व जीभ आंतल्या आंत ओढत होती. पुढें जाऊन मीं दरवाजावर टिचकी मारली. दरवाजा उघडला माझ्यासमोर जीवघेणी शकू उभी होती. भुंवया उंचावून ती म्हणाली,

"कोण? पाटीलकाका! आज उम्बराचं फूल फुललं. या ना."

मी आंत गेलों आणि एका खुर्चीवर बसलों. तिनें दार लोटून घेतलें. माहीत नसल्याचा आव आणून मीं विचारलें,

"अण्णू नाहीं दिसत?"

"तो कालच गांवाकडे गेला. जमीन खंडानें दिलेली. समक्ष गेल्याशिवाय वसुली होत नाहीं."

"जायला पाहिजे." मी विमनस्कपणें बोललों.

"तुम्हीं कुठं बुडी मारली होती?"

"एका मित्राच्या खोलीवर होतों."

"कां?"

"अभ्यास करायला. कालच परीक्षा संपली."

"इथं अभ्यास होत नव्हता?" तिनें खोचकपणें विचारलें.

"ऊंहूं."

"म्हणजे? आम्ही आड येत होतों वाटतं?"

एवढा वेळपर्यंत माझाहि धीर चेपला होता. ती उघडपणानें विचारते तर मीं कां लपवालपवी करावी?

अनायासें विषयाला तोंड फुटलें आहे. हा मोका उगीच कां घालवावा!

"होय, तुमच्यामुळं माझा अभ्यास होत नव्हता. स्पष्ट बोललों. रागवूं नका. मला तुमचं वेड लागलं होतं."

"मग आतां गेलं ना ?" ती हसत म्हणाली.

"नाहीं. उलट जास्त वाढलं."

"तुमच्या बोलण्याची मला बाई गंमत वाटते."

"यांत गंमत वाटण्यासारखं कांहीं नाहीं. एका महत्त्वाच्या बाबतींत मला तुमच्याशीं आज बोलायचं आहे."

"बोला." चेहऱ्यावर उसना गंभीरपणा आणून ती बोलली.

"माझे पेपर चांगले गेलेत. ही परीक्षा मी नक्कीच पास होईन. निकाल जाहीर झाल्यावर सनद काढून मी जळगांवला वकिली सुरू करणार. माझी घरची परिस्थिति विशेष चांगली नाहीं. पण वकिली करून मी पुरेसा पैसा कमवीन अशी मला उमेद वाटते. आमच्या भागांतले अनेक मुलींचे बाप माझ्यावर डोळा ठेवून आहेत. पण मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. माझा जीव इथें अडकला आहे. तुम्ही माझ्याशीं लग्न करालं ?"

"काय म्हणाचंत ? लग्न ?"

"हो."

"माझ्याशीं ?"

"हो. माझं तुमच्यावर प्रेम जडलं आहे."

शकुंतला एकदम गंभीर झाली. माथ्यावरून ढळलेला पदर सावरण्याच्या भानगडींत न पडतां अंबाड्यावरला गजरा डाव्या हातानें चाचपीत, खालीं पहात ती म्हणाली, "तुमच्यासारख्या उमद्या तरुणानं मला लग्नाची मागणी घालावी अन् मला नाहीं म्हणण्याचा प्रसंग यावा ! पाटीलकाका, मी एक दुर्दैवी स्त्री आहें. माझा नाद सोडून द्या."

"तें शक्य नाहीं," मी आवेशानें म्हणालों.



"पण मला लग्न करणं शक्य नाहीं."

"कारण ?"

"कारण मला सांगतां येत नाहीं. तुमच्या भागाकडली एखादी मुलगी पसंत करून तुम्ही तिच्याशीं लग्न करा अन् सुखी व्हा."

"पण—"

"मला तुमचा पण सांगूं नका. हा विषय आपण बंद करूं.—मी चहा करतें."

"नको. मीं आत्तांच घेतला."

"मग पुन्हा घ्या."

"नको. मी जातों."

असें म्हणून मी झटक्यानें बाहेर पडलों. त्याच दिवशीं मीं पुणें सोडलें.

—सोडलें कुठलें ! आलेंच कीं पुणें. गाडी थांबली. मीं खालीं उतरलों. हमालानें सामान बाहेर काढलें व तें डोक्यावर घेऊन तो पुढें चालूं लागला. त्याच्या मागोमाग मी स्टेशनच्या बाहेर आलों. समोरच्या स्टँडवर भाड्याच्या टॅक्सी उभ्या होत्या. मीं हात वर करून खूण करतांच एक मोटार सुळ्ळ करीत माझ्यापुढें येऊन थांबली. हमालानें सामान आंत ठेवलें. त्याला पैसे देऊन मी मोटारींत बसलों.

"साहेब, कुठं जायचं ?"

"हॉटेलांत."

"कोणच्या ?"

"चल—कुठल्याहि हॉटेलांत."

मोटार हळुहळू पुढें निघाली. ड्रायव्हर मोठा इरसाल आणि माहीतगार दिसला. आडवळणानें सुरुवात करून त्यानें मुद्द्याच्या विषयाला हात घातला. पुण्यास येणाऱ्या एकट्यादुकट्या पैसेवाल्या मुशाफिराची उत्तम सोय करणें म्हणजे त्याच्या हातचा मळ होता. कोणत्याहि जातीची तरुण बाई त्याच्या हाताशीं होती. मुशाफिरानें फक्त चुटकी वाजविण्याचा अवकाश. सुरुवातीला त्याच्या बडबडीकडे माझें फारसें लक्ष नव्हतें. पण त्यानें जेव्हां "तुम्हांला कोणत्या जातीची चालेल?" असा सरळ सवाल टाकला तेव्हां मी एकदम गडबडून गेलों. गेलीं दोन वर्षें मीं विधुरावस्थेंत काढलीं होतीं. मी काम करून पैसा मिळविणारें एक यंत्र बनलों होतों. जळगांवच्या अतिपरिचित, कुबट वातावरणांत निसर्गाला थोपवून धरणें मला फारसें जड गेलें नव्हतें. परक्या गांवीं माणसाला जास्त स्वातंत्र्य वाटतें. नवीन वातावरणांत मनाला एक प्रकारची तरलता येते. इतक्या सहजासहजीं जर एखाद्या तरुण व सुंदर स्त्रीचा सहवास मिळत असला तर—तर तो कां नको ?

एवढ्यांत कँपमधल्या एका हॉटेलपुढें मोटार थांबली. मीं विचारलें,

"काय रे, तुझं नांव काय ?"

"तुकाराम."

"तुझा धंदा कोणता ?"

"मोटारीच्या भाड्याचा."

"अन् तो ?"

"तो जोडधंदा." निर्लज्जपणें हसून तुकाराम पुढें म्हणाला, "तुम्ही एकदां तुकारामाच्या हातचा मासला तर बघा."

कांहीं न बोलतां मी मोटारींतून खालीं उतरलों. तुकारामाच्या सवालाला सरळ जबाब देण्याचें मीं अजूनपर्यंत टाळलें होतें. होकारार्थी उत्तर देण्याइतपत माझ्या मनाचा कल झुकला होता. माझ्या चेहऱ्याकडे निरखून पहाणाऱ्या तुकारामानें गिऱ्हाईक नवथर आहे हें हेरलें आणि मोठ्या हुशारीनें मला

घेरलें. हॉटेलमधल्या नोकरानें माझें सामान आंत नेल्यांवर मीं खिशांतलें पाकीट काढलें. मला थोपवीत तुकाराम म्हणाला,

"राहूं द्या, साहेब, पैसे तुटं जातात! मी गाडी घेऊन रात्रीं आठ वाजतां येतों. तुम्ही तयार रहा."

आंघोळ व जेवण करून मी हँडरायटिंग-एक्सपर्ट ऑफिसमध्यें गेलों. माझ्या हातांतली केस या एक्सपर्टच्या निर्णयावर अवलंबून होती. माझें या आफिसमधलें काम समाधानकारक रीत्या संपलें व मी हॉटेलमध्यें परत आलों. पलंगावर अंग लेटून मी स्वस्थ पडून राहिलों.

चला, पुण्यांतलें काम तर संपलें. आज रात्रीच्या गाडीनें परत फिरायला हरकत नाहीं. पण तो तुकाराम येणार आहे ना? तशी त्या गोष्टीची विशेष गरज आहे, असें नाहीं. पण बघूं या तर खरी! मुक्काम केला म्हणून बिघडत तर कांहीं नाहीं. टकल्यांच्या चाळींत एकदा जावें कीं नको? ती— ती तिथं नाहींच. सुरवेमामा भेटतील. पण नको. त्या जागेंत जाणेंच नको. जुन्या आठवणींना दिला एवढा उजळा पुरे!

बरोबर आठ वाजतां तुकारामच्या मोटारीचा हॉर्न वाजला. जेवण करून मी तयार होतों. बाहेर येऊन मी मोटारींत बसलों. मोटार बुधवार पेठेच्या रोखानें निघाली. तुकाराम गुळुगुळु बोलूं लागला. माझीं कानशिलें तापूं लागलीं. मोटार बुधवार चौकांत थांबली. कोपऱ्यावर दिव्याच्या उजेडांत एक तरुण बाई उभी होती. तिच्या हातांत मोतीयाचे गजरे होते. ती बाई जवळ आली व म्हणाली, "शेट, मोतीयाचा गजरा घ्या ना. तुम्हांला काय वाटेल ती किंमत द्या."



ती बाई गोरटेली, नाकींडोळीं नीटस आणि बांधेसूद होती. तिचे कपडे नीटनेटके आणि आवाज मंजुळ होता. तिनें पुढें धरलेल्या मोतीयाच्या झुबक्यांच्या सुगंधानें सारी मोटार दरवळून निघाली. माझ्या अंतःकरणांत कुठें तरी दवळून निघालें. खिशांत हात घालून मीं एक रुपया काढला आणि तो तिच्या हातांत ठेवला. तिनें एक गजरा माझ्या हातांत दिला. जाणूनबुजून झालेला तो स्पर्श मला उत्तेजक वाटला. तुकाराम बोलला,

"भागे, शेट फार बडे आहेत हं. सलाम कर."

"निसता सलाम?" भागीनें हसत हसत विचारलें.

"हां, निसता सलाम."

तुकाराम गुदमरल्यागत म्हणाला. भागी मागें सरकली आणि मला वाकून मुजरा करून तिनें पाठ वळवली. मोटार पुढें निघाली.

"साहेब, गजरा कसा काय? मस्त आहे का?"

"होय, छान आहे."

"अहो, ही या बायकांची निशाणी."

तुकारामाच्या या उद्गारानें मोतीयाच्या गुच्छांनीं माझ्या डोक्यांत चढलेली धुंदी एकदम उतरली. ही या बायकांची निशाणी म्हणजे काय? अरेच्या!

लकडी पूल भरवेगानें ओलांडून डाव्या हाताला वळलेली मोटार डेक्कन जिमखान्यावरल्या नवीन वसाहतीजवळ थांबली. रस्त्याच्या बाजूला गाडी उभी करून तुकाराम खालीं उतरला. "साहेब, आलों हं!" असें म्हणून तो चटकन् अंधारांत दिसेनासा झाला. सहजगत्या नाकाशीं नेलेल्या मोतीयाच्या उग्र सुगंधानें माझें नाक कोंदल्यागत झालें.

सुमारें अर्ध्या तासानें तुकाराम परत आला. त्याच्या बरोबर एक इसम होता, त्यांच्या मागून, थोडें अंतर ठेवून एक बाई हळुहळू चालत येत होती. ते दोघे मोटारीजवळ आले. तुकाराम मला म्हणाला,

"साहेब, हा आला तुमचा माल. बघून घ्या."

ती बाई दूर अंधारांत उभी होती. मला बघून पारखून घेण्याची शक्यता नव्हती. तुकाराम आपल्या जागेवर येऊन बसला व बोलला,

"या इसमाला पन्नास रुपये द्या म्हणजे झालं. आख्खी रात मजा करा."

खिशांत हात घालून मीं पांच नोटा बाहेर काढल्या व त्या इसमाच्या हातांत दिल्या. सलाम करून तो मागें सरकला व ती बाई जवळ आली. दरवाजा उघडून ती आंत आली व मला खेटून बसली. मोटार चालू झाली. तिनें वळण घेतलें. त्या धक्क्यानें ती बाई माझ्या अंगावर कलंडली. तरुण, उत्तेजित स्त्रीचा गोड, गार व सुगंधी स्पर्श मला कपड्यांमधून जाणवला. अफगाण स्नो, ए डी कोलन् व मोतीयाचीं ताजीं फुलें यांचा संमिश्र सुगंध माझ्या नाकांतून आंत शिरून टाळूला जाऊन भिडला. तिच्या केसांवर मोतीयाचा गजरा होता.

डोळे ताणून मी त्या स्त्रीचें तोंड निरखूं लागलों. पण रस्त्यावरल्या दिव्यांच्या अंधुक तिरिपेंत मला तें स्पष्ट दिसेना. इतक्यांत समोरून एक मोटार आली. दिव्यांचा झगझगीत प्रकाश एक क्षण तिच्या तोंडावर टाकून मोटार निघून गेली. विजेचा जबरदस्त धक्का बसल्याप्रमाणें मी सुन्न झालों. ती शकू होती.

मोटार पुढें पुढें जात होती. मी काष्ठवत् बसून होतों. तिलाहि तें चमत्कारिक वाटलें असावें. माझ्या खांद्यावर गाल घाशीत ती म्हणाली,

"साहेब, बोलत कां नाहीं?"

हिच्याशीं काय बोलूं कपाळ? म्हणजे मीं नोटा दिल्या तो इसम अण्णूच

श्री गुरुदेव दत्त



गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥

असावा काय? अण्णूच होता तो. असा प्रकार आहे तर! आणि आतांच नव्हे तर तेव्हांहि. अगदीं सुरुवातीपासून माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. किती बावळट मी! केवळ गाढव!

"साहेब, बोला ना. रागावलांत?"

ती पुन्हा आर्जवानें म्हणाली. मीं तिला ओळखलें, पण तिनें मला ओळखलें नव्हतें. मीं डोक्यावरली फेल्ट हॅट काढली व नाकावरला रिमलेस काढून खिशांत ठेवला. आवाजांतला करडेपणा कमी करण्याची कोशीस करून मीं तिला विचारलें,

"तुझं नांव काय?"

"तुम्हांला काय करायचं माझ्या नांवाशीं?"

"अगोदर नांव सांग."

"शीला."

"खोटं सांगतेस. तुझं नांव शकुंतला."

"बरं, शकुंतला."

"तुझ्याबरोबर आला होता तो इसम अण्णूच ना?"

"होय, अण्णू."

"तो तुझा कोण? आतेभाऊ का मावसभाऊ का चुलतभाऊ?"

"सख्खा भाऊ." ती टसक्यानें म्हणाली.

"पुन्हा खोटं सांगतेस. खरं सांग."

इतक्यांत समोरून एक मोटार आली व माझा चेहरा उजळवून निघून गेली. शकूच्या तोंडून एक चीत्कार बाहेर पडला—

"तुम्ही—पाटीलकाका? टकल्यांच्या चाळींतले?"

"होय."

"किती बदल झाला तुमच्यांत! जळगांवहून कधीं आलां?"

"त्याच्याशीं तुला काय करायचं? मी विचारतों त्याचं आधीं उत्तर दे." माझ्यांतला वकील जागा झाला.

"तो अण्णू तुझा खराखुरा कोण?"

माझ्या आवाजांतल्या तिखटपणाची प्रथमच जाणीव होऊन ती बाजूला सरकून बसली व चढ्या आवाजांत निर्धारानें म्हणाली,

"ऐका. खरं सांगतें. अण्णू माझा भाऊ नव्हे कीं जातीचाहि नव्हे. तो माझा ठेवलेला आहे."

"म्हणजे त्यानें तुला ठेवली?"

"नाहीं. मीं त्याला ठेवला. आमच्यासारख्या बायांना असा एखादा आधार पाहिजे असतो."

"अस्सं! टकल्यांची चाळ कधीं सोडली?"

"त्याच्याशीं तुम्हांला काय करायचं आहे? आम्हांला बिऱ्हाडाची जागा वरचेवर बदलावी लागते."

गाडी थांबली. कशी थांबली, कधीं थांबली तें मला कळलेंहि नाहीं. थांबली मात्र हॉटेलसमोर. तुकाराम खालीं उतरला आणि त्यानें दरवाजा उघडला. मी झटक्यांत खालीं उतरलों, ती तशीच आंत बसून राहिली. माझ्या डोक्यांत विलक्षण गोंधळ चालला होता. गळ्यांतल्या टायची उजव्या हातानें चोळामोळा करीत मी मारकुट्या बैलासारखा ठिस ठिस करीत पवित्र्यांत उभा होतों. शकू गाडींतल्या गालांत हसत शांतपणें बसली होती. तुकाराम गंभीरपणें दरवाजा हातांत धरून तसाच उभा होता. आंतल्या बोलाचालीकडे अर्थातच त्यानें कान दिले असावेत. मी त्याच्या अंगावर खेकसलों,

"तुकाराम!"

"जी."

"बाईना त्यांच्या घरीं नेऊन सोड."

"जी."

तुकारामानें खाड्दिशीं दरवाजा लावला व तो आपल्या जागेवर जाऊन बसला. खिशांतून दहाची एक नोट काढून मीं ती पुढें केली. ती घेऊन व मला सलाम केल्यासारखें करून त्यानें सेल्फस्टार्टर ओढला.

"तुक्या!" शकू ओरडली.

"जी."

"थांब."

"जी."

असें म्हणून तुकारामनें स्विच बंद केला. बाहेर तोंड काढून शकू मला म्हणाली—

"पाटीलकाका, चार वर्षं वकिली करून साहेबी सूट अंगावर चढवला म्हणजे कांहीं शहाणपणा येत नाहीं. तेव्हां तुम्ही जितके मूर्ख होतांत तितकेच आजहि आहांत. तुम्हीं जा म्हणून सांगितलं, मी जातें. तुमच्या संगतींत रात्र काढण्याची मला हौस नाहीं. पण तुम्हीं पैसे मोजले. मी तें घेऊन बसलें. त्याचा बदला घ्यायला माझी तयारी आहे. तुमची फार दिवसांची खुमखुमी राहिली आहे. भागवून टाका. ही संधी पुन्हा येणार नाहीं पस्तावाल."

शकूनें एक मिनिटभर वाट पाहिली आणि तोंड आंत वळवून ती खेकसली.

"तुक्या!"

"जी."

"चलो."

इंजिननें आवाज दिला. मोटार सरकन् माझ्या समोरून निघून गेली. दोघांच्या हसण्याचा खदखदाट दुरून येऊन माझ्या कानांत घुसला. एक उसासा टाकून मी मागें वळलों. जमिनीवर काय दिसतें म्हणून मीं रोखून पाहिलें. माझ्या हातांतून गळून पडलेला मोतीयाचा गजरा होता तो.



जनता डोळे असून पहात नाहीं असें नुसतें ऐटीनें सांगण्यापेक्षां जनतेला ते डोळे देण्याचें महत्त्वाचें कार्य आम्ही केलें पाहिजे.

# उद्यांच्या संस्कृतीचीं ज्ञानमंदिरें

चिं. ग. कर्वे

जपानमध्यें निक्को येथील शोगुन तोकुगावा याच्या समाधिगृहांत तबेल्याच्या आडवटावर एक तीन माकडांची चौकट आहे. एक माकड कानांवर हात ठेवतें आहे, दुसरें तोंडावर, तर तिसरें डोळ्यांवर हात ठेवतें आहे, असें सुंदर लाक्षणिक चित्र काढलेलें दिसतें. 'वाईट ऐकावयाचें नाहीं, वाईट बोलावयाचें नाहीं व वाईट पाहावयाचें नाहीं,' हा उपदेश हीं माकडें आपणाला करीत आहेत. या चित्रांच्या लाकडी किंवा हस्तिदंती प्रतिकृती आपणांस कित्येक पदार्थसंग्रहालयांत पाहावयास मिळतात. आपण एखादें म्युझियम किंवा वस्तुप्रदर्शन पाहतांना याच उपदेशाप्रमाणें चालतों ना? फार चांगलें, फार चांगलें म्हणत या दालनांतून त्या दालनांत धावत असतों ना? आपण काय पाहातों, काय समजून घेतों, मुलाबाळांना काय सांगतों? तर कांहीं नाहीं, असेंच म्हणावें लागेल. सुशिक्षितांची ही अवस्था तर हजारों किसान-मजूर बायका आणि पुरुष प्रदर्शनापासून काय अधिक ज्ञान मिळवीत असतील बरें! मोहेंजोदारो किंवा तक्षशिला येथील उत्खननांतून बाहेर काढलेल्या मातीच्या वस्तू—मडकीं, बाहुल्या, मणी इ.—किंवा पाषाण-युगांतील दगडी हत्यारें, किंवा गांधार शिल्पाच्या बौद्ध मूर्ती, किंवा कांग्रा कलमाचीं रंगीत चित्रें, किंवा बुट्टीदार तलम वस्त्रें, यांसारख्या गोष्टींपासून त्यांना काय बोध होत असेल? पशुपक्षी पाहून कांहीं करमणूक होईल खरें. फुकट पाहावयास म्हणून झुंडीच्या झुंडी अशा प्रदर्शनांना लोटतात.

आपल्याच लोकांना हसावयास नको; सुधारलेल्या पाश्चात्य देशांतून परवांपर्यंत सामान्य लोकांविषयीं हेंच म्हणतां येत असे. नाटक पाहाण्याचें जसें, तसें प्रदर्शन पाहाण्याचें एक शास्त्र आहे. प्रदर्शन पाहाण्यांत घालविलेल्या वेळेचा सदुपयोग करावयाचा असेल तर आपल्या बुद्धीची तशी तयारी असली पाहिजे; नाहीं तर तेथें फार वेळ काढणें अगदीं कंटाळवाणें होतें. प्रवाशांना हा अनुभव नवीन नाहीं. प्रेक्षकाचें व्यापक ज्ञान, कलेविषयीं विशेष आवड व ज्ञानग्रहण करण्याची पात्रता यांवर उपयुक्ततेची व्याप्ति साहजिक अवलंबून असणार. मानवी संस्कृतीचा अति-दीर्घकालाचा इतिहास त्याच्या डोळ्यांपुढून सरकत असतो. आपल्या पूर्वजांचें जीवन तो पाहात असतो; त्यांच्या कर्तृत्वाचीं प्रतीकें त्याच्या समोर मांडलेलीं असतात. असुरी, मिसरी, ग्रीक, रोमन, भारतीय आर्य, चिनी मोगल, आजहि अगदीं रानटी अवस्थेंत असलेले लोकसमाज, त्यांचीं हत्यारेंपात्यारें, कपडेलत्ते, दागदागिने, भांडींकुंडीं, घरेंदारें, भाषा आणि लेखन यांविषयीं प्रत्यक्ष माहिती त्याला या संग्रहालयांत मिळवितां येते. विश्वाचा सर्वांगीण विकास कसा होत गेला याचें थोड्या वेळांत, थोड्या जागेंत तो आश्चर्यानें मुग्ध होऊन अवलोकन करीत असतो.

अशा तऱ्हेनें उभारलेल्या ज्ञानमंदिराची कल्पना दिसते तशी अर्वाचीन नाहीं. वैदिक काळांत यज्ञसत्रांच्या अनुषंगानें निरनिराळीं कला-कौशल्यें दाखविणाऱ्या जत्रा भरत. अशा जत्रा आजहि कित्येक ठिकाणीं दिसतात. पाश्चात्य संज्ञा 'म्युझियम' हिचा अर्थच कलादेवतांचें मंदिर असा आहे. ग्रीक देवाधिदेव झ्यूस (संस्कृत द्यौस्) याला नऊ कन्यका असून त्या विशिष्ट कलांच्या अधिष्ठात्री देवता (म्यूझेस) मानल्या जात. उदा.—इतिहास, भावगीत, गोपगीत, शोकगीतें, नृत्य-संगीत, शृंगारगीत, स्तोत्रें, ज्योतिर्विद्या व महाकाव्य. आपल्याकडील नवग्रहांप्रमाणें यांच्या प्रतिमा ब्रिटिश म्युझियममध्यें पाहावयास मिळतात. खि. पू. २८३ च्या सुमारास अलेक्झांड्रिया येथें एक कलासंग्रहालय होतें व त्याहिपूर्वी बाबिलोन येथील उत्खननांत अशा दर्शनीय वस्तू आढळल्या आहेत. पण यानंतर अशीं संग्रहालयें ऐकिवांत नाहींत. देवमंदिरें व मठ यांतून कांहीं अपूर्व वस्तू जपून ठेवलेल्या असत. पण १७५३ त ब्रिटिश म्युझियम निघेपर्यंत पद्धतशीर प्रदर्शनाचा प्रयत्न झालेला दिसत नाहीं. या जग-प्रसिद्ध पदार्थसंग्रहालयाची वाढ कशी होत गेली हा इतिहास मनोरंजक असला तरी येथें देणें अप्रस्तुत होईल. याला जोडून जें ग्रंथालय आणि वाचनालय आहे तेंच विशेष नांवाजलेलें व उपयुक्त आहे. पॅरिसमधील लूव्र म्युझियम कलेच्या दृष्टीनें जगांत पहिलें म्हणतां येईल. सोळाव्या शतकांत एका जुन्या राजप्रासादांत याची मांडणी झाली असून हौशी व कलाप्रेमी फ्रेंच बादशहांनीं याला समृद्ध केलें. नेपोलियननें आपल्या मोहिमांवरून आणलेल्या राष्ट्रांतील कलावस्तूंनीं तें अप्रतिम बनविलें. प्रत्येक

कालांतील शिल्पाचे व चित्रांचे नमुने तेथें ठेवले आहेत. अमेरिकेंत वॉशिंग्टन येथें स्मिथसोनियन या संशोधनात्मक संस्थेची एक शाखा म्हणून जें नॅशनल म्युझियम आहे तें शंभर वर्षांपूर्वी स्थापन झालें असलें तरी फार व्यवस्थित आणि व्यापक आहे. अमेरिकेंत तसें पाहिल्यास १५०० पदार्थसंग्रहालयें आहेत. यांत ४०० ऐतिहासिक, १७० कलाविषयक, १२५ शास्त्रीय व २५ औद्योगिक आहेत. बाकी सर्वसामान्य आहेत.

रशियांत पहिल्या महायुद्धानंतरच्या क्रांतीनंतर जुनीं लखपतींचीं कलामंदिरें सर्वांना खुलीं करण्यांत आलीं व तीं कशीं पाहावींत हें लोकांना शिकविण्यांत आलें. "कला ही जनतेचीच आहे व तिच्या रोमरोमांत ती भिनली पाहिजे," असें लेनिन म्हणत असे. अशा संग्रहालयांचा सोव्हिएट युनियनच्या शासनपद्धतीच्या प्रचारासाठीं उपयोग करयांत येत असला तरी शास्त्रें आणि उद्योगधंदे यांच्या शिक्षणासाठींहि त्यांना महत्त्व देण्यांत येतें. अशा संग्रहालयांची संख्या अगणित आहे.

शाळेंतील मुलें, शिक्षक, मजूर, शेतकरी वगैरे सारेच लोक उपयुक्त वस्तू गोळा करून संग्रहालयांना पाठवितात. 'सोव्हिएट संघ राज्यांतील लोकांचें पदार्थसंग्रहालय' म्हणून जें आहे त्यांतील प्रत्येक वस्तूवर संघराज्यांतील विविध सामाजिक आणि सांस्कृतिक वळणांच्या लोकांतील परस्परांविषयींचा स्नेहभावच जणुं उठलेला दिसेल. तेथें मध्य अशियांतील लोकसमूहाचा जुना-नवा इतिहास स्पष्टपणें दृग्गोचर होतो. डेन्मार्क, स्वीडन, हॉलंड व जर्मनी या देशांतून 'जनता पदार्थसंग्रहालयें' (फोक म्युझियम्स) हा नवीन प्रकार पाहावयास मिळतो. यांत जशाच्या तशा उचलून आणलेल्या झोपड्या, पाणचक्क्या, वातचक्क्या, लोहारघरें इ. उघड्या जागेंत ठोकून त्यांत ग्रामीण व्यवसायाचीं साधनें मूळचीं असतात तशीं मांडून ठेवलेलीं असतात. म्युनिक येथील डयूट्शे म्युझियम तर नुसतें व्यावहारिक विज्ञान (अप्लाइड सायन्स) प्रत्यक्ष हाताळून पाहा असें सांगतें. तेथें प्रेक्षक आपणच शास्त्रीय सिद्धान्ताचा विनियोग कला आणि व्यापार यांसाठीं करण्याचे प्रयोग करून पाहातात. 'हात लावूं नका' अशा आपल्याकडील संग्रहालयांतून पाट्या असतात त्या वाचून साक्षर प्रेक्षकहि विचकतो व पुढें जातो. तसें तेथें नाहीं. उलट तेथील मुद्दाम नेमलेले मदतनीस स्वभाषेंत छापलेलीं पुस्तकें त्यांना देऊन प्रयोग करण्यास सांगतात.

आधुनिक सुधारणांच्या आक्रमणामुळें जुन्या राहणीचे अवशेष, जुन्या विद्या आणि कला, जुनीं गीतें आणि गोष्टी यांचा लोप झाला आहे व व त्यामुळें इतिहासांत मोठमोठे खांचखळगे पडलेले दिसतात. तेव्हां अशा जुन्या संस्कृतिदर्शक प्रतीकांचें संशोधन करून त्यांचा संग्रह केलेला अनेक युरोपियन म्युझियममधून आढळेल. स्कँडिनेव्हियांतील स्कॅन्सेनचें म्युझियम या दृष्टीनें नमुनेदार म्हणून सांगतां येतें. लोककला आणि लोकवाङ्मय जमवून त्यांचा पद्धतशीर अभ्यास करण्यास उत्तेजन देणाऱ्या आंतरराष्ट्रीय संस्थाहि निर्माण झालेल्या दिसतील.

पदार्थसंग्रहालयाचा आणखी एक नवीन प्रकार म्हणजे मुद्दाम मुलांसाठीं तयार केलेलीं ज्ञान मंदिरें. अमेरिकेंत हीं अनेक ठिकाणीं आढळतात न्यूयॉर्कमधील ब्रूकलिन म्युझियम हें सर्वोत्कृष्ट व अप्रतिम म्हणून नांवाजलेलें आहे. मुलांना घरीं व शाळेंत यांतील वस्तू उसन्या म्हणून देण्यांत येतात. यांत मुलांचे म्युझियमसंबंधीं खेळहि

शिकवितात. चार वर्षांच्या मुलांपासून तों दहा वर्षांच्या मुलांपावेतों त्यांच्या आकलनशक्तीच्या मानानें योजलेल्या आकडीच्या गोष्टी या संग्रहालयांत असतात. त्यांना वस्तू जमविण्याची व त्यांची उपयुक्त मांडणी करण्याची शिकवण आपोआप येथें मिळते. त्यांना कलावस्तू जमविण्याचा छंद लागून त्यांच्या ज्ञानांत चांगली भर पडते.

माणसाची आवड कलेच्या मार्गानें जात असेल तर त्याच्या जीवनांत एक विशेष रम्यता येत असते. कित्येक जण सुंदर किंवा अपूर्व वस्तू आपल्या दिवाणखान्यांत नीट ठेवण्यांत व त्या दुसऱ्यांना दाखविण्यांत आनंद उपभोगतात. कांहीं एका कांचेच्या कपाटांत ताजमहाल, बाहुल्या, चंदनी मूर्ती, जपानी पंखे वगैरे बाहेरून चांगल्या दिसतील अशा मांडतात. चैत्र महिन्यांतील गौरीच्या आराशींत या वस्तूंची मलावण बायका-मुली करतांना आपण पाहातोंच. ही कलाप्रियता कांहीं श्रीमंत लोकांमध्यें असल्यास ते एक स्वतंत्र खोली अशा कलेच्या व प्राचीन संस्कृतीच्या अपूर्व वस्तूंना देतात. पाश्चात्य देशांत खाजगी म्युझियम ठेवण्याची उमरावांत किंवा धनाढ्य लोकांत चांगली प्रथा पडली आहे. तीमुळें कला-वस्तूंना आश्रय मिळतो हें तर आहेच, पण जुन्या दुर्मिळ वस्तूंचें एके जागीं नीट जतन होत असतें. सरकारी पदार्थसंग्रहालयांतून आढळणार नाहींत अशा गोष्टी या खाजगी संग्रहांत पाहावयास मिळतात. आपल्याकडे पाश्चात्य लोकांच्या सहवासानें लक्षाधीश पारशी लोकांनीं व मोटमोठ्या जमीन-दारांनीं आणि राजेरजवाड्यांनीं आपल्या मालकीचीं उत्कृष्ट म्युझियम लाखों रुपये खर्च करून सज्ज ठेविलीं आहेत. हैदराबादचें सालरजंग म्युझियम पाहून चांगला जाणता माणूसहि थक्क होऊन जातो. एका लखपति उमरावाचा केवढा प्रचंड उद्योग व मनाची सुसंस्कृतता! आपल्या दरिद्री महाराष्ट्रांत देखील पुण्याचा 'राजा केळकर संग्रह' भूषणभूत असाच वाटेल. एका साधारण सुखवस्तु कवि म्हणून ('अज्ञातवासी') ओळखल्या जाणाऱ्या भावनाशील माणसानें गेलीं वीस वर्षें जिवाचें रान आणि घरादाराचा उन्हाळा करून एक अप्रतिम ऐतिहासिक प्रदर्शन आपल्या राहत्या घरांत थाटलें आहे. जुने कागदपत्र, सचित्र पोथ्या, लाकडी-दगडी-धातूच्या मूर्ती, निरनिराळ्या कलमांचीं रंगीत चित्रें, भांडीं, वस्त्रें, खेळ, बैठकी, जाळीदार शिसवीचें सामान इत्यादि नेहमींच्या म्युझियममध्यें आढळणाऱ्या जिन्नस राजासंग्रहांत दिसतीलच; पण याचीं कांहीं वैशिष्ट्यें आहेत. नक्षीच्या व देवमूर्ति काढलेल्या पळया, पाय वासण्याच्या पशुपक्षी वर बसले आहेत अशा वऱ्या, पोटांत भरलेलें तेल खालीं नवळींत हळूहळू आपोआप पाझरत आहे असे पक्ष्याच्या आकाराचे टांगते दिवे, उभ्या दीपलक्ष्मी, दिव्यांचीं झाडें, पातींवर नागमें, जनावरें, जोड्यीं, राधाकृष्ण, आपुल्मापुक, इत्यादि अक्रुती काढलेले शंभरावर अडकित्ते, अशा किती तरी आश्चर्यकारक, कधीं न पाहिलेल्या चिजा केळकरांनीं पैदा केल्या आहेत. पेशवाईतील वस्त्रांत एक पितांबर (दुरंगी) असा आहे कीं, तो एका बाजूनें पाहिल्यास नुसता हिरवा व दुसऱ्या बाजूनें पाहिल्यास नुसता तांबडा दिसेल. विणकामाचा हा उत्कृष्ट नमुना आहे. बारीक रत्नांच्या मूर्तींपासून तों भव्य तीनचार फूट तांब्याच्या देवतांपर्यंत सर्व शिल्पाचे प्रकार नजरेंत भरतात. नऊ गोपींनीं आपल्या अंगां-गांनीं बनविलेला हत्ती (नवनारी कुंजर), असाच हंस, जानू भिताड्याच्या पाठीवर बसून पानपता-वरून माघारीं फिरलेली पार्वतीबाई पेशवे, पिंजऱ्यांत सारिका सोडणारा बाल सवाई माधवराव, मोगल बेगमांचा दीपोत्सव, पांडव करीत असलेली कौरवांची गंगाकांठची उत्तरक्रिया, यांसारखीं चित्रें पाहून मन मागेंमागें जातें. छत्रपति शिवाजीमहाराजांचा सोन्याचा होन या संग्रहांतल्या-शिवाय कोठेंच दिसणार नाहीं. येथें राजासंग्रहाची स्तुति करण्याचा उद्देश नाहीं. पण महाराष्ट्रानें अभिमान बाळगावा असाच हा ऐतिहासिक संग्रह आहे. 'जेथें पिकतें तेथें विकत नाहीं' ही म्हण कोठें अगदीं बरोबर लागू पडत असेल तर ती या 'राजासंग्रहा'च्या बाबतींत! यावर अधिक भाष्य करून कडवटपणा आणूं इच्छीत नाहीं. असो.

अशा खाजगी पदार्थसंग्रहालयाचा हेतु आर्थिक फायदा करून घेण्याचा नसतो. त्या हेतूच्या सिद्धीसाठीं 'Curio Shops' असतातच; व त्यांचे मालक भरमसाट किंमती देऊन शौकीन श्रीमंतांच्या गळ्यांत खोट्यानाट्याहि वस्तू बांधीत असतात. तो प्रांतच निराळा. वैयक्तिक संग्रह थाटण्याच्या कामीं अनेकांची सहानुभूति लागते. विशेषतः घरच्या माणसांची लागते. व्यक्तीच्या पैशाला मर्यादा ही असतेच; तेव्हां आपल्या कुवतीप्रमाणें ज्यानें त्यानें संग्रह करावा. गगनाला गवसणी घालण्यापेक्षां एखादादुसराच कलाविषय घेऊन त्या दिशेनें वस्तू जमवीत गेल्यास अधिक इष्ट आहे. एकाच जातीच्या वस्तू आपल्याकडे अधिक असतील तर त्या दुसऱ्यास देऊन त्यांच्या बदला निराळ्या घेणें फायद्याचें असतें. खाजगी संग्रह करतांना तो मांडण्याचें व जतन करण्याचें ज्ञान प्राप्त करून

घेणें अवश्य आहे. यासंबंधीं पुस्तकें वाचून त्यांतील सूचना लक्षांत घ्याव्यात. तथापि, अद्यापि आपल्या देशांत घरगुती संग्रह थाटण्याइतपत भाग्याचे दिवस आलेले नाहींत. तितकी संपन्नता, सुशिक्षितता व सुसंस्कृतता बहुजन समाजांत येण्यास शतकें लोटावीं लागतील.

आपल्या देशांत सरकारी म्युझियम देखील देशाचा विस्तार आणि लोकसंख्या लक्षांत घेतां किती थोडीं व अप्रगल्भ आहेत! शंभराच्या आसपास असलेल्या अशा ज्ञानमंदिरें म्हटल्या जाणाऱ्या संस्थांतून जी व्यवस्था दिसते ती खरें ज्ञान देण्याच्या दृष्टीनें निरुपयोगी आहे. त्यांची मांडणीच मुळीं युरोपियन प्रेक्षकांसाठीं असते. बहुजनसमाजाला समजेल अशा भाषांतून पाट्या नसतात कीं 'मार्गदर्शिका' नसतात. समजूत देणारे 'गाईड' यांचा पूर्ण अभाव, तर वस्तुपाल (क्युरेटर) आपल्या खोलींत आरामशीर बसलेले. शिपाई लोक प्रेक्षकांचीं पादत्राणें, छत्र्या, काठ्या इ. च नुसतें सांभाळतात. बाजारांतल्याप्रमाणें लोक येत जात असतात. त्यांना काय ज्ञान मिळतें, देव जाणे! वास्तविक, आपल्या प्राचीनतम भरतखंडांत शिल्पकला, मूर्तिकला, चित्रकला; विणकाम, मातकाम, उद्योगधंदे, कलाकुसर वगैरेंचे नमुने असंख्य व जागजागीं पडलेले आहेत. त्यांची निर्यात परदेशांत होत असून तिकडील संग्रहालयें भूषित झालीं आहेत. पण आपली जनता त्यांविषयीं अडाणी राहिली आहे. पांच हजार वर्षांपूर्वी मोहेंजोदारो येथील नाचणाऱ्या मुली, शरीरसौष्ठवाचा नमुना असा हरप्पाचा अर्धवट पुरुष-पुतळा, मौर्य कालांतील सारनाथ येथील सिंहस्तंभ, सांचीचीं द्वारतोरणें, ख्रि. पू. पहिल्या शतकांतील भाजें लेण्यांतील नृत्य, इ. स. दुसऱ्या शतकांतील धबधब्याखालीं उभी राहून अंग धूत असलेली मथुरेची मुलगी, भुवनेश्वर देवळावरील मुलाचे लाड करीत असलेली स्त्री (११ वें शतक), १२ व्या शतकांतील एका चोल राजाची पंचधातूची मूर्ति, विश्वसंहाराच्या प्रसंगीं तांडवनृत्य करीत असलेला शिव (नटराज), वगैरेंच्या प्रतिमा पदार्थसंग्रहालयांत नीट न्याहाळल्यास अभ्यासू माणसास केवढा आनंद होतो व इतक्या मागल्या काळांत देखील आपले कारागीर किती कसबी होते याची प्रचीति येते. स्त्रियांच्या वेण्यांचेच नुसते प्रकार अशा शिल्पांतून पाहिल्यावर त्या वेळच्या महिला प्रसाधनकलेंत किती तरी पुढारलेल्या होत्या हें प्रत्यक्ष समजतें.

रागमालांच्या चित्रांतून संगीताची जोड चित्रकलेला दिलेली पाहून मन थक्क होतें. प्रत्येक राग किंवा रागिणी प्रेमभावनेवर अधिष्ठित असून त्या भावनेचें दृश्य चित्रांत दाखविलेलें असतें. रागांचीं नांवें प्रादेशिक असतात. उदा.—तोडी दक्षिण हिंदुस्थानांतील (तांडी) असून, एक स्त्री वीणावादनानें सुवर्णमृगाला आकर्षीत आहे असें चित्र या रागाचें काढतात. आरशांत आपलें सौंदर्य पाहिल्यानें प्रेमविव्हळ झालेल्या तरुणीचें दृश्य त्रिलावलें रागानें दाखवितात. हिमालयीन चित्रकलेंतू कृष्णाच्या बाळपणच्या लीला रंगविलेल्या आपण पाहतों, तर अकबर-जहांगीर बादशहांच्या आश्रयानें निर्माण झालेल्या रजपूत-मोगल कलमांत रामायण-महाभारतांतील कथानकें देशी चित्रकारांनीं उत्कृष्ट चितारलेलीं आपल्या नजरेंत भरतात. 'रझ्मनामा' नांवाच्या अकबराच्या स्वतःच्या महाभारत चित्रग्रंथांतील १६९ चित्रें, 'हम्झनामा' या त्याच्याच अद्भुत कहाणी ग्रंथांतील कापडावर काढलेलीं १३७५ चित्रें, अकबरनामा, रामायण वगैरेंतील अशींच चित्रें काढण्यास किती चित्रकारांचें कौशल्य खर्ची पडलें असेल तें सांगवत नाहीं. मोगल बादशहांचे दरबार, जनानखाने, क्रीडामंदिरें यांची कल्पना तर येतेच; पण इतर तत्कालीन गोष्टींवर प्रकाश पडतो. दक्षिणेंतील पांच शाह्यांच्या अमदानींतील दक्षिणी कलमांत मोगल कलमाचेंच अनुकरण दिसेल.

दोन हजारांवर वर्षांपासून अविच्छिन्न चालत आलेली वस्त्रकला अशा संग्रहांतून अभ्यासावयास मिळते. रेशीम आणि मलमल यांची येथून परदेशांत निर्यात होत असे. गुजरातची पाटोळा साडी इंडोनेशियांत वापरीत. सोन्यारुप्याच्या जरतारीचें काम असेंच प्रसिद्ध होतें. मोगल बादशहांनीं चित्रकलेप्रमाणेंच या देश्य कलेस चांगलें उत्तेजन दिलें. डाक्याच्या मलमलीचा इतिहास प्रसिद्धच आहे. राजपुतान्यांतील चुनडी व काश्मिरांतील शाली आजहि लोकप्रिय आहेत. या कलांचा इतिहास जर लिहावयाचा झाला तर म्युझियमशिवाय गत्यंतरच नाहीं. महाराष्ट्रांतील जिनगरांच्या बाहुल्या आतां मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्येंच पाहावयास मिळतात. ही कला आश्रयाच्या अभावीं बुडाली.

अशा प्रकारच्या असंख्य प्रदर्शनीय वस्तू, कीं ज्या आपल्या पुरातन संस्कृतीचा विकास क्रमाक्रमानें दाखवितात, त्यांची नुसती मांडणी संग्रहाल्यांतून करण्यापेक्षां त्याविषयीं पद्धतशीर ज्ञान लहान-थोरांना करून देणें अत्यावश्यक आहे. कलकत्ता विद्यापीठाचें आशुतोष म्युझियम या बाबतींत प्रगमनशील आहे असें म्हणतां येईल. जनता डोळे असून पहात नाहीं असें नुसतें ऐटीनें सांगण्यापेक्षां जनतेला ते डोळे देण्याचें महत्वाचें कार्य म्युझियमच्या चालकांनीं केलें पाहिजे. हिंदुस्थानांतील म्युझियमची पाहणी करून मार्खम आणि हारग्रीव्हज् यांनीं लिहिलेला अहवाल व त्यांत दिलेल्या सूचना त्यांनीं अभ्यासून जरूर त्या सुधारणा केल्या पाहिजेत. या ज्ञानमंदिरांत उत्सुकतेनें पाऊल टाकणाऱ्या भक्तांचीं ज्ञानेंद्रियें जागृत केलीं नाहींत तर मंदिर त्याच्या बांधणींतील दगडविटांप्रमाणेंच अचेतन आणि असंबद्ध राहील.



## माझ्या जीवाचा मंतर

वरा संसार संसार
जसा तावा चुल्ह्यावर
आधीं हाताले चटके
तव्हा मियते भाकर.

करा संसार संसार
खोटा कधीं म्हनूं नहीं
राऊयाच्या कयसाले
लोटा कधीं म्हनूं नहीं.

अरे संसार संसार
नही रडनं कुडनं
येड्या गयांतला हार
म्हनूं नको रे लोडनं.

अरे संसार संसार
खिरा येलावरचा तोड
एक तोंडामधी कडू
बाकी अवघा लागे गोड.

येड्या संसार संसार
म्हनूं नकोरे भिलावा
त्यातिं गोड भिमफूलं
मधी गोडंब्याचा ठेवा.

देखा संसार संसार
शेंग वरतून काटे
अरे वरतून काटे
मधी चिक्ने सागरगोटे.

ऐका संसार संसार
दोन्ही जीवांचा इचार
देतो दुःखातें होकार
आन् सुखातें नकार.

अरे संसार संसार
दोन्ही जीवांचा सुधार
कधीं नगद उधार
सुखा दुःखाचा वेपार.

देखा संसार संसार
असा मोठा जादूगार
माझ्या जीवाचा मंतर
त्याच्या वरती रे मदार.

अरे संसार संसार
आधीं देवाचा इसार
माझ्या देवाचा जोजार
मंग जीवाचा आधार.

— वहिणाबाई चौधरी


प्रेम आणि सौंदर्याला अर्पण
TRIBUTE TO BEAUTY
मानवी जीवनांत प्रेम व सौंदर्य यांचें स्थान उच्च आहे. सौंदर्यसाधन करण्याकरितां शुद्ध व निर्मळ बनलें पाहिजे. नीम साबणाने तुम्ही निर्मळ बनाल.
आयुर्वेदांत कडूलिंबाचे महत्व आणि उपयोग सांगितले आहेत.
नीमने शरिराची कोमल त्वचा चकचकीत व मृदु होते.
NEEM Soap
NEEM SOAP
वेलूर येथील प्रख्यात चेन्नकेशव मंदिराचे भिंतीवर कोरलेले कामदेव आणि रतिचे शिल्प काम
Bosfa
BOMBAY SOAP FACTORY
105 ABDUL REHMAN STREET, BOMBAY (ESTD. 1904
बॉंबे सोप फॅक्टरी,
१०५ अबदूल रहमान स्ट्रीट, मुंबई (स्थापना १९०४)

अनुक्रमणिका



हरवाचा हात सोडून त्याचा वाटाड्या पोरगा अकस्मात् नाहींसा झाला. आणि हरवा मोठ्या संकटांत पडला. डोळस माणसाला अंधारांत अंधुक आकृति दिसाव्यात तशीं त्याला. आसपासचीं माणसें दिसूं लागलीं. जणुं काय हलणाऱ्या सावल्या त्यानें डोळे फाडून पहाण्याचा. प्रयत्न केला. पण व्यर्थ ! अंधार आणि सावल्या ! मोठ्या प्रयासानें काठी टेकीत, आपटीत, लडलडत, आठदहा पावलें टाकलीं. पण तेवढ्यांत एकानें त्याला धक्का दिला. दुसऱ्यानें कोलमडतांना सावरून धरलें. तिसऱ्यानें त्याला शिवी हासडली. चौथ्यानें त्याला उपदेश केला कीं, "बाबा रे ! तूं वाटाड्या-शिवाय फिरलास तर चेंगरून जाशील किंवा पडशील, मोडशील !"

आणि त्याला हें म्हणणें पटलें. कारण त्याला या शहरांत येऊन चारच दिवस झाले होते. आणि इतक्यांतच, त्यानें मोठ्या प्रयत्नानें मिळविलेलें पोर, त्याला एकाकी टाकून पळून गेलें होतें. मुंबईतले रस्ते मोटारींनीं गजबजलेले, पादचाऱ्यांनीं फुललेले. तेथें खेडवळ आंधळ्याचा काय पाड ! त्याच्या खेड्यांतली गोष्ट निराळी. तेथें त्यानें आयुष्याचीं तीस वर्षें काढलीं होतीं. तेथें तो स्वरावरून माणसांना ओळखत होता, आणि त्यांच्या भावनाहि समजत होता. स्पर्शावरून त्याला त्या त्या ठिकाणचें ज्ञान होत होतें. त्याच्या आंधळ्या डोळ्यांत गांवचा सारा नकाशा जणुं काय कोरला होता. तेथील गोष्ट निराळी होती. पण त्याला तेथें ठेवणें त्याच्या नशिबालाच आवडलें नाहीं. मनाचे डोळे उघडण्यापूर्वीच त्याची आई वारली होती आणि त्याच्या थोरल्या गरीब बहिणीनें त्याचा प्रतिपाळ केला होता. कॉलऱ्याच्या विकारानें एक दिवस अकस्मात् तीहि वारली. आणि त्याला दोन घांस घालणारें कोणीहि राहिलें नाहीं. गांवच्या दयेवर जगण्यांत अर्थ नाहीं असें जेव्हां त्याला दिसून आलें तेव्हां तो, एका गांव-कऱ्याच्या मदतीनें मुंबईला आला. त्याला ऐकून माहीत होतें कीं, तेथें आंधळेपांगळे देखील फोफावतात. लोकल गाड्यांच्या डब्यांतून फिरलें तरी दोन अडीच रुपये दररोज गोळा होतात. त्याच आशेनें तो मुंबईला आला, पोरसवदा वाटाड्याच्या साहाय्यानें त्यानें आठदहा रुपयांचा गल्ला जमा केला, आणि तें कृतघ्न कारटें, दीड तासापूर्वीं पळून गेलें. आतां आपल्याला कोण तारणार ? त्याच्या आवडीचा, वारकऱ्याच्या तोंडून ऐकलेला अभंग त्याच्या तोंडांतून बाहेर पडूं लागला—

इतक्यांत एक लंगडा त्याच्यापाशीं जाऊन त्याला म्हणाला, "दादा ! काळजी कसली करतोस ?"

"वाट दाखवणारं पोर निघून गेलं !"

"एवढंच ना ? मग काळजी करूं नकोस तूं ! त्या पोराची जागा मी भरून काढतों !"

आणि त्यानें हरवाचा हात आपल्या हातांत घेतला. हरवाच्या पापण्या थरथर हलल्या. या नव्या माणसाची आकृति जणुं काय त्याला आपल्या मनांत ठसवून घ्यायची होती. त्याचें कोणतं तरी रूप कल्पून, त्याला आपल्या अंतरंगांत स्थान द्यायचें होतें. त्यानें फुटपाथवर बसतां बसतां म्हटलें, "देवानंच तुला पाठवलं ! पण रहाशील ना तूं माझ्याकडं ?" "राहीन



# पहिलें बक्षीस!

"दादा! काय वेडा प्रश्न! पहिलं बक्षीस आलं
तर आपण सुखी होऊं? नाहीं,
आपण त्याच्या भाराखालीं
चिरडून जाऊं!"

लक्ष्मणराव सरदेसाई

दादा, मला पण कोणी नाहीं." आणि मग आपली कुबडी हातांत धरून तोहि हरबाच्या शेजारीं बसला.

हरबानें अदमासानें त्याच्या खांद्यावर हात ठेवला. मग तो हळुहळू खालीं सरकवीत नेला. जणुं काय त्याला समजून घ्यायचें होतें कीं, हा इसम कोण आहे, कसा आहे, त्याच्या भावना काय आहेत! हा उडाणटप्पू, भामटा आहे कीं काय? पण लगेच काळ्या ठिक्कर, खडकाळ प्रदेशावर चांदण्याचा प्रकाश पसरावा त्याप्रमाणें त्याचा रुक्ष, बसका चेहरा खुलला आणि त्यानें विचारलें, "तुझें नांव काय?"

"लखबा!"

"काय करतोस?"

"मी लंगडा आहें."

"अरेरे! मग पोट कसं चालतं?"

"पाय मोटारीखालीं सांपडून कापला. सहा महिने हास्पिटलांत पडून होतों. तिथून बरा होऊन दोन आठवड्यांपूर्वीं बाहेर पडलों, आणि भीक मागूं लागलों. पण मला लोक भीक घालीनात. कारण मी अंगाखांद्यानं सुदृढ आहें. पाय तर लंगडा आहे, त्यामुळें काम नाहीं करतां येत. याच विवंचनेंत मी सध्या आहें. तूं दिसलास. तुझी धडपड पाहिली नि ठरवलं, तुला घेऊन फिरायचं. मिळेल तें दोघांनीं खायचं, एकत्र रहायचं."

"वा! लखबा! कसं छान बोललास! माझ्या मनांतलें बोललास! देवानंच तुला पाठविलं नाहीं तर माझी काय दैना उडाली असती! पण लखबा! आपण रहाणार कुठं रे?"

"त्याचं काय मोठंसं? त्या समोरच्या पुलाच्या खालीं झोंपूं! जागा फक्कड आहे! कोणाची कटकट नाहीं! पाऊसपाणी लागत नाहीं. चल आपण तिथं जाऊन बसूं!"

लखबा उठला आणि हरबाचा हात हातांत धरून चालूं लागला. फुट-पाथवर चणेकुरमुरेवाला बसला होता, त्याच्याकडे त्याची बुभुक्षित नजर गेली आणि तो हरबाला बोलला, "दादा! भूक लागली आहे, पैसे आहेत का खिशांत?"

हरबानें तोंड वर करून लखबाकडे पाहिल्यासारखें केलें. "जा लखबा! घेऊन ये चणेकुरमुरे. अन् माझ्यासाठीं देखील आण. मला पण भूक लागली आहे." असें बोलून त्यानें चारपांच आणेल्या हरबाच्या हातावर ठेवल्या.

हरबा चणेकुरमुरे घेऊन आला, आणि पुन्हा ते चालूं लागले. मग वाटेंत त्यांनीं एकमेकांबद्दल बरीच माहिती विचारून घेतली.

मग दोघांनींहि पुलाखालींच जागा निश्चित केली. थोडा वेळ ते तेथें बसले. पुढच्या कार्यक्रमासंबंधीं बोलले. कुठें फिरायचें, कुठें जेवायचें, यासंबंधीं त्यांनीं विचार केला. त्यांना वाटलें, परमेश्वरानेंच आपली भेट घडवून आणली! आपलें दुःखाचें जग विरून गेलें. आतां सुखाचें जग उगवत आहे. आपल्या मनाच्या मिळालेल्या पाट्या त्यांनीं स्वच्छ केल्या, आणि नव्या आशेनें, नव्या उत्साहानें दोघांनींहि एकमेकांच्या सहकार्यानें पुढें पाऊल टाकलें. हरबाच्या डोळ्यांसमोर हलणाऱ्या सांवल्यांत आतां प्रकाशाची किनार चमकूं लागली. कांहीं दिवस गेले. दोघेहि प्रेमानें नांदूं लागले. परस्परांच्या प्रकृतीला, सुखाला जपूं लागले. लोकल गाड्यांच्या डब्यांतून, दिवसांतून दोन फेऱ्या घातल्या म्हणजे पसाभर दिडक्या जमा होत, त्या हरबा मोजीत असे आणि आपल्या एका ओळखीच्या इसमाकडे नेऊन ठेवीत असे. पुलाखालच्या त्या उघड्या जागेंत सुरक्षितता कुठची असणार?

सैपाकाचा व्याप संभाळणें त्यांना शक्यच नव्हतें म्हणून, ते हॉटेलांतून

पाव, भर्जी, भाजी इ. जिन्नस विकत घेत आणि त्याच्यांवरच गुजराण करीत. त्याशिवाय, गल्ल्यांतून फिरके म्हणजे बायका भाकरी, चपाती टाकलीत, टाकीत, त्यावर चरितार्थ चाले.

त्यांच्या अपेक्षा सफल झाल्या. पैसा मिळत होता, पोटाला मिळत होतें. पैसा सांठत होता. आणखी काय हवें होतें? एकमेकांवर प्रेम करायला मिळत होतें. एक दुसऱ्याची काळजी घेत होता. दोघांचेंहि एक कुटुंब बनलें होतें. त्यांत स्त्री नव्हती पण स्त्रियांइतकेंच गाढ प्रेम करणारीं मनें होतीं. तीं एकमेकांवर विसंबणारीं होतीं, एकमेकांसाठीं तळमळणारीं होतीं. दोन दोऱ्या एकाच दोरींत वळून एकजीव झाल्या होत्या. त्या भिन्न पण अभिन्न होत्या. एकाशिवाय दुसरा जगूं शकत नव्हता. एकाचा आजार दुसऱ्याला अस्वस्थ करीत होता.

महिन्याच्या अखेरीं त्यांनीं आपल्या कमाईचा हिशोब केला, तेव्हां त्यांना दिसून आलें कीं, साडेबावीस रुपये सांचले आहेत. दोघेहि आनंदित झाले. निश्चितपणें जगायला एवढी कमाई भरपूर होती, आवडी पुरविता येणार होत्या.

लखन्या म्हणाला, "दादा! आपण एक गोव्याची सोडत काढूं या."

हरवाला ही कल्पना आवडली. पांचपंचवीस रुपये मिळतात. त्यांपैकीं पांच रुपये सोडतीच्या रोमहर्षक धंद्यांत घालायला काय हरकत आहे?

"पण आपल्याला लोक फसविणार तर नाहींत ना?"

"मला दिसतें ना?"

"पण तुला इंग्रजी आंकडे कुठं वाचायला येतात?" हरवानें आपली भीति व्यक्त केली.

"कुणाकडून तरी पाहून घेऊं!"

"लोक फसविणार नाहींत ना!"

"सगळेच लोक वाईट कुठं असतात? आमच्या ओळखीच्या हॉटेल-वाल्याला दाखवूं."

याप्रमाणें योजना ठरवून त्यांनीं त्याच दिवशीं सोडतीचा अखला नंबर पांच रुपयांना विकत घेतला. आणि हरवानें तो कागद आपल्या कंबरेच्या रुमालाच्या गांठीला बांधून टाकला. वाऱ्यावर तरंगणारें एक नवें स्वप्न फडफडण्याच्या नादाला ते लागले.

कांहीं दिवस गेले आणि बक्षिसांचा निकाल प्रसिद्ध झाला.

हरवा-लखन्याची जोडी सोडतीविक्याच्या दुकानांत आली. आणि त्यांनीं सोडतीचा कागद त्याला दाखविला. त्या रंगीबेरंगी कागदाकडे डोळे वटारून एक वेडसर इसम पहात बाजूला उभा होता. जणुं काय त्याच्यावर धाड घालण्याचा त्याचा विचार असावा. लखन्याची नजर त्याच्याकडे गेली तेव्हां तो चपापून मागें सरला.

दुकानदारानें सोडतीचा नंबर पाहिला, मग निकालाच्या कागदावरून नजर फिरवली आणि म्हटलें, "पंधरा रुपये आले आहेत!"

"तुम्ही देतां काय?" हरवानें प्रश्न केला. दोघेही आनंदानें हुरळून गेले. अनायासें पांचाचे पंधरा झाले होते. कदाचित् पांचाचे पंचवीस हजार देखील होणें अशक्य नव्हतें.

"दहा देईन—पांच रुपये कमिशन!"

दोघेहि बुचकळ्यांत पडले, असें पाहून दुकानदार म्हणाला, "पंधरा पाहिजे असतील तर गोव्याला चला." आणि तो उपहासानें त्यांच्याकडे पाहूं लागला.

दोघांचे चेहरे पुन्हा म्लान पडले. दुकानदारानें दहाची नोट पुढें करीत म्हटलें, "बोला झटकन्. नको असले तर ही घ्या तुमची सोडत!"

हरवानें हात पुढें केला आणि नोट घेतली. पण लखन्याला मात्र शंका आल्याशिवाय राहिली नाहीं. दुकानदारानें सोडत आपल्या पेटीच्या खणांत टाकून दिली. आणि तो आपल्या कामांत गुंतला.

निरुपायानें दोघेहि तेथून जड पावलांनीं दूर झाले, आणि तो वेडसर माणूस आसपास रेंगाळत, त्यांच्याकडे पहातच राहिला. आणि जातां जातां, लखन्यानें वळून त्या वेड्याकडे पाहिलें तेव्हां त्याला दिसून आलें कीं, एका मुलीच्या हातांतल्या खाऊच्या पुड्यावर त्यानें अकस्मात् झडप घातली आणि तो तेथून पळूं लागला. आणि तेथें असलेले दोन इसम त्याचा पाठलाग करूं लागले.

ते आपल्या ठराविक ठिकाणीं आले, आणि गोणपाटाचा बिछाना पसरुन आडवे झाले. नेहमीप्रमाणें ते मोकळेपणानें बोलले नाहींत. अभावतःच त्यांच्यांत एक प्रकारची विरल भिंत तयार झाली. दोघेहि सोडतीसंबंधीं विचार करीत झोपी गेले.

दुसऱ्या दिवशीं, भीक मागून परत येतांना त्यांनीं नवी सोडत विकत घेतली. आणि पुन्हा तेथेंच रेंगाळणाऱ्या त्या वेड्यानें, त्या रंगीबेरंगी कागदावर आपली आशाळभूत व निर्बुद्ध नजर फेकली.

एक पंधरवडा उलटला. या अवधींत त्यांचा धंदा जोरांत चालला. हरबाच्या चेहऱ्यावर असे केविलवाणे पण सात्विक असे भाव होते, त्याची काया अशी फाटकी झाली होती, त्याच्या आवाजांत असा एक हृदयभेदी कंप सांठला होता, कीं त्याला पाहिल्याबरोबर, पैसा दोन पैसे त्याच्या ताटलींत टाकल्याशिवाय, बहुतेक प्रवाशांना रहावत नसे.

दिवस उजाडला म्हणजे त्यांना सोडतीची आठवण होई. आणि संध्याकाळीं परत येतांना, ते दुकानदारापाशीं जाऊन निकालाची चौकशी करीत. सोडतीनें त्यांच्या जीवनांत एक प्रकारची विलक्षण अस्वस्थता निर्माण केली होती एवढें खरें.

या खेपेला ते मागच्यापेक्षांहि अधिक आतुर मनःस्थितींत, सोडतीचा निकाल ऐकून घ्यायला गेले. हरबानें रुमालाची गांठ सोडून, मळलेला तो कागद आपल्या सहकाऱ्याच्या हातावर ठेवला. त्यानें तो उलगडून दुकानदारासमोर धरला. त्यानें सोडतीवर व निकालाच्या कागदावर आळीपाळीनें झटकन् दृष्टि फिरवून उपेक्षेनें म्हटलें, "महाराज! गेली तुमची सोडत!"

लखबानें सोडत परत घेतली आणि कांहींशा त्वेषानें निराशेनें टरकन् फोडून तिचे तुकडे तुकडे केले आणि ते भरकन् वाऱ्यावर उडविले.

त्या अनामिक वेड्यानें हा प्रकार पाहिला आणि हवेंत तरंगणाऱ्या त्या कपट्यांकडे पहातां पहातां तो विलक्षण भाबडेपणानें हसला. आणि मग तेथें गोळा झालेले लोक देखील हसले. लखबाचा चेहरा साफ पडला! आणि त्याचे खांदे अधिकच गळाले. हरबाच्या मनांत देखील एक विरल, अस्पष्ट खिन्नता शिरली. आणि झांकलेल्या डोळ्यांत घडलेल्या आकृती अधिकच काळवंडून गेल्या.

आणि मग त्यांनीं पुन्हा सोडत विकत घेतली. या भिकाऱ्यांना लागलेली सोडतीची चट कित्येकांना विचित्र वाटली. ते त्यांची थट्टा करूं लागले. दोघेहि आपापल्यापरीनें सोडतीसंबंधीं विचार करीत होते. हरबाला डोळ्यांनीं दिसत नसलें तरी आपल्या तीव्र संवेदनाशक्तीनें कळून चुकलें होतें कीं, लखबाचें मस्तक ठिकाणावर नाहीं. त्याचें भिक्षेकडे लक्ष नाहीं. तो आतां मोकळेपणानें बोलत नाहीं. गेले दोन तीन महिने तो आपल्यावर वडील भावाप्रमाणें प्रेम करीत होता; आपली जिवापाड काळजी घेत होता, पण आज आपणा दोघांमध्यें अंतर उत्पन्न झालें आहे.

रात्रीच्या वेळीं ते बिछान्यावर पडले तेव्हां हरबा म्हणाला, "लखू! आज घेतली तेवढी सोडत पुरे आहे. यापुढें सोडतीचा नाद सोडूं या आपण."

हरबाच्या स्वरांत अधिकच कारुण्य शिरलें.

लखबा चपापला. त्याच्या मनाच्या तळाशीं वुळवुळणाऱ्या शंका जणुं काय एकदम ताठ उभ्या राहिल्या.

"पंचवीस हजारांचं बक्षीस लागलं तर जन्माचं दैन्य फिटेल!" लखबा बोलून गेला, आणि मग त्यानें कांहीं उदाहरणें दिलीं. किती तरी भिकाऱ्यांना मोठीं बक्षिसें लागलीं आहेत आणि ते अकस्मात् श्रीमंत झाले आहेत. त्यानें त्यांचीं नांवें देखील सांगितलीं आणि ते सध्या काय करतात तें देखील सांगितलें.

हरबानें सुस्कारा टाकला आणि म्हटलें "लखू! उद्यां पंचवीस हजार आपल्याला मिळाले तर आपण काय करूं?"

हा त्याचा प्रश्न ऐकतांच लखबा गांगरला. स्तब्ध झाला. त्याच्या मनांतील बऱ्याबाईट विचारांची गल्लत झाली. कांहीं क्षणानंतर तो म्हणाला, "दादा! काय वेडा प्रश्न! पहिलं बक्षीस आलं तर आपण सुखी होऊं!"

हरबा खिन्नपणानें हसला. मग शांतपणानें बोलूं लागला, "पंचवीस रुपये मिळविण्याची नि ते पचविण्याची आपली लायकी नाहीं! पंचवीस हजार रुपये आपण कसे संभाळणार? आपण त्यांच्या भाराखालीं चिरडून जाऊं!"

"सगळं जग पैशासाठीं धडपडत आहे—"

"पण मी आंधळा आहें नि तूं लंगडा आहेस !"

"म्हणून तर आपल्याला पैशांची अधिक गरज आहे !"

"कितीहि पैसे मिळाले म्हणून मला डोळे लाभणार आहेत का कधीं ? नि तुझा लंगडा पाय नीट होणार आहे काय ?"

लखू गप्प बसला. हरबाची ही विचारसरणी त्याला मान्य नव्हती. त्याला पैसा हवा होता का ? त्यालाच बरोबर माहीत नव्हतें.

"लखू ! आपल्याला आज काय उणं आहे ! तुझ्यासारखा प्रेमळ भाऊ मला सांपडला आहे, ही देवाचीच कृपा नाहीं काय ? मला डोळे नाहींत, पण तुझं प्रेम मला दिसत आहे. मी गाडींतून हात पसरून फिरूं लागलों म्हणजे लोकांची पाझरणारी माणुसकी मला दिसूं शकते. हें शरीर फिरवविण्याइतका पैसा त्यांच्या हातून आमच्या थाळींत पडूं लागतो. दुसऱ्या कसल्याच मोठेपणाचं जग मला दिसत नाहीं, लखू !"

लखबा नेहमीप्रमाणें ऐकत होता. हरबा आपल्या मिटलेल्या डोळ्यांसमोर, उघड्या मनासमोर, प्रकाशाच्या पट्ट्यांवर हलणाऱ्या आपल्या भाग्याच्या आकृती निरखून पहात होता आणि लखबाचें सारें लक्ष अंधारांत, रेल्वे लाइनवर, दूरवर झगमगणाऱ्या लाल, हिरव्या भडक दिव्यांकडे लागून राहिलें होतें. पंधरा तारीख उजाडली आणि सोडतीच्या बक्षिसांचा निकाल जाहीर झाला. आज हरबा-लखबा सकाळींच चर्नीरोडच्या दुकानांत आले. दुकानदारानें आज स्वतः होऊन त्यांना नंबर विचारला. आणि हरबानें सोडतीचा कागद लखबाच्या हातांत दिला. लखबानें तो दुकानदाराच्या स्वाधीन न करतां त्याला नुसता नंबर दाखवला. तो नंबर पहातांच दुकानदार खुलला. बैठक सोडून तो खालीं आला आणि म्हणाला, "अडीचशें रुपये देतों, आहे तयारी ?"

आंधळ्यालंगड्यांची चुळबुळ, कुजबुज सुरू झाली. हरबा बोलला, "देऊन टाक सोडत."

लखबानें नकार देत म्हटलें, "मोठं बक्षीस आलं असलं पाहिजे. दुसऱ्याच दुकानांत चौकशी करूं." सोडत त्यानें आपल्या मुठींत घट्ट धरली. त्याच्या मनांत वादळ उठलें, आणि त्याची सावली चेहऱ्यावर पसरली.

शनिवारचा दिवस. रस्त्यांतून सकाळींच मोटारींची रांग हलूं लागली. पलीकडच्या बाजूला, स्टेशनांत गाड्या थांबूं लागल्या. सुटूं लागल्या. रहदारी वाढत चालली. आजूबाजूच्या झाडांवर कावळ्यांचे थवे ओरडूं लागले. चौपाटीवरून येणारा वारा जाणवूं लागला. गति आणि आवाज यांनीं तेथील जीवनाला रंग भरूं लागला.

दुकानाच्या आवारांत उभ्या असलेल्या एका इसमानें मोठ्यानें ओरडून म्हटलें, "नंबर ५०—पहिलें बक्षीस, पंचवीस हजार रुपये !"



तत्काळ लखबानें मुठींत धरलेली सोडत उलगडून लोकांना दाखविली आणि लगेच जमावांतून पुनः आवाज उठला: "नंबर ७५०—पहिलें बक्षीस, पंचवीस हजार रुपये !"

लखबानें हरबाला बाजूस सारून, ताडकन् उडी मारली आणि तो दुसऱ्या दुकानाच्या दिशेनें लंगडत लंगडत धावूं लागला. पैशांच्या मोहानें तो बेहोष झाला. इतके दिवस लपवून ठेवलेल्या विचारांचे नाग सैरावैरा बाहेर पडले आणि त्यांनीं लखबाला वरखालीं वेढून टाकलें.

लखबा सोडत घेऊन पळाला एवढेंच हरबाला कळलें. आणि एका विलक्षण संवेदनेनें तो थरथरूं लागला.

"लखू ! लखू !..." त्यानें हाक मारली. लोकांना सारेंच दृश्य मजेदार वाटलें. लखबा पळतच होता. पंचवीस हजार रुपयांशिवाय त्याला कांहींच दिसत नव्हतें. तो अनावर झाला होता. त्या एकाच क्षणांत तो हरबाला सपशेल विसरून गेला होता. पहिल्या बक्षिसांत त्याचें भाग्य साठलें होतें

"लखू ! लखू !" पुन्हा हरबाचा केविलवाणा आवाज ऐकूं आला

हरबा कांपत, चांचपडत, अडखळत, ठेचाळत, अनावर मनानें पुढें जाऊं लागला. त्याला लखूला सांगायचें होतें कीं, 'तूं पळूं नकोस, पंचवीस हजार रुपये तुलाच देऊन टाकतों.' गेल्या तीन महिन्यांच्या कालांत, लखबाच्या प्रेमांत त्याला गवसलेलें भाग्य जणुं काय अवचित निसटूं पहात होतें आणि तें तो पकडूं पहात होता.

त्याला वाटलें, लखबा रस्ता ओलांडून स्टेशनवर गेला आहे. तो तिकीट काढून कुठें तरी दूर दूर जाईल...

लखबा पैसे घ्यायला अगदीं आतुर झाला होता. त्याला असा भास झाला कीं, आसपासचे लोक आपल्यावर हल्ला करतील नि सोडत हिरावून घेतील. शक्य तितक्या लवकर सोडतीच्या एजंटाकडून पैसे वसूल करून, तेथून पळ काढला पाहिजे. आणि मग चैन !......

त्यानें एजंटाला सोडत दाखविली. पहिल्या बक्षिसाचा पुकारा केला. आणि इतक्यांत—त्याच्या पाठीमागून कुणी तरी, त्याच्या हातांतून ती पहिल्या नंबरची सोडत अलगद ओढून घेतली आणि तो इसम पळूं लागला.

"वेडा ! वेडा !" लोक ओरडूं लागले. आणि मग लखबाला तो नेहमींचा वेडा गर्दीतून धूम ठोकीत असलेला दिसला.

लखबा सर्व शक्ति एकवटून, लंगडत, धापा टाकीत वेड्याचा पाठलाग करूं लागला.

इतक्यांत कुणी तरी वेड्याला पकडलें. वेडा धडपड करूं लागला.

हें बघतां बघतांच लखबा पुढें सरकत होता. त्याच्या मनाचा आकांत उडाला होता. त्याचा चेहरा भयानक दिसत होता.

याच वेळीं, रस्त्यांतून झोके खात जाणारा हरबा कोलमडून पडला आणि अतिशय वेगांत असलेल्या मोटारीखालीं सांपडला. एक हृदयभेदक किंकाळी फुटली. गाडी थांबली. गडबड उडाली. दोन इसमांच्या हातांच्या पकडींत सांपडलेल्या वेड्यानें पहिल्या बक्षिसाची सोडत टरकन् फाडली. तिचे एका क्षणांत तुकडे तुकडे केले आणि ते वाऱ्यावर फेकून देऊन त्यानें विकट हास्य केलें ! सगळे हतबुद्ध होऊन पाहूं लागले.

लखबानें वाऱ्यावर तरंगणारे ते कपटे बघितले, आणि रक्तबंबाळ, छिन्नविछिन्न स्थितींत पडलेला हरबाचा तो थरथरणारा देह पाहिला. पुन्हा ते कपटे पाहिले आणि आपल्या अंगांत शिल्लक राहिलेली सारी शक्ति वेचून तो ओरडला—"पहिलें बक्षीस !"

हे शब्द आणि ते कपटे एकमेकांच्या सोबतीनें वाऱ्यावर तरंगूं लागले !

**स्वातंत्र्याचीं पांच वर्षें तर निघून गेलीं. यापुढच्या पांच वर्षांत आपल्यासमोर दैवानें काय काय वाढून ठेवलें आहे, याच संभ्रमांत तरुण काय, वृद्ध काय आणि मुलें काय आज गढलेलीं आहेत.**

# भारताच्या नशिबाची पंचवार्षिक योजना!

ज्यो. वसंत लाडोबा म्हापणकर

**जरी आलें राज्य मोळी-विक्या हातीं। तरी तो मागुता व्यवसायी॥ तृष्णेची मजुरें नेणती विसावा। वाढे हावहावा काम कामीं॥ वैभवाचीं सुखें नातळतां अंगा। चिंता करी भोगा विघ्नें जाळीं॥ तुका म्हणे वाहे मरणाचें भय। रक्षण उपाय करूनि असे॥** (संत तुकाराम)

"**तुच्छोऽप्यर्थोऽल्प सत्त्वानां गच्छति प्रार्थनीयताम्॥**" (योगवासिष्ठ) क्षुद्र अंतःकरणाचे लोक नेहमीं क्षुद्र फळासाटींच धडपडत असतात. **एखादा कोणी मोळीविक्या** राज्यावर बसविला, तरी त्यास मोळी विकण्याचा व्यापार करण्याची इच्छा उत्पन्न होते. **ज्यांचे अंगीं पुष्कळ तृष्णा आहे ते तिचेच सेवक होऊन अविश्रांत श्रम करतात,** आणि त्या योगानें हावेनें हाव व कामानें काम वाढतो. जरी त्यास चांगलें वैभव असलें तरी त्याच्या अंगोसी सुख लागत नाहीं; आणि उत्तम प्रकारचे भोग अनुकूल असले, तरी त्यांत कांहीं विघ्न येईल कीं काय, म्हणून तो सर्व काल चिंता करीत असतो. **संतश्रेष्ठ तुकोबाराय म्हणतात,** जरी तो मरणाचें भय बाळगीत असला तरी आपलें वैभव रक्षण करण्याचे उपाय तो करीत राहतो.

"**वस्त्वल्पं मन्यति बृहल्लघुसत्त्वो हि मन्यते॥**" (योगवासिष्ठ) कोणताहि प्राणी आपल्या बुद्धिसामर्थ्याप्रमाणें वस्तूला महत्त्व देतो. मंद बुद्धीचा मनुष्य अतिशय मूल्यवान् पदार्थाला कमी किंमतीचा समजून क्षुद्र वस्तूला फार महत्त्व देतो. **उंदीर रत्नादिकांना** तुच्छ मानून धान्याचे कण गोळा करतात. तसेंच खेळणारें मूल मातीचें नवीन चित्र घेण्यासाटीं जवळचा मूल्यवान् दागिना देण्यासहि तयार होतें. "**वस्त्वस्थानगतं सर्वं शुभमप्यशुभं भवेत्॥**" कोणतीहि शुभ वस्तु अयोग्य ठिकाणीं राहिल्यास ती अशुभ होते.

"**प्राचीन काळीं हा भारतवर्ष देश** ज्ञानाच्या उच्चतम शिखरावर आरूढ होता. पूर्वीच्या ऋषींनीं आणि पंडितांनीं सर्व शास्त्रांचा आणि सर्व विषयांचा सांगोपांग विचार करून आणि संशोधन करून तीं ग्रंथरूपानें लिहून ठेविलीं होतीं. **हजारों वर्षांच्या धुळीनें ज्ञानाच्या त्या सर्व खाणी** आतां बुजून नष्टप्राय झालेल्या आहेत. **स्वातंत्र्य प्राप्त होऊन भारत वर्षांत एकछत्री प्रजासत्ताक राज्य स्थापन झाल्यानंतर** तरी आतां ह्या प्राचीन ज्ञानाचा नि विद्येचा जीर्णोद्धार करण्याचें प्रचंड कार्य राज्यकर्त्यांनीं हातीं घ्यावयास हवें होतें. पण '××वाद' नांवाचा एक विलक्षण घातुक रोग आजच्या राज्यकर्त्यांच्या बुद्धीला जडला असल्यानें ज्ञान आणि अज्ञान, धर्म आणि अधर्म किंवा कर्म आणि अकर्म ह्यांबाबत त्यांच्या डोक्यांत प्रचंड गोंधळ माजून राहिला आहे. **अन् त्यामुळें प्रगतीच्या शिखरावर जाऊन बसलेल्या पाश्चात्यांचें आजचें विज्ञानहि, त्यांना आज आकर्षू शकत नाहीं** वा पूर्णत्वाला जाऊन पोहोंचलेल्या प्राचीन भारतीयांच्या ज्ञानाबद्दलहि पण त्यांना आत्मीयता वाटत नाहीं. **गांधीजींनीं प्रतिपादिली तीं विद्या आणि आचारिलें तें ज्ञान** वा विज्ञान ही एकच कल्पना त्यांच्या मेंदूंत खोल जाऊन बसली आहे. जें, आपलें स्वतःचें आहे तेंहि आपल्यास नको आणि जें बोलून चालून परक्यांचें आहे तें तर नकोच नको, अशा एका चमत्कारिक बौद्धिक संभ्रमावस्थेंत आज सारें राष्ट्र सांपडलें आहे. **भारताचे पंतप्रधान** नेहरू हे या संदेहाचें, संभ्रमाचें नि गोंधळाचें मूर्तिमंत प्रतीक होत. **त्यामुळें स्वातंत्र्य मिळून पांच वर्षें होऊन गेलीं तरी** आम्हांला आमच्या उद्धाराचा मार्ग अद्यापि सांपडलेला नाहीं. **काय करावयाचें आणि कुठें जावयाचें** ह्याचा अजूनहि आम्हांस बोध झालेला नाहीं. **देशांतील सत्तेचीं, अधिकाराचीं, आणि धनाचीं पुष्कळशीं केंद्रें** अज्ञानी, दुराग्रही आणि मारेफिरू लोकांच्या हातीं गेल्यानें कायदा आणि व्यवहार किंवा आचार आणि विचार ह्यांची ठिकठिकाणीं फाळणी होऊन **ढोंग, लुच्चेगिरी आणि गुन्हेगारी** ह्यांना विलक्षण ऊत आलेला आहे. बहुसंख्य जनतेच्या जीवनापासून ज्याची फारकत झालेली आहे, अशा तत्त्वज्ञानाची जेव्हां राजवट सुरू होते तेव्हां राष्ट्रामध्यें असाच चमत्कारिक संघर्ष निर्माण होतो." **बौद्धधर्मप्रसाराच्या काळीं** अहिंसेचा असाच अतिरेक झाल्यानें भारतीय विज्ञानाची फार मोठी पीछेहाट झाली. सम्राट् अशोकानें माणसांसाठीं आणि जनावरांसाठीं दवाखाने काढले खरे; पण मनुष्यावर शस्त्रप्रयोग करण्याची बंदी केली तेव्हांपासून, आर्य वैद्यकीच्या अवनतीला प्रारंभ झाला. कारण शरीरें फाडणें वगैरे

क्रियांना धर्मानें व कायद्यानें बंदी केल्यानंतर त्या सुधारणेला महत्त्व राहिलें कोठें? ह्याच जुन्या इतिहासाची पुनरावृत्ति आजचे गांधीवादी राज्यकर्ते करीत आहेत, असें आम्हांस भय वाटतें." **(आचार्य अत्रे—'नवयुग')**

"**अचक्षुरन्धस्ययथाग्रणीः कृतः तथा जनस्या विदुषोऽबुधोगुरुः ॥**" (श्रीभागवत) ज्याप्रमाणें आंधळ्या मनुष्यानें आंधळा मनुष्य आपला पुढारी केला असतां त्यापासून कांहीं एक उपयोग होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान नसलेल्या लोकांनीं अडाणी गुरु केला असतां त्याचा कांहीं एक उपयोग होत नाहीं. "**वड्या वड्या अधिकारी वर्गाच्या समाजांत आपणांस गोडी राखून वागतां यावें म्हणून लोकांचें खरें मत योग्य प्रसंगीं प्रदर्शित करण्याचें धैर्य नाहीं ज्यांच्या आंगीं, ते लोकांचे पुढारी असून नसून सारखेच, किंबहुना असल्या नरम पुढाऱ्यांमुळें लोकांच्या फायद्यापेक्षां त्यांचें नुकसान झाले आहे असें म्हटलें तरी चालेल.**" (युगपुरुष टिळक) आजची परिस्थिति नेमकी अशीच आहे. स्वातंत्र्य मिळाल्यावर आपण सुखी होऊं, समाधानी राहूं अशी पुष्कळांची भावना होती. आज त्या भावनेला जोराचा धक्का बसला आहे. जो तो आपल्यापरी हवालदिल झाला आहे. **स्वातंत्र्याचीं पांच वर्षें तर रडत खरडत निघून गेलीं.** यापुढच्या पांच वर्षांत आपल्यासमोर दैवानें काय काय वाढून ठेवलें आहे; **ग्रहांची पंचवार्षिक योजना काय**, याच संभ्रमांत तरुण काय, वृद्ध काय आणि मुलें काय, आज गढलेलीं आहेत.

**दैव व वाद केव्हां जागा होतो?** ज्या वेळीं मनुष्याच्या प्रयत्नवादाचीं क्षितिजें संपुष्टांत येतात, बुद्धिमत्ता कुंठित होते, कांहींच सुचत नाहीं, अशी स्थिति होते, त्या वेळीं मनुष्य देव-दैव यांच्या पाठीस हात धुवून लागतो. यांपैकीं अगोदर कोण हें न उलगडणारें कोडें असलें तरी मनुष्य आपल्या समाधानासाठीं नेहमींच धडपडतो. ज्योतिषशास्त्रावर टीका करणारे लोक या गोष्टीचा मुळींच विचार करीत नाहींत. विशेषतः कांहीं **वकील लेखकांची वक्रदृष्टि अलीकडे ज्योतिषावर विशेष वळलेली दिसते.** कदाचित् वकिली नीट न चालल्यामुळेंहि सवड्या वेळांत हें लेखन होत नसेलच असें म्हणवत नाहीं. **आपल्याला अप्रिय असलेली प्रत्येक बाब कायद्यानें बंद झाली पाहिजे,** असें म्हणतांना जो तो हल्लीं आढळतो; अशा वेळीं आपला तो बाब्या व इतरांचा कार्टा! हीच भावना या लोकांची असते. '**भोंदुगिरी**' कशांत नाहीं? **जगांतील** अर्धी अधिक भांडणें वकिली डावपेंचांमुळें निर्माण होतात, असें माझा एक मित्र नेहमीं म्हणतो. कारण त्याच्या आयुष्यांत ज्योतिष्यापेक्षां वकीलच अधिक नडीस आली! **आज प्रतिष्ठितपणें चालणारा डॉक्टरीचा धंदा?**—प्रत्यक्ष प्राणाशीं गांठ! पण त्याबरोबर खेळ खेळणारे कांहीं डॉक्टर सांपडतातच कीं नाहीं?—"**दिशाभूल?**"—आजचे पुढारी जनतेसमोर तयार करतात तो 'पदार्थ' याहून वेगळा असेल काय?—आज जर जनता दैववादी, प्रज्ञाहत आणि दुबळी कशानें अधिक बनली असेल तर ती आजच्या पुढाऱ्यांच्या धरसोडीच्या धोरणामुळें होय. "**दैवं संप्रेरयति मामिति दग्धधियां मुखम्। अदृष्ट श्रेष्ट दृष्टांनं दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते ॥**" (श्रीयोगवासिष्ठ)

'मला दैव प्रेरणा करीत आहे,' असें म्हणणाऱ्या लोकांची बुद्धि होरपळून गेली आहे असें समजावें. ज्याच्या दृष्टीला दैवच श्रेष्ठ आहे असें वाटतें, अशा लोकांचें तोंड दिसल्याबरोबर लक्ष्मी त्याच्याकडे पाठ करते. "**आंतला आवाज**" असें कायसेंसें अलीकडे म्हटलें जातें तें यांतच येत नाहीं काय?—**आणि म्हणून** मी पुढील पांच वर्षांचा पडताळा ज्योतिषशास्त्राला स्मरून लिहीत आहें. अर्थात् तो स्थूल आहे. आजच्या राज्यकारभारांत ज्योतिष्याला निर्भीडपणें ज्योतिष वर्तविणें हेंसुद्धां किती कठीण कर्म आहे हें मी कांहीं सांगावयास नको. तेवढ्याचमुळें एखाद्या प्रमुखाचा 'पित्तप्रकोप' व्हावयाचा आणि नसती 'आफत' त्याच्यावर यावयाची. 'फट्' म्हणतां ब्रह्महत्त्या व्हावयाची आणि दुसऱ्यांचे ग्रह सांगतां सांगतां स्वतःचे ग्रह पहाण्याची पाळी निर्माण व्हावयाची.

**गेल्या १५ ऑगस्ट १९५२ ला** आपल्या या स्वातंत्र्यानें ५ व्या वर्षांतून सहाव्या वर्षांत पदार्पण केलें. **सहावें वर्ष** हें शत्रुस्थानीं बसणारें असून त्या वेळच्या कुंडलीनुसार त्या ठिकाणीं **तुळा राशींत गुरु आहे.** तुळा राशि ही शुक्राची राशि असून गुरूचा शुक्र हा शत्रु आहे. शुक्राचा **गुरु 'सम'** म्हणजे शत्रूहि नाहीं आणि मित्रहि नाहीं असें समजतात. गुरु आणि शुक्र हे दोन्ही शुभग्रह मानण्यांत आले आहेत. **गुरु हा देवांचा गुरु; तर शुक्र हा**

दैत्यांचा गुरु ! ता, १४।१५ ऑगस्ट रात्रौ १२ वाजून १ मि. (सन १९४७) या वेळाची कुंडली आणि ह्या कुंडलीवरून पुढील पंच वर्षांत ( सन १९५३ ते १९५७ अखेर ) भ्रमण करणारे ग्रह, त्यांचे मूळ कुंडलींतील ग्रहांशीं होणारे शुभाशुभयोग यांचा विचार प्रामुख्यानें मीं या भविष्याच्या मुळाशीं केला आहे. माझे मित्र के. काटवे यांनीं तर या कुंडलीच्या बारा सदरांत ज्या वेगवेगळ्या व्यक्तींचा उल्लेख केला आहे तो तर फार गंमतीचाच म्हणावा लागेल ! **स्वातंत्र्य कुण्डली ही** ( म्हणजे सत्ताहस्तांतर ) वृषभ लग्नाची असून तिची राशि '**कर्क**' आहे. **या स्वातंत्र्यकुंडलींत** लग्नी राहू, द्वितीयांत **मंगळ-हर्शल** ( मिथुन राशींत ), **तृतीयांत** ( कर्क-राशींत ) **रवि, चन्द्र, बुध, शुक्र, शनि** असे पांच ग्रहचर राशींत आहेत. पंचमांत ( कन्या-राशींत ) नेपच्यून; षष्ठांत रिपुस्थानीं गुरु ( तुळा राशींत ) ! सप्तमांत केतु वृश्चिक राशींत ! येणें-प्रमाणें ग्रहस्थिति आहे. **के. काटवे** यांनीं तनुस्थानीं, महात्माजी, नेहरूजी आणि गव्हर्नर जनरल, **धनस्थानीं** ( जेथें मंगळ व हर्शल आहेत ) डॉ. राजेंद्रप्रसाद व डॉ. आंबेडकर यांची योजना केली होती. तृतीयांत ( पराक्रमस्थानीं ) डॉ. जॉन मथाई, भाई जगजीवनराम ! चतुर्थांत सिंहराशींत वल्लभभाई ( के. सी. नियोगी ), पंचमांत ( विद्यास्थानीं ) आझाद ! **षष्ठांत रिपुस्थानीं** श्रीमति अमृत कौर, जीना हिंदुमहासभा, पाकिस्तान आणि कम्युनिस्टांची कल्पना केली आहे. **सप्तमांत** डॉ. मुखर्जी-मनु सुभेदार ! अष्टमांत मृत्युस्थानीं काकासाहेब गाडगीळ आणि सरदार बलदेवसिंग, **नवमांत धर्मस्थानीं** रफी अहमद् किडवाई ! **दशमांत कर्मस्थानीं** जयप्रकाश नारायण कुंभ-राशींत ! **लाभांत मित्रस्थानीं** सर षण्मुखम् चेट्टी, गोपाळस्वामी अय्यंगार ही दुक्कल बसविली असून व्ययांत मेषराशींत नेताजी-भाभा यांची वर्णी लाविली आहे. अर्थात् हे सर्व त्या वेळच्या परिस्थित्यनुरूप कल्पिलेलें असलें तरी गेल्या पांच वर्षांचा विचार करतां त्यांत अगदींच कांहीं तथ्य नसेल असें म्हणवत नाहीं. मी सर्वस्वीं जरी या कल्पनेशीं सहमत नसलों तरी **स्वातंत्र्याच्या या सहाव्या वर्षांत** शत्रुभय जरूर दिसतें. **पाकिस्तान, काश्मीर, कम्युनिस्ट** हे प्रश्न फारच ज़ोर करतील आणि विशेषतः या वर्षांत पुढारी-पुढारी वर्गांत जोराचीं भांडणें होतील. फितुरी ! अंतर्गत आणि परदेशाचा व्यापार, परराष्ट्रव्यापार-

मंत्री, अंतर्गत व्यापारमंत्री, देशांत चालणारीं नाणीं, बँका, अर्थमंत्री, रेल्वेमंत्री, मोटर्स वगैरेंचा कारक शुक्र. असून **परराष्ट्रीय राजकारण,** आमचे परराष्ट्रीय वकील, वकिलाती, शिक्षण-खातें, देशाचें आरोग्य, आरोग्यमंत्री-परराष्ट्रमंत्री, शिक्षणमंत्री, हायकोर्ट, हिंदुमहासभा यांचें कारकत्व राष्ट्रविषयक भविष्यांत गुरूकडे देण्यांत आलें आहे.

**गेल्या पांच वर्षांत स्वातंत्र्याचें** सुंदर फळ पदरांत पडूनहि जो गोंधळ झाला त्याला कारण 'हिरा' खरा पण त्याला 'कोंदण' चांगलें मिळालें नाहीं अशा स्वरूपाचें म्हणावें लागेल. **यापुढील पांच वर्षांत तीन वेळां मिळून क्रांतिकाल दिसतो.** पण या क्रांतींतून मात्र चिरकाल लाभणारी शांति प्राप्त होईल अशी मला खात्री वाटते. देशांतील आजचे गोंधळ आणि ते निर्माण करणारीं माणसें या पांच वर्षांत बाजूला पडतील अगर नष्ट तरी होतील! प्रखर धोरण आणि निश्चित योजना यांचा तुटवडा आज किती जरी भासत असला तरी या पुढच्या पांच वर्षांत लायक माणसें लायक ठिकाणीं येऊन राज्य-कारभाराचा गाडा सुरळीत चालण्यास मदतच होईल! **शिक्षणखात्यांत माजलेले** पेंचप्रसंग नाहींसे होतील. योग्य माणसाच्या नेतृत्वाखालीं शिक्षणखातें येईल. आणि असा योग सन १९५३ सालच्या **ऑगस्टअखेरीस येईल!**

**या वर्षीं जान्युआरी ते जुलै अखेरीपर्यंत** (१९५३) पाकिस्तान, कम्युनिस्ट व काश्मीरप्रकरण विकोपास जाईल कीं काय असा संभव वाटतो. पंचमस्तंभियांचे चाळे, आज मित्रत्वाचें सोंग करणारे काश्मीरप्रमुख नेते भारताशीं अप्रामाणिकपणा करण्याचा—विश्वासघात करण्याचा दाट संभव! वर लिहिलेल्या तीन क्रांतिकालांपैकीं पहिला हा अशा या नव्या चुणुकीचा आहे. "**फंदफितुरी**" नेंच भारत (हिंदुस्थान) परतंत्र बनला होता. तीच फंदफितुरी परत डोकें वर काढते कीं काय अशी तीव्र भीति मला वाटते. आणि अगदीं याच वेळीं एखाद्या प्रमुख नेत्याच्या जीवितास नेमका धोका पोंचण्याचा योगायोग दिसतो. आणि त्यामुळें थोडा वेळ बेबंदशाही माजण्याची शक्यता आहे. **एकंदरींत येत्या पांच वर्षांत भारताला अंतर्गत शत्रूंचें जितकें भय आहे तितकें बाह्य शत्रूंचें नाहीं. काँग्रेसला सांप्रत शनीची साडेसाती सुरू आहे.** हिंदुस्थान राष्ट्रीय सभेची ऊर्फ काँग्रेसची स्थापनाराशि '**मीन**' (ता. २८ डिसेंबर सन १८८५ दिवसा १२ वाजतां) म्हणजे लग्न '**मीन**' व राशि '**कन्या**' आहे. तिच्या चतुर्थांत **शनि** मिथुन राशींत असून समोर दशमांत रवि-बुध! व्ययांत शुक्र-केतु, षष्ठांत सिंह राशींत राहु म्हणजे रवीच्या घरीं. रवि-राहु परस्पर शत्रु आहेत. **सप्तमांत** कन्या राशींत चंद्र, मंगळ, गुरु, हर्शल असून तृतीयांत नेपच्यून वृषभ राशींत! गेलीं २॥ वर्षें **शनि** काँग्रेसच्या कुंडलीच्या सप्तमस्थानामधून भ्रमण करीत होता. चंद्र, मंगळ, गुरु, हर्शलवरून होणारें हें भ्रमण काँग्रेसच्या अंतर्गत एकजुटीला कसें सुरुंग लावणारें ठरलें हें कांहीं मी सांगावयास नको.

**यापुढच्या पांच वर्षांत** शनि तुळा व वृश्चिक राशींत मिळून घुटमळत राहाणार! म्हणजे पैकीं **काँग्रेसच्या कुंडलीच्या अष्टमस्थानामधून** तुळेचा हा शनि भ्रमण करणार आणि अष्टम-स्थान हें मृत्युस्थान मानण्यांत येतें. **शनि** या कायदा मजूर, कायदेमंत्री, मजूरपक्ष, मजूरमंत्री, महान् शक्तिशाली आणि दैवीप्रभावी व्यक्ती यांचा कारक आहे. एकंदरींत या गोष्टी या कालांत काळजीच्या ठरतील! **काँग्रेसच्या पाठीमागची शनीची साडेसाती** १९५५ च्या नोव्हेंबर अखेरपर्यंत सुटेल; परंतु तोंपर्यंतच्या काळांत तिला अनेक दिव्यांतून जावें लागेल; मनुष्यहानि अतिशय होईल! विशेषतः **३० मार्च १९५४ ते ता. २ ऑक्टोबर सन १९५४** हा या पांच वर्षांतील **दुसरा क्रांतिकाल** आहे. आणि **तिसरा क्रांतिकाल** सन १९५७ सेप्टेंबर ते डिसेंबर अखेरपर्यंतचा ठरेल.

एकंदरींत **या पांच वर्षांत महाराष्ट्र मात्र** भलताच उदयास येईल! **महाराष्ट्रांतील** विद्वान् माणसें प्रमुख पदीं विराजमान होतील! महाराष्ट्राच्या मारेकऱ्यांचा नाश होईल; महाराष्ट्राची सर्वांगीण उन्नति होईल. महाराष्ट्राची सांपत्तिक परिस्थितीहि सुधारेल. महाराष्ट्रासाठीं आंखलेल्या विकास योजना या पांच वर्षांत प्रत्यक्ष अमलांत आणल्या जातील. तशा अभिमानाचीं माणसें तयार होतील! **मंगळाची परिस्थिति** सन १९५४ **एप्रिल ते सेप्टेंबर अखेरपर्यंत** ठीक दिसत नाहीं. सर सेनापति, राष्ट्राची फौज, पोलीस खातें, संरक्षण मंत्री, उघड शत्रू, पाकिस्तान, एंजिनियरिंग डिपार्टमेंट, क्रिमिनल डिपार्टमेंट, पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट, ए. आर. पी. वगैरेंचा कारक मंगळ आहे. वरील काळांत या बाबींना कांहीं गौणत्व व नुकसानीचे योग येतील. पुढील पांच वर्षांत हर्शल कर्केंतून व नेपच्यून तुळेंतून भ्रमण करील: संप, कॉलरा, प्लेग, इन्फ्लुएंझा, आफ्रिडी झुंड, पठाणीस्तान वझीरीस्तान, चित्रळ, लढाया, विलक्षण अपघात, धरणीकंप, उध्वस्त प्रदेश इत्यादि बाबींवर हर्शलचें कारकत्व असल्यामुळें या पांच वर्षांत हे प्रकार अधून मधून अनुभवास येतीलच. कारण हा हर्शल स्वातंत्र्य कुंडलीच्या तृतीय-स्थानांतील रवि, चंद्र, शनि, शुक्र, बुध या पंच-ग्रहांवरून भ्रमण करणारा आहे. **पंडित जवाहरलाल नेहरू** यांची जन्म**राशि कर्क** असून त्या ठिकाणीं हा हर्शल राहाणार आहे. नेपच्यून हा धार्मिक झगड्यांचा कारक आहे. तोहि या वेळीं तुळा राशींत असेल; म्हणजे पंडितजींच्या राशीच्या सुखस्थानीं मूळ रवि-बुध-शुक्र-हर्शलवर!

**विक्रमसंवत्** २००९ क्रोधी नाम संवत्सरे. ता. १९ ऑक्टोबर सन १९५२ पासून सुरू होणारें. ग्रहदृष्ट्या या वर्षाची एकंदर हालचाल पहातां हें वर्ष एकंदरींत बरेंचसें उलाढालींचें दिसतें. हें वर्ष विशेषतः पं. नेहरूजी, डॉ. राजेंद्रप्रसाद, डॉ. आंबेडकर, चक्रवर्ति राज-गोपालाचारी, पंतप्रधान मुरारजीभाई देसाई, मुनशी, बाळासाहेब खेर, मौ. आझाद व सावरकर विनायक दामोदर वगैरे लोकांच्या शरीरप्रकृतींना क्लेशकारक दिसतें. तरी त्यांच्या प्रकृतीला जपावें.

तत्संबंधीय लोकांनीं ईश्वराची आराधना करावी. **या वर्षी** एकदां नियंत्रणें दिलीं करून तीं परत बदलिलीं जातील. राज्यकारभारांत गोंधळाचें व गडबडीचें असें हें चालू वर्ष राहील; क्रोधाचे प्रकार फार वाढतील ! श्री. स. का. पाटील व काकासाहेब गाडगीळ यांची या वर्षी राजकारणांत एकंदरींत चरशी होईल ! मोक्याच्या जागांवर त्यांची नेमणूक होईल; परंतु त्यांनीं वाहनांतून ( कोणत्याहि ) प्रवास करतेसमयीं या वर्षी जपावें.

**एकंदरींत महाराष्ट्रियन माणसें** यापुढील पांच वर्षांत फारच महत्त्वास येतील. महाराष्ट्राची राशि धनु आहे. **शके १८७८ दुर्मुखनाम संवत्सरे.** पौष शुद्ध प्रतिपदा मंगळवार ता. १ जान्युअरी १९५७ सालास सुरुवात होते. **एकंदरींत** यापुढील पांच वर्षांच्या ग्रहपरिस्थितीची आंकडेमोड करतां ती भारतवर्षास एकंदरींत हानिकारक नाहीं; उलट पुष्कळशा बाबतींत शिकवून सुधरविणारी अशीच आहे. या पांच वर्षांत सरदार, सावकार, संस्थानिक, जमीनदार, मधूनमधून नडीस येतील. 'उठाव' करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला जाईल. ज्यांच्या कर्मांचीं फळें त्यांचीं त्यांस मिळतील, **योग्य लोकांच्या हातीं सत्ता नांदेल !** या पांच वर्षांत भारत देशाची आजची अन्नान्नदशा खचित दूर होईल; लोकांतला निरुत्साह नाहींसा होईल. तात्पर्य, 'कश्मल' खाक होऊन या पांच वर्षांत भारताचें 'सुवर्ण' परत तेजानें तळपेल. **आकाशांतील ग्रहांप्रमाणेंच राजकीय अंतरिक्षांतील ग्रहांची उच्चनीच दशा ही आमच्या ताब्यांतील गोष्ट नव्हे.** पण एवढ्याकरितां ज्योतिषशास्त्रांतील ग्रहस्थितीचा फलविचार करण्याचें ज्याप्रमाणें आपण सोडून देत नाहीं त्याचप्रमाणें **राजकीय ग्रहांचाहि विचार केला पाहिजे.** ज्योतिषामध्यें जसे योग असतात तसे इतिहासांत, राजकारणांतहि असतात. **प्रबल व दुर्बल** यांची **स्पर्धा लागली असतां,** बलिष्ठानें आपल्या पोळीवर सगळें तूप ओढून घ्यावें, हा प्रकार जगाचे आरंभापासून चालत आला आहे व तो खासगी व्यवहारांत व **राजकीय बाबतींत** सारखाच दृष्टोत्पत्तीस येतो.

"**अरक्षितारं हर्तारं विलोप्तारमनायकम् । तं वै राजकलिं हन्युः प्रजाः सं न ह्य निर्घृणम् ॥**" (श्रीमहाभारत) प्रजेचें रक्षण न करतां तिजपासून जो कर घेतो, व प्रजेला सन्मार्गाला न लावितां जो लुबाडतो तो राजरूपी कलि प्रजेनें सज्ज होऊन निष्ठुरपणें निर्दाळावा. "**यावद्भ्रियेत जठरं तावत्स्वत्वं हि देहिनाम् । अधिकं योऽभिमन्येत सस्तेनो दण्डमर्हति ॥**" (श्रीभागवत) आपलें पोट भरण्यास जितकें अन्न लागेल, तितकेंच अन्न खरोखर आपलें आहे असें म्हणतां येईल. त्यापेक्षां अधिकावर जो आसक्ति ठेवतो, तो केवळ चोर होय. तो दंडाला पात्र होतो. पूर्वींचे लोक या भावनेचे होते म्हणून सुखी होते. आज आपल्याच्यांत ती भावना नाहीं. आणि यापुढच्या पांच वर्षांत तर स्वार्थांचीं क्षितिजें एवढीं विस्तृत होतील कीं जे प्रकार आतांपर्यंत घडले नाहींत असे अघोरी प्रकार यापुढच्या पांच वर्षांत घडतील. एकंदरींत आपल्यास परमेश्वरकृपेनें स्वातंत्र्य मिळालें असलें तरी त्याचें संरक्षण करण्याची खरी जबाबदारी यापुढील पांच वर्षांतच आपल्यावर आहे असें मी या पुढच्या ग्रहपरिस्थितीच्या अनुरोधानें नम्रपणें सुचवूं इच्छितों.

**कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् । इति ते संशयो माभूद्राजा कालस्य कारणम् ॥** (श्रीमहाभारत) भीष्म युधिष्ठिराला म्हणतात, "काळ राजाला कारण होतो का राजा काळाला कारण होतो, याविषयीं तूं संशयांत पडूं नको. **राजा हाच काळाला कारण आहे.**" राज्याची उलथापालथ करण्याची शक्ति ज्याचे अंगांत आहे अशा पुरुषांवर राजाची वक्रदृष्टि असावयाचीच. '**राजाचें पाप राष्ट्राला भोक्तें.**' (युगपुरुष व्लिक)

**कल्याण करी देवराया । जनहित विवरी ॥ तळमळ तळमळ होतचि आहे । हे जन हातिं धरी । अपराधी जन चुकताचि गेले । तुझा तूं सावरी ॥ कठिण त्यावरी कठिण जाले । आतां न दिसे उरीं । कोठें जावें काय करावें । आरंभली वोहरी ॥ दास म्हणे आम्हीं केलें पावलों । दयेसी नाहीं सरी ॥**

(वोहरी—नाश. श्रीसमर्थ. राग :-दीप.) अशी प्रार्थना करण्यापलीकडे सध्यांच्या दिवसांत आपल्या तरी हातांत काय आहे ? तथापि यापुढील पांच वर्षांत वर लिहिलेलीं सर्व सुभाषितें विचारवंतांनीं खासच विचारांत घेण्यासारखीं आहेत. त्यांतूनच तरणोपाय निघेल !

**जय महाराष्ट्र ! जय शिवराय !**

**जय लोकमान्य !**

**॥ शुभम् भवतु ॥**



असा आहे हा
आमच्याकडचा ऋतुराज मेघ.
नटराजाप्रमाणें
त्याचें तांडव सुरू होतें तेव्हां—

# आषाढस्य प्रथम दिवसे....

## बा. भ. बोरकर

"कविवर्य ! एकादी नवी कविता सुनवा ना आम्हांला. वेळसुद्धां कशी नामी आहे. किती छान पाऊस पडतो आहे बाहेर." माझ्याकडे आलेल्या स्नेह्यांपैकीं एकानें विनंति केली.

"या इतक्या दिवसांत एक देखील कविता कशी ती झाली नाहीं लिहून. या तुमच्या पावसानं आपली तर प्रतिभा पार गारठून गेलीय बुवा." शरण आल्यासारखा होऊन मीं उत्तर दिलें.

"या पावसानं ?" अशा शब्दांनीं त्यानें आश्चर्य व्यक्त केलें आणि मग तो म्हणाला, "आमचा हा पुण्याचा पाऊस म्हणजे होम वेदर आहे, आणि होम म्हणजे काय सांगा बघूं ? इंग्रजी शाळेंतल्या मास्तरांनीं आम्हांला घोकायला सांगितलें होतें.—होम म्हणजे इंग्लंड, होम म्हणजे इंग्लंड."

"तुम्हां पुण्याच्या लोकांच्या दृष्टीनें ही होम वेदर आहे. त्यांत तुम्हांला काव्य दिसतं आणि तुमच्यांतलं काव्य झिरपूं लागतं हें आपल्याला एकदम कबूल. पण आपलं होम म्हणजे कोंकण. आपलं काव्य खरं ओसंडूं लागतं तें तसल्या पावसांत. काय पण थाट असतो आमच्या कोंकणांतल्या पावसाचा !"

माझ्या या उत्तरानें त्या स्नेह्याचें कितपत समाधान झालें हें त्याचें त्याला माहीत. पण मीं बोललों तें अक्षरशः खरें आहे. या पुण्याच्या पावसाची ही पिरपिर अशी चालू झाली कीं मी अकारण खिन्न होतों. माझ्या कल्पनेचीं पिसें भिजून जड होतात आणि ती बापुडवाणी होऊन बसते. भावनेची सगळी प्रसन्नता कुठल्या कुठें मावळते आणि तिचा कंठ तिथल्या तिथें गोठून जातो. पडशाखोकल्यांच्या, अपुऱ्या रेशनच्या किंवा असल्याच एकाद्या क्षुद्र दुःखाच्या तक्रारींची कंटाळवाणी लांबण ऐकतां ऐकतां मन जसें नकळत पडत जावें तसेंच कांहीं तरी या असल्या पावसांत मला होऊं लागतें. माझी मनःस्थिति 'लंडनचा चंद्र' कविता लिहिणाऱ्या त्या पोर्तुगीज कवीसारखी होते.

इंग्लंडमध्यें असतांना त्यानें ही कविता लिहिली आहे. शिशासारख्या म्लान आकाशांत ढगांमुळें हतबुद्ध झालेला चंद्र पाहून त्याला वाटतें, तोहि आपल्याप्रमाणेंच विरहानें व्यथित झालेला आहे, उदास होऊन उसासे टाकीत आहे. आपण आपल्या मायभूमींत पाहिलेल्या त्या प्रसन्न चंद्राची ही दशा त्याच्यानें बघवत नाहीं. तो गुणगुणूं लागतो—

> गेला गमे रजतरंग पुरा गळोनी
> पाही जळीं नच मुळींहि जरा वळोनी
> चुंबून घे न कुणीं हसऱ्या-फुलांना
> आणी सवें न सुकुमारहि तारकांना
> हर्षे कथी स्मरगुजें न च सुंदरींना
> किंवा युवां स्मरकथा बहुरूप नाना...

त्याची ही अशी केविलवाणी स्थिति व्हायला तो आपल्या खऱ्या घराला म्हणजे पुर्तुगालला मुकला आहे असें त्याला वाटतें आणि मग स्वतःची खात्री करून घेण्यासाठीं तो त्यालाच विचारतो—

> सुद्रोणपुष्पलतिका फुलतात जेथें
> गाती सदा स्फटिक निर्झर जेथ गीतें
> त्या पुर्तुगाल मधुदेशगिरिप्रदेशीं
> कां तूं सख्या हरविल्यास प्रकाशराशी ?

आणि असे प्रश्न विचारतां विचारतां आपल्या मायभूमींतल्या निरभ्र, निर्मल चांदण्यांतलें सगळें ऐश्वर्य आणि लावण्य त्याच्या मनःचक्षूंसमोर उलगडूं लागतें. त्याच्या तुलनेनें लंडन शहराचें जगांतलें वैभव त्याला फिकें वाटूं लागतें. हें वैभव आणि तें ऐश्वर्य यांमधली तफावत त्याला तीव्रतेनें जाणवूं लागते. आणि तो म्हणतो—

लिहीत होते. तेव्हांचीं नेमस्त पक्षांचीं पत्रें सरकारची बाजू घेऊन लिहीत; आणि राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनीं चालवलेल्या प्रचाराचा तीं उपहास करीत. उपहासाला जर रुचि यावयास हवी असली तर ज्याची टर उडवावयाची त्याचें करणें स्वतःच्या बोलण्यासारखें नसतें, असें दाखवतां आलें तर फारच चांगलें काम होतें. मुंबईच्या तेव्हांच्या एका पत्रिकेनें टिळकांच्या विरुद्ध लिहिण्याचा विडाच उचललेला होता. परीक्षेच्या निकालाचें हें घबाड आपल्याला सांपडलें, असें संपादकांना वाटलें आणि त्यांनीं आपल्या प्रिय वाचकांना कळविलें कीं: "हे टिळक कसे बोलघेवडे आहेत पहा. राष्ट्रीय शिक्षणाचा हे मोठा आरडाओरड करतात; पण यांनीं आपला मुलगा मात्र मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेला बसवला. यांचें ब्रह्मज्ञान लोकांना सांगावयापुरतेंच आहे..." दत्तात्रय बळवंत टिळक यांतील 'बळवंत' आणि 'टिळक' हीं दोन्ही नांवें संपादकांना ओळखीचीं होतीं; आणि त्यांनीं अनुमान केलें, कीं, हा 'दत्तात्रय' बळवंतराव टिळकांचाच मुलगा असला पाहिजे. अर्थात् येवढा आधार मिळाल्यावर टिळकांच्या शब्दांत आणि प्रत्यक्ष कृतींत केवढी विसंगति आहे हें दाखवण्याचा मोह त्यांना कसा बरें आवरला



असेल ? पुढें कदाचित् दुरुस्ती झालीहि असेल, पण दुरुस्तीच्या अंकानें मूळचा अंक मरत नाहीं. हें आपण पाहिलेंच आहे. समकालीन पुरावा कसा उत्पन्न होतो तो पहा !

एके दिवशीं अत्रे आणि खांडेकर असे दोघे माझ्याकडे आले. या वेळीं त्यांची 'झुणका-भाकर' मोहीम चालू होती. अस्पृश्यतानिवारण या विषयाचा आणि माझा फार वर्षांचा आणि निकटचा संबंध असल्यामुळें याला आपल्या या मोहिमेंत सामील करून घ्यावें, अशी त्यांची इच्छा होती. अपेक्षेप्रमाणें पुष्कळच विनोदाचें बोलणें झालें; आणि त्या उभयतांनीं, भारत-सेवक समाजाच्या बाजूला कोठें तरी सहभोजन होणार होतें, त्या भोजनाला मीं यावें, असा आग्रह केला. अस्पृश्यता-निवारणाच्या माझ्या कांहीं कल्पना होत्या; आणि त्या अंमलांत आणण्यासाठीं मी अनेक वर्षे झटत होतों. त्या माझ्या प्रयत्नांशीं ही मोहीम मला सुसंगत वाटली नाहीं; आणि म्हणून मीं येण्याचें नाकारलें. अर्थात् आणखी थोडा हास्य-विनोद होऊन आमचे हे उभयतां स्नेही पुढल्या प्रचाराला निघून गेले. मीं त्यांना एवढेंच सांगितलें होतें कीं, "मी तुमच्या या समारंभाला येणार नाहीं." आणि त्यांनींहि त्याचा एवढासा बाऊ केला नाहीं. पण वर्तमानपत्रांना कांहींना कांहीं खावडाव हवी असते; आणि त्यांनीं या प्रकरणाचा माझ्या बदनामीसाठीं फायदा घेतला. मुंबईला कोणतें तरी एक इंग्रजी वर्तमानपत्र तेव्हां होतें; आणि रा. पर्वते हे त्याचे संपादक होते. या पत्रांत लवकरच अशी बातमी प्रसिद्ध झाली कीं, "माटे हे बरोबर एक चांगलें दांडगें पथक घेऊन या समारंभावर चाल करून जाणार आहेत." ही बातमी वाचून लोकांना चमत्कार वाटला असेल; आणि कोणी कोणी तर मला दोषहि दिला असेल. पण या बातमींत बालागरहि खरें नव्हतें. पांच सहा दिवसांनीं या पत्रांत आलेली ही बातमी मला कोणी तरी सांगितली. मीहि थक्क होऊन गेलों; आणि प्रत्यक्ष काय घडलें तें पाहून लोकांची आपोआपच खात्री झाली असेल, असें मनांत आणून मी गप्प राहिलों. कांहीं महिन्यांनीं संपादकांची आणि माझी गांठ पडली. तेव्हां मीं त्यांना याचा जाब विचारला. ते म्हणाले कीं, ×××× यांनीं आमच्याकडे ही बातमी धाडली म्हणून आम्हीं ती छापली. हे गृहस्थ तेव्हां बातमीदाराचा धंदा करीत असत; आणि अर्थात् तो चांगला चालावयचा तर, सत्यासत्याची चाड ठेवणें त्यांना

कठीण जात असलें पाहिजे. आतां मीं वर सांगितलेंच आहे कीं, या बातमींत सत्याचा अंशहि नव्हता. तथापि समकालीन पुरावा म्हणून कोणी एखादा चौकस संशोधक पुढें पाठीमागें माझ्यासंबंधानें लिहितांना या बातमीचा उपयोग कदाचित् करीलहि !

आतां एका ग्रंथकर्त्यानीं उत्पन्न केलेला अत्यंत मनोरंजक समकालीन पुरावा पहा. मुंबईचे श्री. खानोलकर यांनीं आधुनिक लेखकांच्या चरित्रांचीं पुस्तकें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं एकांत वि. ह. कुलकर्णी यांनीं लिहिलेलें कै. अच्युतराव कोल्हटकर यांचें चरित्र आलें आहे. यांत खालील माहिती दिली आहे.

"१९०७ सालच्या सुरतेच्या राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळींत जी क्रांति घडवून आणली, तितकीच, किंबहुना त्याहूनहि क्रांति तिनें अच्युतरावांच्या आयुष्यांत घडवून आणली. या सभेमुळें जहाल व नेमस्त यांमधील मतभेद विकोपाला जाऊन त्यांचें वैमनस्य दुणावलें. अच्युतरावांचे वडील रा. ब. वामनराव कोल्हटकर मवाळाग्रणी असून टिळकांविषयीं त्यांचे मनांत विलक्षण अढी होती. वामनराव जितके मवाळ तितकेच त्यांचे चिरंजीव अच्युतराव जहाल ! त्यामुळें जहाल-मवाळांच्या तत्वांतून उपस्थित झालेलें या पितापुत्रांतील द्वंद्वयुद्ध परशुराम आणि राम यांमधील द्वंद्वयुद्धाइतकेंच प्रेक्षणीय झालें. या वाग्युद्धांत अच्युतराव यांनीं वडलांची कांहींच भीडमुर्वत ठेवली नाहीं; एवढेंच नव्हे तर रामाला वनवासास पाठवल्याबद्दल कैकयीला आई म्हणावयास तयार नसलेल्या भरताप्रमाणें अच्युतरावांनीं आपल्या वडलांची निर्भर्त्सना करून, त्यांना पिता म्हणावयाचेंहि नाकारलें व बळवंताला पितृस्थानीं समजून, तेव्हांपासून ते अच्युत बळवंत कोल्हटकर या नांवानें प्रसिद्धीस आले. तथापि पितृनामत्यागाचें हें पातक अच्युतराव यांना लवकरच भोवलें ! १९०८ सालीं सरकारची राष्ट्रीय पक्षावर वक्रदृष्टि होऊन टिळकांना सहा वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा झाली; व टिळकांना गुरुस्थानीं मानणाऱ्या अच्युतरावांनाहि राजद्रोहाच्या आरोपावरून १॥। वर्षांची सजा होऊन त्यांची कैदखान्यांत रवानगी करण्यांत आली."

वरील परिच्छेदांत रामाचा वनवास, कैकयी, इत्यादि प्रकारनें कुलकर्णी यांनीं लिहिलेलें वाङ्मय



अनुक्रमणिका

अगदीं फुकट आहे. वडिलांना पिता म्हणण्याचें अच्युतरावांनीं कधींहि नाकारलें नाहीं. 'बळवंता'ला त्यांनीं कधींहि पितृस्थानीं मानलें नाहीं. आणि या द्वंद्वयुद्धापासून अच्युत 'बळवंत' कोल्हटकर या नांवानें ते प्रसिद्धीस आले हेंहि अक्षरशः चूक आहे. अच्युतराव केवढेहि देशभक्त असले आणि आपल्या मताचे आग्रही असले तरी बापाला बाप म्हणावयाचें नाहीं, असला मूर्खपणा त्यांच्या हातून कधींहि होण्यासारखा नव्हता. अच्युतराव हे अतिशय विनयशील गृहस्थ होते. त्यांनीं वडलांची निर्भर्त्सना केली नाहीं, इतकेंच नव्हे तर वडिलांनीं तासभर केलेली आपली निर्भर्त्सना मुकाट्यानें ऐकून घेतली, हें मला पक्कें माहीत आहे. श्री. कुलकर्णी यांच्या लिहिण्यांत अशी एक गृहीत गोष्ट आहे कीं, गोंड वनांत पिता-पुत्रांचें हें द्वंद्वयुद्ध होण्याच्या आधीं अच्युतराव आपलें नांव अच्युत वामन कोल्हटकर असें लिहीत होते. पण कुळकर्णी यांची ही गृहीत कल्पनाच साफ चूक आहे. साताऱ्याहून नागपूरला जाण्याच्या आधीं, म्हणजे 'परशुराम आणि राम' यांचा कुलकर्ण्यांनीं रंगवलेला संग्राम होण्याच्या पुष्कळ आधीं, अच्युतराव साताऱ्यांतील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षक होते. माझ्यासारख्या तेव्हांच्या त्यांच्या विद्यार्थ्यांना हें ठास माहीत आहे कीं, ते आपली सही अच्युत बळवंत कोल्हटकर अशी करीत असत. याच्याहि आधीं ते हीच सही करीत हें त्यांच्या साताऱ्यांतील नातेवाइकांना माहीत आहे. बळवंत हें नांव त्यांच्या चुलत्याचें होतें व अच्युतराव चुलत्याला दत्तक गेलेले होते. म्हणून ते अच्युत बळवंत कोल्हटकर अशी सही करीत. यांत नागपूरच्या द्वंद्वयुद्धाचा, निर्भर्त्सनेचा, 'भरत-कैकयीचा' किंवा नामत्यागाचा कसलाहि संबंध नाहीं. तसेंच कुलकर्णी यांनीं सुचविलें आहे कीं, 'पितृनामत्यागाचें हें पातक अच्युतरावांना शिक्षेच्या रूपानें भोगावें लागलें.' हें वाङ्मयहि निखालस चुकीचें आहे. तथापि, कुलकर्णी यांनीं पुरविलेली ही माहिती एका चांगल्या पुस्तकांत येऊन गेलेली असल्यामुळें, पुढल्या पुढल्या वाचकांच्या तीच नजरेस पडेल. कोणी उत्साही वाचक अच्युतरावांचें कौतुक करतील आणि कोणी त्यांच्या विकृत भावनेचा तिरस्कारहि करूं लागतील; आणि याला कारण कुलकर्णी यांनीं दिलेला हा चमत्कारिक समकालीन पुरावा. कोणी तरी उठवलेली ही भुमका त्यांच्या कानांवर आली आणि ती प्रमाण मानून अच्युतरावांच्या चरित्रांतील एक मोठा मासलेवाईक आणि मसालेदार चुटका म्हणून त्यांनीं या चरित्रांत ती देऊन टाकली. पुष्कळदां समकालीन पुरावे असेच तयार होत असतात. सर्व समकालीन पुरावे याच मापानें मोजावे असें मात्र माझें म्हणणें नाहीं. पण समकालीन पुरावा हा खरा मानला पाहिजे ही संशोधकांत प्रस्थापित झालेली रूढि असावी तितकी निर्दोष नाहीं, एवढेंच मला म्हणावयाचें आहे.

कै. गोविंद चिमणाजी भाटे यांनीं १८०० ते १९३८ या काळांतील मराठी वाङ्मयाचा मोठा थोरला इंग्रजी इतिहास लिहिला आहे. या इतिहासांत प्रत्येक लेखकाची चरित्रविषयक माहिती त्यांना देतां आली त्या वैपुल्यानें त्यांनीं दिली आहे. पण ही देतांना, त्यांनीं अशाच प्रकारचे समकालीन पुरावे उत्पन्न करून ठेवले आहेत. वास्तविक पाहतां, या चरित्रकथा लिहितांना भाटे यांनीं जास्त शहानिशा करावयास हवी होती.

आपण लिहिलेली हकीकत बरोबर आहे ना, हें तेव्हां जिवंत असलेल्या लेखकांना तरी त्यांनीं दाखवावयास हरकत नव्हती. हें केलें असतें तर त्यांच्या या प्रचंड ग्रंथाची किंमत पुष्कळच वाढली असती. कै. वामनराव जोशी यांचें चरित्र देतांना त्यांनीं पहिल्याच ओळींत सांगितलें आहे कीं, वामनराव हे कोकणस्थ ब्राह्मण होते. आणि त्यांचें मूळगांव गोरेगांव हें होतें. त्यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांतील निजामपूर गांवीं १८८३ सालीं झाला. वामनराव हे कुलाबा जिल्ह्यांत जन्मलेले आणि त्यांचं मूळगांव गोरेगांव, अर्थातच ते कोकणस्थ असले पाहिजेत असा समज भाटे यांनीं करून घेतला. वास्तविक वामनराव हे देशस्थ ब्राह्मण होते. कुलाबा जिल्ह्यांत देशस्थ ब्राह्मणांचीं किती तरी घराणीं आजहि सांपडतील. परंतु भाटे यांनीं अवश्य ती चौकशी केली नाहीं, हेंच खरें. असेंच त्यांनीं प्रो. दत्तो वामन पोतदार यांना देशस्थ ब्राह्मण ठरवलें आहे. पोतदार कऱ्हाडे आहेत, हें सर्वांना माहीत आहे. फक्त इतिहासकार भाटे यांनाच तें माहीत नव्हतें असें दिसतें. बरें, प्रत्येक लेखक कोणत्या जातीचा होता हें भाटे यांनीं सांगितलेंच आहे असें नाहीं. कोणाची जात त्यांनीं सांगितली आहे, कोणाची सांगितलेली नाहीं. बाब लहान आहे, पण ऐतिहासिक पुरावा म्हणून तिचा उपयोग कोणी तरी खचितच करील.

तथापि कै. भाटे यांनीं देशभक्त अण्णासाहेब भोपटकर यांच्या चरित्रलेखनांत जी मौज केली आहे ती पाहून मात्र त्यांच्या या प्रचंड इतिहासांत आणखी काय काय चुका होऊन बसल्या असतील, असा धाक वाटतो. अण्णासाहेब भोपटकर यांनीं तुरुंगांतील आपल्या खोलींत निघालेला साप मोठें धैर्य धरून एकट्यानेंच मारून टाकला अशी माहिती त्यांनीं दिली आहे; आणि अण्णासाहेबांच्या विलक्षण धैर्याची तारीफ केली आहे. अण्णासाहेबांनीं या प्रसंगीं विलक्षण धैर्य दाखवलें यांत शंकाच नाहीं. पण त्यांनीं व एकट्यानें तो साप मारला हें खरें नाहीं. तो साप फणा वर करून अण्णासाहेबांच्याकडे पहात आणि फूत्कार करीत एका कोंपऱ्यांत बसला होता. आणि अण्णासाहेब अंगावरचें कांबळें कंबरेइतकं वर धरून भुजंगाकडे बघत दुसऱ्या कोपऱ्यांत उभे होते. साप मारावयास त्यांच्यापाशीं काठीहि साधन नव्हतें. सुमारें २०-२५ मिनिटें भुजंगाच्या डोळ्याला डोळा लावून ते उभे होते. हें श्रेष्ठ धैर्य त्यांनीं दाखवलें. दरम्यानच्या काळांत, बोभाटा झाल्यावर जेलरनें त्यांच्या खोलीचें दार उघडलें आणि दुसऱ्या एका माणसानें तो साप मारला. खरी हकीकत ही आहे! भाटे यांनीं सहजगत्या कानांवर आलेली हकीकत रंगवून सांगितली आहे, इतकेंच.

पण अण्णासाहेब यांच्या बाबतींत त्यांच्या हातून आणखी एक चमत्कारिक प्रमाद घडला आहे. भास्कर बळवंत आणि लक्ष्मण बळवंत म्हणजे भाऊसाहेब आणि अण्णासाहेब या दोघां भावांची तुलना करावयास भाटे प्रवृत्त झाले आहेत. तुलनेंत भाटे म्हणतात, "लक्ष्मणराव हे अधिक आस्थेवाईक आणि अधिक गंभीर प्रवृत्तीचे आहेत. त्यांची बुद्धि अनेक विषयांत चालते. त्यांचा स्वार्थत्यागहि मोठा आहे. लोकहितासाठीं ते नेहमीं खपत असतात. संकट आलें असतां, धैर्यानें आणि सुधीरपणानें ते वागतात. (त्यांचा एकुलता एक तरुण मुलगा नुकताच वारला.) या त्यांच्या गुणांमुळें लक्ष्मणराव यांच्याविषयीं मनांत आदरबुद्धि उत्पन्न होते." अण्णासाहेब यांच्याविषयीं भाटे यांच्या मनांत आदरबुद्धि उत्पन्न व्हावी, हें बरोबर आहे; अण्णासाहेबांच्या अंगीं तसे गुण निःसंशय आहेत. पण त्यांच्या धैर्याचा आणि सुधीरपणाचा उल्लेख करतांना कंसांत त्यांची जी घरगुती माहिती दिली आहे, ती वाचून मात्र अतिशय वाईट वाटल्यावांचून रहात नाहीं. इतिहासकार सांगतात कीं, लक्ष्मणराव भोपटकर यांना एकुलता एक मुलगा होता आणि तोहि नुकताच वारला! भाटे यांचें हें लिखाण मीं वाचलें तेव्हां मी अगदीं थक्क होऊन गेलों; आणि पुस्तकांत खूण घालून तें अण्णासाहेबांच्याकडे पाठवलें; आणि सोबत पाठवलेल्या पत्रांत म्हटलें कीं, 'तुमच्या प्रपंचांत काय काय उत्पात झाले आहेत याची माहिती तुम्हांला नाहीं! भाटे यांनीं ती पुरवली आहे.' वास्तविक पाहतां अण्णासाहेबांना एक नव्हे तर चार मुलगे आहेत आणि सुदैवानें ते चांगले धडधाकट आणि खंबीर आहेत. पण भाटे यांची माहिती अशी कीं त्यांना एकच मुलगा होता आणि तोहि दुर्दैवानें वारला. आपण कोणाविषयीं काय लिहितों, याची जास्त शहानिशा चरित्रकारांनीं करावयास हवी. निदान समकालीन लोकांविषयीं तरी अशा शहानिशेची सोय असल्यामुळें ती करणें अवश्य आहे.

प्रो. नारायण सीताराम फडके यांनींहि असाच एक समकालीन पुरावा तयार करून ठेवला आहे. 'पुलाखालचें पाणी' या आपल्या 'केसरी'तील लेखमालेच्या एका लेखांत फर्ग्युसन कॉलेजमध्यें १९११ सालीं संमेलनप्रसंगीं झालेल्या एका नाटकाची हकीकत त्यांनीं दिली आहे. त्यांतील पुढील उतारा वाचण्यासारखा आहे—

"...अशा स्थितींत नाट्यप्रयोगालाहि काट मिळाला तर वार्षिक संमेलनांत उरलं तरी काय असं वाटून १९११ सालच्या संमेलनांत नाटकं करायचं ठरलं. परांजप्यांनीं खूप विरोध केला. पण अखेर संमति दिली. आम्हीं 'वाटिका' नाटक केलं. त्या प्रयोगांत प्रो. श्री. म. माटे यांनीं पिल्याची भूमिका केली. पायांत कुरवाऊ वहाणा, वर लांडा तंग चोळणा, अंगांत पैरण, डोक्याला मुंडासं, कानशिलांवर आणि कपाळाला पांढऱ्या गंधाच्या टिकल्या, निसर्गसिद्ध झुपकेदार मिशा, उग्र चेहरा, टणटणीत आवाज, दाणेदार उच्चार आणि कुरवाऊ भाषा बोलण्याची सफाई यांमुळें माट्यांचें काम अगदीं सुंदर झालं. आम्हांला तालमी द्यायला प्रो. भानू आणि प्रो. पानसे येत असत. त्यांना तर माट्यांचं काम पाहून भीति वाटली कीं, हा विद्यार्थी कॉलेज सोडून नाटकमंडळींत गेला नाहीं म्हणजे मिळवली......"

प्रो. फडके यांनीं दिलेली ही माहिती सर्वांच्या सर्व चुकीची आहे. हा लेख वाचल्यावर दोनचार दिवसांनीं त्यांच्याकडे मी मुद्दाम गेलों, आणि त्यांना विचारलें, "अप्पासाहेब! ही माहिती तुम्हीं आणली तरी कुठून? तुम्हीं अगदीं प्रत्यक्ष पाहिल्यासारखें लिहिलें आहे; पण यांतलें कांहींहि खरें नाहीं." अप्पासाहेब मोठ्यानें हसून म्हणाले, "मला एकदां शंका आली होती. आणि तुम्हांला एकदां जाऊन विचारायचं असंहि वाटलं; पण हें सारं खरं वाटून मीं लिहून टाकलं!" मी त्यांना म्हणालों, "फर्ग्युसन कॉलेजच्या रंगभूमीवर मीं केव्हांहि काम केलेलें नाहीं; आणि तुम्हीं तें पाहिलेलें नाहीं. मीं पिल्याची भूमिका १९०६ सालीं म्हणजे तुम्ही म्हणतां त्याच्या आधीं पांच वर्षे सातारा येथील घाट्यांच्या नाटकगृहांत केली होती. त्याच वेळीं इंग्रजी नाटकांत मीं शॉयलॉकचें कामहि केलें होतें. कै. अच्युतराव कोल्हटकर यांनीं सातारा येथील 'शाहू' पत्रांत एक प्रदीर्घ इंग्रजी लेख लिहून माझी अतिशय तारीफ केली. फर्ग्युसन कॉलेजांत १९११ सालीं किंवा आधीं केव्हां तरी वाटिका नाटक करावयाचें ठरलें. तेव्हां माझ्या या कामाची माहिती तेव्हांच्या चिटणीसांना कदाचित् असल्यामुळें त्यांनीं मला बोलावून नेलें व पिल्याचें काम करतां का म्हणून विचारलें. कामाचा मासला म्हणून मीं एखादें भाषण

म्हणून दाखवलें असेल; पण मी पुन्हा तिकडे कधीं फिरकलों नाहीं. आणि झालेल्या नाटकांत मीं कामहि केलें नाहीं. सातार्‍यास पूर्वीं केव्हां तरी झालेली माझी तारीफ तुमच्या कानीं आली असेल; आणि मासला म्हणून मीं जें एक भाषण करून दाखविलें, तें तुम्हीं कदाचित् ऐकलें असेल. या दोहोंचा संकर तुमच्या कल्पनेंत होऊन कालदृष्ट्या अगदीं दूरच्या दोन गोष्टी तुम्हीं एक करून रंगवल्या आहेत! तुम्ही कादंबरीकार आहांत एवढेंच यावरून दिसून आलें!" प्रो. फडके हे आपली चूक कधीं दुरुस्त करणार आहेत का नाहीं हें मला माहीत नाहीं. पण मी मात्र केसरी पत्रांत ती दुरुस्त करून टाकली. ही बाबहि अगदीं क्षुल्लक आहे. पण एखाद्या वेळीं असल्या क्षुल्लक बाबीलाच अकल्पित महत्त्व प्राप्त होतें आणि ऐतिहासिक पुराव्याचा दर्जा तिला मिळून जातो. हें संशोधक लोकांत समकालीन कागदपत्रांतील पुराव्यांची जी चर्चा चालते, तीवरून दिसून येतें, व म्हणूनच याहि बाबीचा उल्लेख मीं केला आहे.

अमुक ग्रंथकार केव्हां जन्मला किंवा केव्हां मेला यासंबंधीं संशोधकांची चाललेली चर्चा मोठी गमतीची वाटते. तुकारामबोवा हे कोणत्या तिथीला निजधामाला गेले यासंबंधींचा वाद कांहीं वर्षांपूर्वी पुष्कळच रंगला होता. तीन तीनशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या अशा घटनांची मिती विवाद्य बनावी यांत काय आश्चर्य आहे? केशवसुत हे तर अगदीं अलीकडचे कवि आहेत ना? पण ते कोणत्या दिवशीं वारले, हें लवकर ठरेना आणि त्यांचे बंधु सीतारामपंत दामले, प्रो. माधवराव पटवर्धन व प्रो. शंकरराव कानेटकर इत्यादिकांच्यांत याबर मोठा खडाजंगी वाद झाला. सीतारामपंतांचा आग्रह असा कीं, "मी त्यांचा प्रत्यक्ष भाऊ; फर्ग्युसन कॉलेजांतून रजा घेऊन आणि आगाऊ पगार घेऊन मी धारवाडला गेलों; आणि भावाचें और्ध्वदेहिक करून परत आलों; तुम्ही मला त्यांची मृत्युतिथी सांगतां काय?" सीतारामपंतांची ही बाजू लोकांना अर्थातच बिनतोड वाटली; पण माधवराव आणि शंकरराव यांनीं एक निराळीच क्लृप्ति काढली. फर्ग्युसन कॉलेजचें जुनें दप्तर त्यांनीं तपासलें; आणि सीतारामपंत यांनीं आगाऊ पैसे घेऊन धारवाडकडे कोणत्या दिवशीं प्रयाण केलें तें निश्चित केलें. त्यावरून केशवसुतांची मृत्यूची तिथी टास ठरत होती. आणि ही तिथी म्हणजे दामले सांगत होते ती नव्हे, तर हे दोघे प्रोफेसर सांगत होते तीच. पण "जर या जोडीनें दप्तराचा छडा लावला नसता तर सीतारामपंतांचा दावा इतिहासांत प्रमाण मानून राहिला असता. समकालीन पुराव्याची जन्मकथा पुष्कळदां अशीच असते!

वरील सर्व उदाहरणें पाहिलीं म्हणजे असें वाटते कीं, समकालीन, समकालीन म्हणून गाजलेल्या पुराव्यांचा महिमासुद्धां जितक्यास तितकाच मानला पाहिजे. असले पुरावे निरनिराळ्या कारणांनीं उत्पन्न होतात. टिळक कवि आणि बाळ गंगाधर टिळक या दोघांची गल्लत अमेरिकन पत्रांनीं करावी हें थोडेंबहुत स्वाभाविक होतें. दूरस्थ माणसांना खर्‍या हकीकती कळणें कठीणच असतें. म्हणून त्यांची चूक माहितीच्या अभावीं झाली असें म्हणणें भाग आहे. दत्तात्रय बळवंत टिळक हें नांव निकालपत्रांत पाहिल्याबरोबर हा मुलगा लोकमान्य टिळकांचाच असला पाहिजे असें खात्रीनें मानणें ही मुंबईतील पत्रिकेची खरोखर चूकच होती. टिळकांवर हल्ला करण्याच्या आतुरतेनें संपादक फसले असले पाहिजेत. माटे हे सहभोजनाच्या पंक्तीवर हल्ला करावयास जाणार आहेत ही कंडी बातमीदारानें केवळ धंद्यासाठीं उठवली असली पाहिजे; पण असें करतांना आपण जनदृष्ट्या कोणाचें नांव बद्दू करतों कीं काय इकडे त्यांनीं लक्ष द्यावयास हवें होतें. अच्युतरावांचा पितृनामत्याग हा श्री. वि. ह. कुलकर्णी यांच्या कानीं अशाच माणसांकडून आला असला पाहिजे कीं, तो त्यांना खरा वाटावा. एरवीं, कुलकर्णी हे निष्काळजीपणानें लिहिणारे नव्हत. पण होऊं नये ती चूक झाली एवढें मात्र खरें. वामनराव जोश्यांना कोकणस्थ बनविणें आणि पोतदारांना देशस्थ बनविणें या चुका केवळ हयगयीमुळें झालेल्या आहेत. हीच माटे यांची हयगय भोपटकरांच्या बातमींतहि दिसून येते. शिवाय 'एकुलता एक मुलगा नुकताच वारला' यांतील नुकताच ह्या शब्दानें तरी आपल्याला ही गोष्ट पक्की माहीत आहे असें आपण सुचविलें, याकडे माटे यांचें लक्ष जावयास हवें होतें. फडके यांच्या मनांत कशाकशाचा संकर झाला असेल हें मीं वर सांगितलेंच आहे. मनावर उमटलेले विषम ठसे कालांतले पुष्कळदां एकांत एक मिसळून जातात, आणि त्यांच्या मिश्रणानें जें चित्र तयार होतें तेंच खरें आहे असें वाटूं लागतें. हा मानसिक घडामोडीचा परिणाम होय. खरें वाटूं लागल्यावर मग चौकशीची जरुरीहि अर्थात् उरत नाहीं!

इंग्लंडचा राजा जॉर्ज हा वॉटर्लूच्या लढाईच्या वेळीं युरोपच्या भूमीवर मुळींच गेला नव्हता परंतु, ती लढाई कशी झाली, सेनापति कोण होते, तोफेचे गोळे कसे उडाले, या गोष्टींचें चिंतन त्याच्या मनांत कित्येक दिवसांपर्यंत आत्मीयतेनें चालू होतें. शेवटीं होतां होतां, आपण स्वतःच त्या लढाईंत प्रत्यक्ष उपस्थित होतों असें त्याला वाटूं लागलें. मग भेटीस आलेल्या लोकांना तो सांगूं लागला कीं, "मी घोडेस्वार होऊन रणावर उभा होतों; तोफांचे गोळे धाड धाड पडत होते; मीं वेलिंग्टनला सांगितलें कीं, ही तुकडी पुढें न्या, ती तुकडी मागें आणा...." राजा रणावर कधींच गेला नाहीं हें श्रोत्यांना पक्कें माहीत असे; पण राजेसाहेब सांगत होते, म्हणून ते कौतुकानें ऐकून घेत. असा प्रकार पुष्कळदां घडून येतो; आणि नकळत भलताच पुरावा माणसाच्या हातून तयार होतो. सीतारामपंत दामले यांच्या हातून तयार होणारा पुरावा केवळ विस्मृतीमुळें तयार होत होता असो.

समकालीन पुरावे हे पुढल्या काळांत तयार होणाऱ्या पुराव्यांपेक्षां अधिक विश्वसनीय असतात, एवढें मर्यादित स्वरूपाचें विधान कदाचित् खरें ठरेल; पण पुरावा केवळ समकालीन आहे, म्हणून तो खरा असला पाहिजे, अशी निश्चिति मानणें साफ चुकीचें आहे. सध्यां वर्तमानपत्रांत नित्य येत असलेल्या हकीकती जर कोणी पुरावा म्हणून पुढें मांडूं लागला तर त्याची फजिती झाल्यावांचून रहाणार नाहीं पूर्वीच्या काळीं सुद्धां एकमेकांना पत्रें लिहिणारे लोक पुष्कळदां कर्णोपकर्णी ऐकलेल्या बातमीवरून लिहीत असत. बातमी पडताळून पाहण्याचें कसलेंहि साधन त्यांच्यापाशीं नव्हतें, आणि आपलें लिहिणें पुढें कोणी पुरावा म्हणून मानूं लागतील, असें कधीं त्यांच्या स्वप्नांत देखील आलें नसेल. तथापि, समकालीन पुराव्याला संशोधकांनीं प्राप्त करून दिलेला महिमा बरेच दिवस तग धरून राहील असें दिसतें!



# नि घा... नि घा.... बो धि स त्त्वा

इंद्रानीलांनीं विणीली
रात्र आहे कृष्ण निळी,
दंव चांदण्याचें फरी
रित्या तेजाच्या पखाली.

आहे कोर चंद्रिकेची
खुणावत मंगळाला,
दिगंबरा ती वसली
नभोगंगेच्या कांठाला.

भुंगे जरीचे निजले
कमळणींच्या कोपांत,
आणि चकोरांचे थवे
मेघस्वप्नें चितारीत.

आहे चक्रवाक् गात
प्रेमगाणें सजणीला,
आणि भुलावत शुक्र
भोळ्याभावड्या चित्रेला.

तरळावें रतीमनीं
दिव्य चित्र अनंगाचें,
तसें सान्तांत फुललें
भव्य स्वप्न अनंताचें.

सुवर्णाचिया यशोधरा,
निजलेली यशोधरा
जैशी केतकीवनांत
झोंपे नागीण मंथरा.

कवडसा चांदण्याचा
आहे तिनें पांघरीला,
आणि घेतला उशाला
चंद्रपरागांचा झेला.

आशाआकांक्षांचीं तिच्या
स्वप्नें घालीती झपूर्झा,
तिचें प्राक्तन आणिक
मारी तिच्याशींच पैजा.

कुशीं पहुडला शांत
बाळ राहुल तान्हुला,
मनीं त्याच्या मोहरला
आहे रेशमाचा मळा.

अशा अमृतघडीला
येते सिद्धार्थाला जाग,
व्योम व्यापाया उठते
त्याच्या अंतरींची आग.

उघडतां नयनांच्या
त्यानें गोंडस पाकळ्या,
मनीं त्याच्या हिंदोळती
पत्नीपुत्राच्या सावल्या.

परी आहे अंतरांत
वडवाग्नि पेटलेला,
त्यांत त्याच्या संसाराचा
राजवाडा करपला.

शेज सोडून आपली
येतो यशोधरेपाशीं,
तिचें लावण्य देखून
क्षण थबके राजर्षि.

आहे तिचा एक कर
अंगावर राहुलाच्या,
माया मातेची देखून
वृत्ती हरखती त्याच्या.

वाटे उगीचच त्याला
याला उचलून घ्यावें,
याला कवळावें घट्ट,
एकसारखें चुंबावें.

नाहीं...नाहीं...मन मोहो
नश्वराची महामाया,
क्षण नाहीं थबकणें
जरामृत्यूच्या गेहीं या.

निघा, निघा, बोधिसत्त्वा,
रात्र आली डोईवर,
आली निर्वाणाची घटी,
वाट पाहे शुभंकर.

तथागता, नाहीं येथें
चित्त तुझें ठरणार,
होणें आहे तुला बुद्ध
आणि जाणणें ईश्वर.

आहे तुला सोडविणें
कोरें कोडें भिकाऱ्याचें,
आलें आहे आमंत्रण
अपंगाचें...त्या प्रेताचें.

आहे द्यावयाचें तुला
मरणाला रे आव्हान,
अमृतत्वाला करणें
युगेंयुगें आवाहन.

पाशीं जरामरणाच्या
असे विश्व गुंतलें,
आणि व्याधींच्या वेढ्यांत
आत्महंस अडकले.

आतां निघणें गौतमा
सवें घेऊन मरण,
पेरूनीया तें आहे ना
फुलविणें संजीवन ?

आली आली रे सिद्धार्था
घटी अभिनिष्क्रमणाची,
राहुल हा तुझा नाहीं
यशोधरा अन् मातीची.

मायादेवी तर गेली
तुझ्या सातव्या दिवशीं,
वेळा असे रे भरली
शुद्धोदनाच्या जाण्याची.

इथें कोणी न कोणाचा,
इथें साम्राज्य मातीचें,
इथें धुळीचें लावण्य
आणि यौवन क्षणाचें.





अनुक्रमणिका

ओढवेल सर्वनाश
जर क्षण थांबशील !
घात साराच होईल
'यशोधरा जागे तर !

छंद सारथ्यानें आहे
केला कंथक तैय्यार,
नदी नैरंजना लवी
डोळे तुझ्या वाटेवर.

आणिक उरुवेलीचा रे
बुद्धिद्रुमें तो अश्वत्थ,
तुला पहाण्या आतुर
त्याच्या छायेंत ध्यानस्थ.

एके दिशीं त्या वृक्षाच्या
अंगीं वीज संचारेल
चक्र आणि त्या वीजेचें
तुझ्याभोंवती भरारेल.

महिरेल रोमरोमीं
बुद्धा, तुझ्या विश्वतत्त्व,
आणि घेशील व्याधींचें
सारें शोपून तूं सत्त्व.

हातीं जीवनाचें जीन,
वस्त्र कृषार्य मृत्यूचें,
अंगी उटी कैवल्याची,
भाळीं गंध आकाशाचें.

ऊर्ध्वगामी कुंडलिनी
विश्व कवेंत घेईल,
ऋतुचक्रांचें मस्तकीं
छत्र ओंकार धरील.

असा होवून तूं ज्ञानी
प्रवासाला निघशील,
आणि कपिल वस्तुला
कधीं तरी रे येशील.

यशोधरा तुला तेथें
सान सामोरी येईल,
गांववेशीवर तुला,
तीर्थंकरा, ओवाळील.

डोळीं भरल्या ती तुला
प्रेमभरें निरखील,
आणि पहापहातां ती
शीर चरणीं ठेवील.

स्पर्श होतां चरणांना
कुंकू तियेचें पुसेल,
आणि गंगायमुनांचा
घाट तुटेल.. फुटेल ?

पादपद्में भिजतील
यशोधरेच्या अश्रूंनीं,
आणि अंगांगें जातील
शहारून भावनांनीं.

आणि जर का त्या वेळीं
डोळे ओले तुझे झाले,
रहा समजून नीट
तुझें बुद्धत्व भंगलें !

विश्वमंगलार्थ तुला
तुझा जाळणें संसार,
राखेवर त्याच्या, मुने
तुला पूजिणें ईश्वर !

जाऊं नये तडा तुझ्या
दिव्य स्थित प्रज्ञतेला,
देतो आहे म्हणोनी रे
शब्द स्नेहाचा हा तुला !

घ्याल कदाचित् वेध
आदि आणि अनादींचा,
परी प्रश्न न सुटणें
यशोधरेच्या अश्रूंचा !

दिशा नाहीं ही आपुली,
मार्ग आपुला यज्ञाचा
बळी देणें असे त्यांत
यशोधरेच्या स्वप्नांचा !

रात्र आली डोईवर,
पात्र घडीचें भरलें !
निघा...निघा...बोधिसत्त्वा,
मागें कांहीं न राहिलें !

मागें वळूनी वळूनी
आतां कांहीं न पहाणें !
विरक्तीला तुमच्या या
आतां कांहीं न दिसणें !

चला, तीर्थंकरा...चला
कृतकृत्यार्थ होण्याला,
अतळाचा तळ काढा
संसार हा झाला शिळा !...

—सदानंद रेगे



अनुक्रमणिका

श्रीकृष्णानें सत्यभामेच्या हट्टासाठीं तिच्या अंगणात
पारिजातकाचे झाड लावलें,
पण फुलांचा सडा मात्र पडे रुक्मिणीच्या दारांत,
तसेंच या कोयनेचें होणार आहे !

# कोयनेचें कोयनेला!

पांडुरंग भानुदास डिंगरे, एम. ए.

## १ धरणें कशासाठीं बांधतात?

पावसाच्या हंगामांत डोंगरमाथ्यावर कोसळणारें शेकडों इंच पाणी नद्यांतून समुद्रांत वाहून जातें आणि पुढें इतर दिवसांत शेतीला आणि क्वचित् पिण्यालाहि उरत नाहीं, म्हणून समुद्रार्पण होणारें हें पाणी अडवून सांठवून वर्षभर हुकमी वापरास मिळावें या हेतूनें नद्यांना योग्य जागीं बांध घालतात. अशा अडवणुकींत विजेची निर्मिति आणि पुराचें नियंत्रण हेहि उद्देश कांहीं ठिकाणीं साधतां येतात.

## २ देशांत पाऊस किती पडतो?

हिंदुस्थानांत मुख्यतः मान्सून वाऱ्यांबरोबर पाऊस येतो. सिंधमध्यें वार्षिक ३ इंच तर चेरापुंजींत वार्षिक ४६० इंच या दरम्यानच्या विविध परिमाणांत तो देशाच्या वेगवेगळ्या प्रदेशांत कोसळतो. महाराष्ट्राचें पर्जन्यमान पुढीलप्रमाणें :

सह्याद्रींत ५० ते २५० इंच
सावंतवाडींत १७६ इंच
नाशिक-पुणें या मध्यभागांत ४० ते ५० इंच
नगर-सोलापुरांत सर्वांत कमी २३ इंच

## ३ या पावसावर आपलें एकरीं उत्पादन किती?

जगांतील इतर देशांच्या मानानें आपलें एकरीं उत्पादन फारच कमी पडतें. आंकडे पहा :

(अ)

| पिकांचें नांव | इतर देश | हिंदुस्थान |
|---|---|---|
| कापूस | इजिप्त ४५० पौंड | ९८ पौंड |
| ऊंस | जावा ४० टन | १० टन |
| धान्य | इंग्लंड २००० टन | ६९० टन |

(ब)

| देश | तांदूळ | गहूं |
|---|---|---|
| हिंदुस्थान | ६७८॥ | ३९६ |
| इटली | २३०० | ६२०॥ |
| इंग्लंड | — | ९०६ |
| इजिप्त | १९७८ | ८४४ |

(क) पैशांत एकरीं उत्पन्न
इंग्लंड २३५ रु.
हिंदुस्थान ५६ रु.

## ४ हेंहि एकरी प्रमाण घटत आहे काय?

आंकड्यांवरुन तसें सिद्ध होतें.

| वर्ष | गहूं एकरीं सरासरी शेर |
|---|---|
| १९१४ ते १९१९ | ४२१ |
| १९२६ ते १९३० | ४२५॥ |
| १९३१ ते १९३५ | ४१४॥ |
| १९४८ ते १९४९ | ३६४ |

## ५ हें असलें उत्पादन आपणांस पुरतें काय?

अर्थातच नाहीं. सर्व जगाची लोकसंख्या प्रतिवर्षी १.२५ नें वाढते आणि शेतकी उत्पादन मात्र फक्त ०.३ नें वाढतें. त्यामुळें जगांतच अन्न कमी पडत आहे. जगांतल्या २५० कोटींपैकीं निम्म्याहून जास्त लोकसंख्या पूर्व आणि अतिपूर्वेकडे आहे. आणि जगांत दरसाल २॥ कोटी लोकसंख्या वाढते. त्यांतला फार मोठा हिस्सा याच भागांतून वाढतो. पण या भागाचें शेतकी उत्पादन मात्र युद्धपूर्वकाळापेक्षां १० टक्क्यानें घटलें आहे. हिंदुस्थानांत अशी परिस्थिति फारच बिकट झाल्यानें धान्य न पुरुन प्रतिवर्षी परदेशांतून वाढत्या प्रमाणावर धान्य आयात करावें लागत आहे.

## ६ अशा धान्य आयातींत पैसा किती जातो?

आपण आधींच गरीब. त्यांत देशाच्या पुनर्घटनेला जे विकासाला जरूर असलेला पैसा धान्य आयातींत घालवीत आहोंत. परक्या पैसा देऊन वर पुन्हा परदेशांत धान्यासाठीं लाचार व मिनतवारी आहेच. हे आंकडे पहा :

| वर्ष | धान्य आयात टन | किंमत रुपये | वहातूक खर्च भारतीय जहाजांना | वहातूक खर्च परकीय जहाजांना |
|---|---|---|---|---|
| १९४६ | २० लक्ष, ३५ हजार | ७६ कोटी, १० लक्ष | १६ लक्ष रु. | १४ कोटी, ७० लक्ष रु. |
| १९४७ | २० लक्ष, ३३ हजार | ९४ कोटी | ८५ लक्ष | १४ कोटी, ४० लक्ष |
| १९४८ | २० लक्ष, ८८ हजार | १ अब्ज, २९ कोटी, ७० लक्ष | १ कोटी, ३५ लक्ष | १४ कोटी, २० लक्ष |
| १९४९ | ३० लक्ष, ७१ हजार | १ अब्ज, ४४ कोटी, ६० लक्ष | ६६ लक्ष | १३ कोटी, ५० लक्ष |
| १९५० | २० लक्ष, १३ हजार | ८० कोटी, ६० लक्ष | ५५ लक्ष | ७ कोटी, ८० लक्ष |
| १९५१ | ४० लक्ष, ७३ हजार | २ अब्ज, १६ कोटी, ४० लक्ष | १ कोटी, ४८ लक्ष | ३८ कोटी, ७० लक्ष |
| एकूण | १ अब्ज, ७० लक्ष, ९९ हजार | ७ अब्ज, ४१ कोटी, ४० लक्ष | ५० कोटी | १अब्ज, ३ कोटी, ३० लक्ष |

**या उधळपट्टींत मोठा हिस्सा मुंबईचा हें खरें काय ?**

सबंध हिंदुस्थानांत मुंबई प्रांत हा अधिक औद्योगिक उत्पादनाचा व शहरें जास्त असलेला प्रांत आहे. या प्रांतांत शेंकडा २७ लोक शहरांत रहातात ते अर्थातच धान्योत्पादन करीत नाहींत. आंकडे पहा :

मुंबई प्रांताची लोकसंख्या ३ कोटी ५९ लक्ष
पैकीं रेशन विभागांत १ कोटी ६ लक्ष
बिगर रेशन विभागांत २ कोटी ५३ लक्ष

माणशीं १२ औंसांप्रमाणें रेशन विभागांत ११ लक्ष ९२ हजार टन धान्य लागतें. बिगर रेशन विभागाला ३५ लक्ष ४६ हजार टन धान्य पुरविलें जातें.

एकूण गरज ४७ लक्ष ३८ हजार टनांची.
मुंबई प्रांताचें उत्पादन ३२ लक्ष ५७ हजार टन

बी-बियाणें व नासधूस जाऊन तूट १८ लक्ष ८८ हजार टनांची त्यामुळें एकूण धान्य आयातींत फार मोठा हिस्सा मुंबई प्रांताचा.

**८ सरकार लेव्ही जमवितें तिचें काय होतें ?**

मुंबई प्रांताची लेव्हीवसुलीची पद्धति सर्व भारतामध्यें शास्त्रशुद्ध, काटेकोर व अधिक प्रमाणावर आहे हें खरें. पण अशी एकूण लेव्ही किती जमते पहा :

| साल | सक्तीची लेव्ही | खुषीची लेव्ही | एकूण |
|---|---|---|---|
| १९४४–४५ | ३,५०,००० | ३,२५,७०० | ६,२६,२०० |
| १९४९–५० | २,५९,७०० | ३,५१,२०० | ६,१०,९०० |

म्हणजे सरासरी ६ लाख टन लेव्हीचें धान्य जमा होतें. त्यांपैकीं मुंबई, अहमदाबाद, पुणें, सोलापूर या चार राक्षसी शहरांनाच ५॥ लाख टन धान्य द्यावें लागतें. शिवाय इतर जीं छोटीं शहरें आहेत त्यांना ४॥ लाख टन धान्य दरवर्षी लागतें तें वेगळेंच. म्हणजे केवळ शहरें १० लाख टन धान्य खातात आणि लेव्ही जमते ६ लाख टन. मग भीक मागावी लागते.

**९ अशी भीक कोण किती मागतो ?**

सोलापूरसारखा जिल्हा मुंबई सरकारकडे ४० हजार टनांची

मुंबईसारखीं राज्यें हिंद सरकारकडे १० ते १५ लाख टनांची

हिंदुस्थान सरकार अमेरिकेकडे ५० लक्ष टनांची

**१० ही भीक मागण्याची पाळी आत्तांच कां यावी ?**

युद्धपूर्वकालींहि परदेशांतून धान्य येथें येतच होतें. रंगून बांदळाच केळीच्या पानावरील भाताचा गोवर्धन युद्धोत्तर काळांतहि आठवण्यास हरकत पडूं नये.

पण आतां ही तूट तीव्र होण्यास जेथून असें धान्य येई ते ब्रह्मदेशासारखे देश युद्धांत होरपळून निघाले हें तर आहेच. पण त्याहिपेक्षां बलवत्तर कारण भारताची फाळणी हें आहे.

**११ फाळणीनें असा कोणता अनर्थ घडला ?**

फाळणींत आपल्याकडे लोक ८७ टक्के आले.
पण पेरण्यास योग्य अशी जमीन मात्र ६५ टक्केच राहिली.
म्हणजे १३ टक्के लोक गेले त्यांनीं ३५ टक्के जमीन नेली.

**१२ गेलेली जमीन विशेष चांगली होती काय ?**

हो तर. सर्व हिंदुस्थानांत सिंध आणि पंजाबांतच पाट अधिक काढलेले होते. तेच नेमके गेले.

सिंधची ७३ टक्के जमीन बागायत ती गेली.
पंजाबची ६० टक्के जमीन बागायत ती गेली.

**१३ मग उरलेल्या जमिनींत धान्योत्पादन कां वाढविलें नाहीं ?**

तें जवळपास अशक्यच होतें. सिंध-पंजाबचा गहूं व बंगालचा तांदूळ गेल्यानें हीं धान्यें कमी पडलीं येवढाच अनर्थ फाळणीनें केला नाहीं. तर सिंधांत कापूस व बंगालांत ताग हीं महत्त्वाचीं औद्योगिक पिकें गेल्यानें हिंदमधील कापूस व ताग यांच्या गिरण्या पडण्याची पाळी आली. हे धंदे चालू ठेवण्यासाठीं मग उरलेल्या अन्नधान्याच्या क्षेत्रावरच कापूस व ताग पेरावे लागले. त्यामुळें अन्नाखालचें क्षेत्र व एकूण अन्नोत्पादन अधिकच घटलें.

१९४३ मध्यें फक्त ३ लाख टन धान्य आयात होती, ती १९५० मध्यें ४७ लाखांवर गेली याचें हें प्रमुख कारण आहे.

## १४ ही तूट टाळण्यासाठीं आतां काय करावें ?

कापूस व तागाला गेलेलें नवीन क्षेत्र काढून घेतां येणार नाहीं व तें तसें घेऊंहि नये. हें क्षेत्र वगळून बाकीच्या जागेंत पूर्वीपेक्षां अधिक पट धान्य उत्पन्न होईल असे प्रयत्न केले पाहिजेत.

## १५ मुंबई प्रांतांत किती उत्पादन वाढलें पाहिजे ?

देशाची एकूण तूट १० टक्के आहे.

आपल्या मुंबई प्रांतांत माणशीं १२ औंस रेशन पुरविण्यासाठीं पुढील-प्रमाणें उत्पादन वाढविलें पाहिजे :

| | | |
|---|---|---|
| ज्वारी | ११० | टक्के |
| बाजरी | २५ | टक्के |
| गहूं | ४·२ | टक्के |
| तांदूळ | ३·२ | टक्के |

## १६ हें उत्पादन कशानें वाढेल ?

सुधारलेलें बी-बियाणें, उत्कृष्ट औजारें, खतें, उत्पादनाची अद्यावत् पद्धति वगैरे पुष्कळ अवांतर उपाय आहेत. भारतांत पडीक जमीन १५ कोटी एकर आहे. ती लागवडीस आणली तरी ८०० कोटी रुपये उत्पन्न येईल. युद्धोपूर्वी शेतीचें उत्पन्न १२०० कोटी रुपयांचें होतें. म्हणजे नुसत्या पडीक लागवडीनें उत्पन्न $\frac{2}{3}$ नें वाढेल.

## १७ यांत्रिक मशागतीची गरज व उपाय कोणता ?

मुंबई प्रांत व महाराष्ट्राचें पटार यांपुरतें बोलावयाचें झाल्यास येथें शेतीला हुकमी पाणीपुरवठा करणें हीच तातडीची बाब आहे.

एकूण हिंदुस्थानांत ५ कोटी २० लक्ष एकर म्हणजे शेंकडा २० टक्के जमीन बागायत आहे. ती पुढीलप्रमाणें :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कालव्यांखालील जमीन | २ | कोटी | ८० | लक्ष एकर |
| विहिरींखालील जमीन | १ | कोटी | २० | लक्ष एकर |
| तळ्यांखालील जमीन | | | ६० | लक्ष एकर |

## १८ भारतांत बागायत इतकें कमी कां ?

भारत हा बिनपावसाचा व बिगरनद्यांचा प्रदेश आहे म्हणून नव्हे. हिमालयांत, सह्याद्रींत व इतर डोंगरपर्वतांत पाऊस खूपच कोसळतो; व गंगा, सिंधू, ब्रह्मपुत्रा, मही, तापी, नर्मदा, गोदा, कृष्णा, भीमा अशा मोठमोठ्या नद्या बारमहा दुथडी वहातात. हिमालयांतील नद्यांना तर पावसाळ्यांत पावसाचे व उन्हाळ्यांत बर्फाचे असे दुहार पूर येतात.

तेव्हां ईश्वराचें किंवा निसर्गाचें पाण्याचें देणें कमी आहे असें नव्हे तर या जलशक्तीचा हिंदुस्थानांत उपयोग केला जात नाहीं.

## १९ इतर देश जलशक्तीचा उपयोग करतात काय ?

आंकडेच पहा—(आंकडे दशलक्ष अश्वशक्तीचे) :—

| देशाचें नांव | उपयोगांत आणण्या-जोगी जलशक्ति | उपयोगांत आण-लेली जलशक्ति | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| अमेरिका | ३५० | ११७ | ३३ |
| कॅनेडा | १८२ | ४५ | २५ |
| फ्रान्स | ५४ | २१ | ३७ |
| जपान | ४५ | १७ | ३६ |
| हिंदुस्थान | २७० | ८ | ३ |

म्हणजे निसर्गाकडून ४ कोटी ५० लक्ष अश्वशक्ति जल प्राप्त झालेला जपान १ कोटि ५० लक्ष अश्वशक्तीचें जल वापरतो आणि त्याच्या सहापट म्हणजे २७ कोटी अश्वशक्तीचें जल मिळालेला हिंदुस्थान फक्त ३ टक्के जलशक्तीचा उपयोग करून घेतो.

## २० पण मुंबई प्रांतानें सह्याद्रीचा वापर जास्त केला असेल ?

उलट परिस्थिति आहे. सगळ्या भारतांत मिळून बागायत जमीन २० टक्के आहे. पण सह्याद्रीच्या मुंबई प्रांतांत ती फक्त ३·९ टक्के एवढीच आहे प्रांतोप्रांतींची ही स्थिति पहा :

| प्रांत | बागायत जमीन शेंकडा |
|---|---|
| सिंध | ७३·७ |
| पंजाब | ४८·१ |
| बंगाल | ६·२ |
| मध्यप्रदेश | ४·२ |
| मुंबई ( सर्वांत कमी ) | ३·९ |

यावरून लक्षांत येईल कीं, सिंधसारख्या वार्षिक सरासरी ३ इंच पाव-साच्या प्रांतांत दर १०० एकरांत ७३ एकर बागायत आहे तर २५० इंच पाऊस कोसळणारा सह्याद्रि उरावर बाळगणाऱ्या मुंबई प्रांतांत शंभरांत ९६ एकर कोरडे आहेत.

## २१ जिरायतीपेक्षां बागायतींत उत्पन्न जास्त येतें काय ?

अर्थातच. पुढील आंकडे पहा :

| पिकाचें नांव | जिरायत दर एकरीं उत्पन्न | बागायत दर एकरीं उत्पन्न |
|---|---|---|
| गहूं | ४०० | १०८० |
| ज्वारी | ५४० | १५०० |

## २२ तर मग बागायत करणें हाच खरा उपाय नव्हे ?

केव्हांहि. आकाशाकडे डोळे लावून बसलेल्या आणि या सवयीमुळें दैव-वादी बनलेल्या शेतकऱ्याला पाटाचें हुकमी पाणी पुरविणें हाच आमच्या दुखण्यावर खरा इलाज आहे. अपुरा पाऊसहि हमखास व वेळेवर पडत नसल्यानें आमच्याकडे कालिक दुष्काळ पडतात. ते टाळण्यासाठीं आणि जिरायतीपेक्षां बागायतींत २॥ ते ३ पट जादा उत्पादन होतें तें निदान भिकेची लाचारी बंद करण्यासाठींहि अधिक जमीन बागाईत केली पाहिजे.

त्यासाठीं शेतांना पाणी दिलें पाहिजे, म्हणजे नद्यांचे पाट काढले पाहिजेत व पाटाला योग्य अशा नद्यांना धरणें बांधलीं पाहिजेत.

## २३ पंचवार्षिक योजनेंत हा दृष्टिकोन आहे काय ?

हाच मुख्य दृष्टिकोन ठेवून पंचवार्षिक योजनेची आंखणी केलेली आहे. या योजनेंतील एकूण खर्चापैकीं $\frac{1}{3}$ रक्कम केवळ अशा योजनांवर खर्च होणार आहे.

या सर्व योजना पूर्ण झाल्यावर—

१ कोटि, ६५ लक्ष, ९९ हजार एकर नव्या जमिनीला पाणी मिळेल.

१९ लक्ष ६४ हजार किलोवॅट अधिक वीज उद्योगधंद्यांना मिळेल.

पैकीं १९५६ अखेरच पुढीलप्रमाणें फायदे होतील—

८८ लक्ष ९ हजार एकर नव्या जमिनीला पाणी मिळेल.

१० लक्ष ७४ हजार किलोवॅट अधिक वीज निर्माण होईल.

पुढील कोष्टकच पहा :

अनुक्रमणिका

## २४ धरण योजनांवर खर्च किती व फायदे किती ?

| योजना | एकूण खर्च (लक्ष रुपये) | १९५६ मध्यें होणारे फायदे | | पूर्ण झाल्यावर फायदे | |
|---|---|---|---|---|---|
| | | पाटबंधारे (एकर) | विद्युत् | पाटबंधारे (एकर) | वीज |
| **मध्यवर्ती सरकार** | | | | | |
| (१) भाक्रा नानगल | १५,६०० | १२,९३,००० | ९६,००० | ३४,२४,००० | ५,१७,००० |
| (२) दामोदर व्हॅली | ७,७८० | ४,७०,००० | १,९४,००० | १३,२६,००० | २,७४,००० |
| (३) हिराकुड | ९,२०८ | ८,००,००० | ७५,००० | १९,३०,००० | २,६८,००० |
| **राज्य सरकारें** | | | | | |
| (१) काक्रापारा (मुंबई) | ६२६ | ३,९१,००० | — | ६,५२,००० | — |
| (२) तुंगभद्रा (मद्रास-हैदराबाद) | ४,९४८ | ३,१५,००० | ३०,००० | ७,००,००० | १,७०,००० |
| (३) मुचकुंद (मद्रास-ओरिसा) | १,९९५ | — | ५२,००० | — | १,५३,००० |
| (४) मयूराक्षी (प. बंगाल) | १,५५० | ६,००,००० | ४,००० | ६,००,००० | ४००० |
| (५) लोअर भवानी (मद्रास) | ९०७ | १,३०,००० | — | २,०७,००० | — |
| (६) घटप्रभा (मुंबई) | ५४५ | ४५,००० | — | १,००,००० | — |
| (७) गंगापूर (मुंबई) | ३३४ | १५,००० | — | ४५,००० | — |
| (८) इतर | ३४,७२५ | ४७,४२,००० | ६,२३,००० | ७६,७५,००० | ७,३८,०५४ |
| एकूण | ७८,२४८ | ८८,०१,००० | १०,७४,८०४ | १,६५,९९,००० | १९,६४,००० |

## २५ या धरणांनीं शेतीच्या उत्पादनांत किती भर पडेल ?

साल्वार तक्ता पुढीलप्रमाणें मांडण्यांत आलेला आहे :

| वर्ष | शेतीखालीं येणारी नवीन जमीन (लक्ष एकर) | जादा धान्य उत्पादन (लक्ष टन) | जादा वीज (किलोवॅट) |
|---|---|---|---|
| १९५१–५२ | ६ | २ | — |
| १९५२–५३ | ११ | ४ | ३,५१,००० |
| १९५३–५४ | २० | ७ | ५,५४,००० |
| १९५४–५५ | ४३ | १४ | ५,९६,००० |
| १९५५–५६ | ५५ | १८ | ६,३६,००० |
| १९५६–५७ | ६७ | २२ | ७,०८,००० |
| १९५७–५८ | ७५ | २५ | ७,९१,००० |
| १९५८–५९ | ८५ | २८ | ८,१७,००० |
| १९५९–६० | ९२ | ३१ | ९,५०,००० |
| नंतर पुढें | १२९ | ४३ | १९,९६,००० |

दृष्टिपथांत असलेल्या आणखी १२२ धरणयोजना पूर्ण झाल्यावर शेतीखालीं आणखी ४ कोटी ३० लक्ष एकर जमीन येईल.

## २६ मुंबई प्रांतांतील योजनेंत वाज कां नाहीं ?

हिंदुस्थानांत सर्वांत जास्त औद्योगिक वाढ मुंबई प्रांताची.

हिंदुस्थानांत सर्वांत कमी बागायत मुंबई प्रांतांत (३·९ टक्के).

सर्वांत जास्त धान्यतूट मुंबई प्रांताचीच (१० ते १५ लाख टन).

म्हणजे या प्रांतांत आतां आधीं धान्य उत्पन्न केलें पाहिजे.

त्यासाठीं जमिनीला पाणी दिलें पाहिजे.

म्हणून विजेऐवजीं पाटबंधाऱ्यांना प्राधान्य.

## २७ महाराष्ट्रांत पीकपाण्याची काय परिस्थिति आहे ?

महाराष्ट्र हा धान्यदृष्ट्या तुटीचा प्रांत आहे.

पावसाच्या दृष्टीनें महाराष्ट्राचे तीन विभाग पडतात.

(१) कोंकण, (२) सह्याद्रि माथा, (३) खालचा प्रदेश.

पैकीं, कोंकणांत १०० इंचांवर पाऊस पडतो.

सह्याद्रि माथ्यावर ५० ते २५० इंच पाणी कोसळतें.

सातारा, पुणें, नाशिक हे जिल्हे पुरेशा पावसाचे आहेत.

नगर, सोलापूर व विजापूर हा भाग सर्वांत कमी पर्जन्यमानाचा आहे.

नगर १८९० ते १९४०ची सरासरी २२.६२ इंच; सोलापूर १८९० ते १९४० ची सरासरी २३.३३ इंच.

हाहि पाऊस हमखास वेळेवर पडत नसल्यानें हा भाग कायमचा अवर्षणाचा झालेला आहे.

## २८ या जमिनींत कांहीं खोड आहे काय ?

महाराष्ट्रामधल्या दुष्काळी म्हणून प्रसिद्धि पावलेल्या नगर-सोलापूर विभागांतील जमिनींत कांहींहि कमतरता नाहीं.

जमीन काळी, सुपीक, भुसभुशीत असून मातीचा थर ५ ते २० फूट आहे.

हा भाग खरोखरी महाराष्ट्राचें धान्याचें कोठार आहे.

श्रीगोंदे, माढे, मोहोळ, मंगळवेढ्याची ज्वारी टपोरी व प्रसिद्ध आहे.

करमाळा तालुक्यांत उत्कृष्ट कापूस होण्यासारखी जमीन आहे.

दोन पावसांत या जमिनींत भरघोस पीक येतें.

## २९ सह्याद्रि पाठीशीं असतांना घोडें कां अडावें ?

वास्तविक अडूं नये. पण सह्याद्रींत कोसळणारा ५० ते २५० इंच पाऊस या उत्कृष्ट जमिनीला न मिळतां नद्यांना मोठाले पूर येऊन शेतकऱ्याच्या डोळ्यांदेखत त्याच्या बांधाजवळून समुद्रांत वाहून जातो. आणि मग पुढें

वर्षभर हा शेतकरी देवावर भिस्त ठेवून करपणारीं पिकें कपाळाला हात लावून पहात बसतो. ही परिस्थिति पालटावयाची तर हें सारें पाणी वाहून जाऊं न देतां अडवून सांठवून त्याचे पाट गरजेच्या भागांत आणले पाहिजेत.

**३० या दृष्टीनें कोणीच विचार केला नाहीं काय ?**

नाहीं कसा ? दख्खनच्या पठारावरील या दुष्काळांनीं अनेक विचारवंतांचें लक्ष फार पूर्वीपासून वेधून घेतलें आहे. सोलापूर जिल्ह्याचें गॅझेटियर काढून पाहिलें तर त्यांत १३९३ पासून १८७७ पर्यंतच्या १२ प्रमुख दुष्काळांचें हृदयद्रावक वर्णन केलेलें आढळून येईल. वर्षानुवर्षे सतत अवर्षण पडल्यानें १३९६ चा शांतादुर्गाचा दुष्काळ ओळीनें १२ वर्षे टिकला. त्या वेळीं सर्व महाराष्ट्रच्या महाराष्ट्र उठून खालीं दक्षिणेंत व वर उत्तरेंत रहावयास गेला. महाराष्ट्री भाषेंत इतर सर्व प्रादेशिक भाषांची भेसळ असण्याचें कारण हा दुष्काळ व तज्जन्य स्थलांतर आहे हें भाषाशास्त्रज्ञांना ठाऊक आहे.

पंढरिरायाला ज्यांत महार व्हावें लागलें तो १४६० मधील दामाजीपंतांचा दुष्काळ. धार्मिक कथांतून व आतां सिनेमांतून पोराबाळांच्या तोंडीं झालेला आहे.

१८७६ त फक्त ९ इंच पाऊस पडल्यानें भयंकर दुष्काळ पडून एक आणा रोजावर हजारों लोक दुष्काळी कामावर होते.

ही परिस्थिति ध्यानांत घेऊनच फार पूर्वीपासून या प्रदेशासाठीं पाटाच्या योजना आंखून त्यांपैकीं नीरा-प्रवरेसारख्या पूर्णहि करण्यांत आलेल्या आहेत.

नीरा कॅनॉल व प्रवरा कॅनलनें वैराणाचें नंदनवनांत झालेलें रूपांतर व तेथें फोफावलेली साखर-कारखानदारी आपल्या नजरेसमोर आहेच.

**३१ अशा घेण्यासारख्या आणखी योजना कोणत्या ?**

| | नांव | जमीन किती एकर भिजेल ? | खर्च किती ? |
|---|---|---|---|
| १ | वीर धरण | ९३ हजार | ४ कोटी |
| २ | खडकवासला | ४२ हजार | २ कोटी १५ लक्ष |
| ३ | गिरणा | २ लक्ष एकर | ५ कोटी |
| ४ | तुंगभद्रा | ४ लाख एकर | २३ कोटी |

**३२ याहूनहि अधिक पाणी देणाऱ्या योजना नाहींत काय ?**

या सर्वांपेक्षां अधिक जमिनीला पाणी देणाऱ्या आणि महाराष्ट्रामधला खरा दुष्काळी प्रदेश नगर-सोलापूर त्या भागाला पाणी पुरवून आमच्या नशिबाचा दुष्काळ कायमचा घालविणाऱ्या मुळा आणि कुकडी या योजना आहेत. "दुष्काळी भागासाठीं सर्वोत्कृष्ट योजना" असें त्यांचें वर्णनहि तज्ज्ञांनीं केलें आहे.

**३३ इतक्या चांगल्या योजनांची जाहिरात कोणीच कशी करीत नाहीं ?**

पहिली गोष्ट चांगल्या गोष्टीला जाहिरातीची जरूरी नसते. दुसरें असें कीं, या देशांत शेतकरी ७० टक्के असले आणि त्यांचें कल्याण तेंच देशाचें खरें कल्याणहि असलें तरी हे शेतकरी प्रायः अडाणी व नूक असतात. त्यामुळें त्यांच्या सोन्यासारख्या योजना दप्तरखान्यांत धूळ खात पडतात आणि इतरांच्या मातीमोल कल्पना बोल बोल बनविण्याच्या कसबानें सोन्याच्या भावानें खपल्या जातात.

**३४ तर मग या योजनांना पूर्वेतिहास आहे काय ?**

आज जरी या योजना अगदीं अलीकडे अचानक कोलदांड्यासारख्या पुढें आल्याचें मतलबी हितसंबंधी सांगत असले तरी १९०९ सालींच त्या सरकारनें तपशीलवार प्रसिद्ध केलेल्या आहेत.

**३५ मुळा धरणानें कोठें सोनें पिकेल ?**

मुळा ही गोदावरीची उपनदी. तिच्या उगमाजवळच्या प्रदेशांत चांगला २६० इंच पाऊ पडतो. या नदीवर चारु, मांडवी व तास येथें बांधण्यांत यावयाच्या १५४, ११९ व ४८ फूट उंचीच्या धरणांचें पाणलोटाचें क्षेत्र, ५३२ चौरस मैलांचें असून पाण्याचा सांठा ३०,००० दशलक्ष घनफुटांपर्यंत राहील. योजनेच्या कक्षेंत ३ लक्ष एकर जमीन येत असून पाटस्थल क्षेत्र १ लक्ष १६ हजार एकर राहील.

या धरणांनीं मुळेचे त्रासदायक पूर नियंत्रित होऊन शिवाय गंगाकांठच्या सुपीक पण दुष्काळग्रस्त विभागांपैकीं राहुरी तालुक्याचा दक्षिण व पूर्व भाग,

सबंध नेवासें तालुका, सबंध शेवगांव तालुका, व गेवराई (हैदराबाद) तालुक्याचा कांहीं भाग भिजून निघेल.

मुख्य-कालवा-५९ मैल होईल. खर्चाचा अंदाज १॥ कोटि असें योजकांनीं धरलेलें आहे.

### ३६ कुकडीचें नंदनवन कोठें फुलेल ?

मुंबई प्रांतामधल्या सर्व धरणांत पहिल्या क्रमांकानें व अग्रहक्कानें घ्यावी इतकी कुकडी योजना सर्वोत्कृष्ट आहे.

भीमा नदीच्या घोड, मीना व कुकडी या नद्यांवर धरणें बांधण्याची ही योजना आहे. साकोरा, वडगांव व पिंपळवाडी या अनुक्रमें १३२ फूट, ११५ फूट व ५९ फूट उंचीच्या तीन धरणांचें पाणलोटाचें क्षेत्र एकंदर ५५८ चौरस मैल रहाणार असून त्यांत ४६,००० दशलक्ष घनफूट पाणी सांठेल. योजनेच्या कक्षेंत १६ लक्ष ३८ हजार एकर जमीन येत असून पाटस्थल क्षेत्र ५॥ लाख एकरांचें आहे.

पुणें जिल्ह्यांतील जुन्नर, आंबेगांव व खेड तालुक्याचा बराच भाग, नगर जिल्ह्यांतील पारनेर तालुक्याचा दक्षिण भाग, सबंध श्रीगोंदे तालुका, कर्जत तालुक्याचा दक्षिण व पश्चिम भाग, आणि सोलापूर जिल्ह्यांतील करमाळें, माढे, मोहोळ हे तीन तालुके व पंढरपूर तालुक्याचा बराच भाग या पाटांनीं ओला होणार आहे.

तिन्ही नद्यांचे सर्व कालवे ४५५ मैल लांबीचे होतील. खर्चाचा अंदाज ३ कोटी ११ लक्ष रुपये लिहून ठेवलेला आहे.

म्हणजे या दोन योजनांखालीं दुष्काळी भागामधली १९ लक्ष ३८ हजार एकर जमीन येत आहे आणि समुद्रांत वाहून जाणारें ८०,००० दशलक्ष घनफूट पाणी सांठून तें या पाण्यासाठीं आसुसलेल्या भूमातेला मिळत आहे.

### ३७ पण कोयना ही महाराष्ट्राची भाग्यलक्ष्मी नव्हे काय ?

या प्रश्नाचें खरें उत्तर देणें आज संबंधितांना खपण्यासारखें नाहीं. प्रचारानें भुललेल्यांचा उमज मात्र आंकडेवारीनें पडेल.

पावसाचें पाणी डोंगरावर कोसळून तें नदीमुखानें समुद्राला जातें तें मधल्यामध्यें अडवून वांटवून शेतीला पुरवतात. पण कोयना ही त्या दृष्टीनें जरा विचित्र योजना आहे.

कोयनेच्या प्रवाहांतून १॥ लक्ष मेट्रिक घनफूट पाणी वहातें. त्यापैकीं पहिल्या अवस्थेंत ४०२१२ व दुसऱ्या अवस्थेंत ५२९०० मेट्रिक घनफूट म्हणजे सर्व नदीच्या पाण्यापैकीं जवळ जवळ ६२ टक्के पाणी महाराष्ट्रांत व पुढें हैदराबाद, म्हैसूर, मद्रास या मुलखांत जाऊं न देतां डोंगरांतच हेळवाकलीं अडवून व तें एका बोगद्यानें सह्याद्रीच्या त्या बाजूला म्हणजे कोकणांत घालवून अरबी समुद्रांत नेऊन टाकण्याची योजना म्हणजे कोयना योजना आहे.

हें इतकें सगळें पाणी १६०० फूट उंचीवरून खालीं धबधब्यासारखें सोडून त्यावर प्रत्येकीं ६० हजार किलोवॅटचीं ४ जनित्रें बसविलीं म्हणजे त्यांतून २ लक्ष ४० हजार किलोवॅट वीज निर्माण होईल व तीवर आपणांला स्वस्तांत कारखाने चालवितां येतील असा दक्षिण महाराष्ट्रीय कारखानदारांचा समज आहे.

तो गृहीत धरला तरी महाराष्ट्राचें मूळ दुखणें जें दुष्काळाचें म्हणजे शेतीला पाणी देण्याचें तें येवढें करून कायमच रहातें.

### ३८ कोयनेलाहि पाण्याचें अंग आहे म्हणतात ना ?

प्रचाराच्या फोडणीपुरतें आहे. पण अशा प्रचारपत्रकांतून जो ४ लक्ष एकर जमीन भिजण्याचा आंकडा दिलेला असतो तो दिशाभूल करणारा आहे. कोयना योजनेच्या ९० कोटी रुपये खर्चाच्या तिन्ही अवस्था पार पडल्या तर हे ४ लाख एकर भिजणार आहेत.

नदीचें पाणी कोणत्याहि एका भागाला वाटेल तसें वापरतां येत नसतें. उगमाजवळच्या लोकांनीं आपल्या दारांत ही नदी अडवून ती पलीकडच्या बाजूला समुद्रांत फेकून दिली तर पुढचे मुखाकडचे प्रदेश वैराण बनतील. याच मुद्द्यावर कोयनेच्या पाण्याच्या वांटणीसाठीं मद्रास, म्हैसूर, हैदराबाद या राज्यांच्या प्रतिनिधींची बैठक, वाटाघाट व भांडणेंहि झालीं.

त्यामुळें सध्यां प्रचलित अशी जी कोयना योजना आहे ती एका अवस्थेचीच असून तिला ३८ कोटी रुपये खर्च येईल. या योजनेनें पाटाखालीं भिजणाऱ्या जमिनीचा आंकडा प्रथम ८० हजार एकर जाहीर झाला. नंतर ४८ हजार एकर सांगण्यांत येऊं लागला व शेवटीं तर तो २५ हजारांपर्यंत उतरला. म्हणजे ही शेतीला पाणी पुरविण्याची योजना नव्हेच. पादपूरणार्थ चवैतुहि हीं अव्ययें योजावीं त्याप्रमाणें शोभून दिसण्यासाठीं हा शेतीचा विभाग.

### ३९ पण विहिरींवर विजेचे पंप बसवून शेतीला पाणी देतां येईल ना ?

भले शाबास ! म्हणजे ३८ कोटी रुपये खर्चून येवढें मोठें धरण बांधावयाचें आणि शेतकऱ्याच्या शेतांत पाट न नेतां शेवटीं त्याला विहीर खणून पाणी घे म्हणून सांगावयाचें. त्यामुळें दक्षिण महाराष्ट्रीय कारखानदारांचें पंपांचें उत्पादन वाढेल हें खरें. पण दरिद्री शेतकऱ्यांना विहीर खणण्यासाठीं कर्ज देण्याची एखादी योजना या कारखानदारांनीं आंखली आहे काय ? आणि आपल्या कारखान्यांतील विजेचे पंप हे महाभाग, शेतकरी महाराष्ट्रीय म्हणून त्यांना फुकट पुरवणार आहेत काय ?

### ४० विजेनें सर्पण वांचून झाडी, मग पाऊस येईल त्याचें काय ?

ही तर त्याहून और बढी झाली. आमच्या खेड्यापाड्यांतल्या धोंडाबाई-कोंडाबाई आणि गोदाबाई–हरणाबाई भाकर कोरड्यास करण्यास विजेच्या शेगड्या वापरतील. त्यामुळें सर्पण म्हणजे लाकडें लागणार नाहींत. मग झाडें तशींच न तुटतां शाबूत राहतील. अशीं एकएक झाडें सांठून उभ्या महाराष्ट्रांत घनघोर जंगल माजेल. या निबिड अरण्याला एक दिवस ढग अडतील नि मग शेतकऱ्याच्या शेतावर पाऊस कोसळेल ही सारी शेंदोनशें वर्षांची योजना झाली. तोंवर दुष्काळग्रस्त शेतकरी आप्यावर राहो म्हणजे झालें.





अनुक्रमणिका

### तर मग नव्वद कोटीची कोयना कां घेऊं नये ?

एक तर प्रांताप्रांतांच्या पाण्याच्या वांटणींत येवढें पाणी वापरतां येईल कीं नाहीं हा प्रश्न आहे. तसें तें वापरतां आलें तरी येवढी मोठी रक्कम उभी रहाणें कठीण आहे. अमेरिका प्रसन्न होऊन हीहि अडचण निपटली तरी ९० कोटी रुपये खर्चून ४ लाख एकरांना पाणी कोण पत्करील ? हिराकुड धरणालाहि जवळपास तेवढाच म्हणजे ९२ कोटी रुपये खर्च येईल. पण त्यांतून १९ लाख एकर जमिनींत पाट खेळतील. १५ कोटींच्या मयूराक्षीनें ६ लाख एकरांना पाणी मिळेल. येवढें कशाला ? खानदेशांतील गिरणा योजना घेतली तर ५ कोटींत २ लाख एकरांना पाणी मिळतें आहे. मुळा-कुकडीपुढें तर कोयना उभीच राहूं शकणार नाहीं.

### ४२ तर मग कोयनेचा गाजावाजा कां झाला ?

त्याला कांहीं विशिष्ट व कांहीं तात्कालिक कारणें आहेत. गेल्या वर्षी पाऊस कमी पडून तान्सांत पाणी कमी सांठल्यानें मुंबई सरकारनें मुंबईतील गिरण्या-कारखान्यांची ५० टक्के वीज कापली; त्यामुळें या कारखानदारांचें ६० कोटींचें नुकसान झालें आणि त्यांनीं विजेसाठीं कोलाहल माजविला. अशी वीजकपात एकूण १० कोटी युनिट झाली. त्यामुळें—

| | | |
|---|---|---|
| कापडगिरण्यांचें नुकसान | २७ | कोटींचें |
| इंजिनियरिंग धंद्याचें | ९ | कोटींचें |
| रसायनें, रंग यांचें | २ | कोटींचें |
| दगड कांच | २ | कोटींचें |

हें नुकसान मुंबईतील मुख्यतः गुजराती-मारवाडी कारखानदारांचें व भांडवलवाल्यांचें झालें. त्यामुळें अखिल भारतीय कारखानदार संघ, इंडियन मर्चंटस् चेंबर ऑफ कॉमर्स, असोसिएशन ऑफ इंडस्ट्रीज वगैरे गुजराथी-मारवाडी व्यापारी व कारखानदार संघांनीं ओरड केली; व आपल्या धंद्याला आतां कोयनेची वीज उपयोगीं पडेल हें हेरून कोयनेची मागणी उचलून धरली.

### ४३ महाराष्ट्रांत अशी ओरड कां झाली ?

कोयना अखिल महाराष्ट्राची म्हणून केवढाहि देखावा मांडण्यांत आला असला तरी ही मागणी मुख्यतः दक्षिण महाराष्ट्रीय कारखानदार संघानेंच नेटाला लावलेली आहे. त्यासाठीं या संस्थेनें कुरुंदवाड व हेळवाकला खूप खर्च करून दोन परिषदाहि भरवल्या आणि वृत्तपत्रांत प्रचाराची धूम माजविली.

त्यांच्या या महाराष्ट्रहितरक्षणाचें इंगित काय म्हणून पहाल तर धंदेवाईक स्वार्थ आणि नफा वाढण्याची काळजी याशिवाय अन्य आढळणार नाहीं.

दक्षिण महाराष्ट्रांतल्या या कारखानदारांना आपल्या कारखान्यांत जळण म्हणून विहारांतला कोळसा वापरावा लागतो. तो इतक्या लांबून येत असल्यानें आणि पुण्याला रेल्वेचें गेज बदलून चढउतार होत असल्यानें महागांत पडतो. त्यामुळें चढाओढींत पुढें न जातां येऊन धंद्यांत नफा किंवा कस कमी रहातो.

या विहारी कोळशाऐवजीं कोयनेची २ पैसे युनिटची वीज मिळाली तर कारखानदारी फळफळेल व गडगंज नफा कमावतां येईल असा त्यांचा हिशेब आहे.

कोयना ही त्यांच्या संपन्नतेची योजना आहे; व त्या संपन्नतेच्या मोठ्या त्यांनीं महाराष्ट्रांतील मोठमोठ्या विद्वानांच्या डोक्यावर मोठ्या कौशल्यानें चढवून दिल्या आहेत.

किर्लोस्करांनीं अशा रीतीनें आपल्या नांगराला मोठाले महाराष्ट्रीय पुरुष-वृषभ जोडले हें त्यांचें कौशल्य असलें तरी महाराष्ट्राचें दुर्दैव आहे.

महाराष्ट्रीय शेतकऱ्याला खरोखरी काय हवें ?

झोपडींत दिवा कीं शेतांत पाट ?

जीवन कीं सर्पण ?

### ४४ महाराष्ट्राला कारखानदारी विकास नकोच काय ?

नको कसा ? पाहिजेच. पण तो आतां नष्ट होत चाललेल्या बदनाम नि अहितावह खाजगी भांडवलदार पद्धतीनें नको असून, सहकारी पद्धतीवर हवा. हा मुद्दा पुढें घेऊं. पण तूर्त कोयनेच्या विजेनें महाराष्ट्राचा कारखान-दारी विकास तरी खरोखर होणार आहे काय ?

मुळींच नाहीं. कसें तें पहा :

कोयनेची वीज २ लक्ष ४० हजार किलोवॅट निर्माण होईल. त्यापैकीं मुंबईच्या गुजराथी-मारवाडी कारखानदारांना व नव्यानें स्थापन होत असलेल्या अमेरिकन तेल कंपन्यांना २ लक्ष किलोवॅट जाईल.

### ४५ उरलेल्या विजेतून महाराष्ट्रांत ' शेखावटी ' होईल ना ?

बिर्ला, दालमिया, गोएंका असे मोठमोठे कोट्यधीश उद्योगपति राज-स्थानमधल्या रत्नागिरीयेवढ्या प्रदेशांत झाले म्हणून आपणांस ' शेखावटी 'चें आकर्षण वाटतें. पण खरोखर शेखावटी म्हणजे काय ? तर मूळ मुलूख वैराण पाडून तेथल्या कारखानदारांनीं परप्रांतांत जाऊन कोट्यधीश होणें.

पाणी न मिळाल्यानें आमचा महाराष्ट्रहि उद्यां वैराण होईल व येथले किर्लोस्करांसारखे कारखानदार बाहेर प्रांतांत ( उदाहरणार्थ म्हैसूर ) जाऊन बिर्लाप्रमाणें कोट्यधीश बनतीलहि व नंतर नगरच्या साईबाबाला किंवा पंढरपूरच्या विठोबाला या अफाट कमाईतून ते जी दानदेणगी देतील तेवढ्यावर या दुष्काळपीडित भागांतले भुकिस्त त्यांचीं भजनेंहि गातील. पण यांत महाराष्ट्राचा कोणता फायदा झाला ?

खरोखरी 'किर्लोस्कर' मासिकानें महाराष्ट्राला शिकवलेल्या शास्त्रशुद्ध दृष्टिकोनाप्रमाणें महाराष्ट्रीय कारखानदार व विगरमहाराष्ट्रीय कारखानदार असा भेद करणें हें अशास्त्रीयच आहे. सर्वांची खाजगी भांडवलदारी कारखानदारी ही नफ्यासाठींच चालत असते व मजुरांच्या श्रमांतून मिळणाऱ्या वाढाव्यावर किंवा वर्धित मूल्यांवरच वाढत असते.

**४६ तें असो, पण हे महाराष्ट्रीय कारखानदार तरी पुढें येतील ना ?**

मुळींच नाहीं. कोयनेची वीज वापरून मोठाले कारखाने काढण्यास जें प्रचंड भांडवल लागेल तें आज दरिद्री महाराष्ट्राजवळ मुळींच नाहीं. आणि शेतकरी दुष्काळांत रहातो तोंवर सांचण्याची आशाहि नाहीं.

उलट आज गुजराथी मारवाड्यांजवळ तयार भांडवल आहे. उकाईच्या पाटानें त्यांची ६ लाख एकर जमीन भिजून त्यांच्या शेतकऱ्यांजवळ तें आणखी सांठत जाईल. अशा स्थितींत कोयनेची वीज तयार होतांच तिचा फायदा घेऊन ते आमच्याच जमिनीवर मोठाले कारखाने पटापट काढतील.

पंचवार्षिक योजनेच्या झारींतून जें चारदोन पळ्या तूप महाराष्ट्राच्या भूमीवर पडणार तें शेतकऱ्याच्या भाकरीवर न जातां स्वतांच्या पोळीवर चोपडून घेण्यासाठीं दक्षिणी कारखानदारांनीं हा बनाव रचला आहे खरा.

पण एकदां गुजराथी मारवाड्यांचें प्रचंड भांडवलाचे अवाढव्य कारखाने कोयनेच्या विजेसाठीं महाराष्ट्रांत आले म्हणजे हे छोटे कारखानदार भुशासारखे उडून जातील.

बँका, विमा कंपन्या वगैरे आर्थिक नियंत्रणांतील महत्त्वाच्या संस्था गुजरमारवाड्यांच्या ताब्यांत असल्यानें त्यांना या महाराष्ट्रीय कारखान्यांच्या नाड्या आंखडून थंडगार पाडण्यास विलंब लागणार नाहीं. मोठ्या माशानें छोट्या माशास गिळावें हा भांडवली जगांतला न्याय व नित्य व्यवहार आहे.

**४७ कोयनेच्या विजेवर निदान ग्रामोद्योग चालणार नाहींत काय ?**

या बाबतींत नेहमीं जपानचें उदाहरण घेण्यांत येतें. पण त्यांची कारखानदारी पद्धतीच भिन्न आहे. प्रचंड प्रमाणावर त्यांचा एक असा कारखाना नसतोच. तर झोंपडींतून लहान लहान सुटे भाग तयार करून शेवटीं ते कुठें तरी एकत्र जोडतात. आपणांकडे उत्पादनाची ही पद्धति नाहीं. येथें ठिकठिकाणीं थोड्या थोड्या लोकांकडून उत्पादन न होतां अमेरिकेप्रमाणें एकाच छपराखालीं हजारों मजूर सर्व कांहीं करतात.

झोंपडींतला शेतकरी विजेवर चालणारीं उपकरणीं किंवा माग घेऊं शकेल हें आधीं अशक्य आहे. त्यानें तो तसा घेतलाच तर आपली उत्पादन-पद्धति जपानप्रमाणें नसल्यानें गिरण्यांच्या अवाढव्य उत्पादनापुढें चढाओढींत तो टिकणार नाहीं. आणि पूर्वी लँकेशायरचें कापड येतांच लक्षावधि हातमागवाले धुळीला मिळाले तसें पुन्हा होईल.

**४८ तर मग महाराष्ट्राची कारखानदारी होणारच नाहीं काय ?**

कोण म्हणतो होणार नाहीं ? पण त्याचे मार्ग निराळे आहेत. कोयना वीज हा खात्रीनें नव्हे. श्रीकृष्णानें सत्यभामेच्या हट्टासाठीं तिच्या अंगणांत पारिजातकाचें झाड लावलें, पण फुलांचा सडा मात्र रुक्मिणीच्या दारांत, तसें महाराष्ट्राच्या हट्टासाठीं म्हणून हेळवाकला धरण बांधतील आणि त्याचीं फळें-फुलें मुंबईला (व येथेंहि) परक्या भांडवलदारांच्या ओटीलींत पडतील.

त्याऐवजीं मुळा-कुकडीसारख्या योजना पत्करल्या तर थोडक्या खर्चांत काम भागून आपल्या जमिनीला पाणी मिळेल. असें पाणी मिळालें म्हणजे जमीन समृद्ध होऊन शेतकऱ्याच्या गांठीस चार पैसे सांठतील, व पुढें या पैशावर सहकारी पद्धतीनें कारखाने काढतां येतील. नगरला प्रवरेच्या पाटानें ज्यांची जमीन फुलली अशा शेतकऱ्यांनीं सहकारी तत्त्वावर साखरेचा कारखाना काढून ही दिशा दाखविली आहे. हेंच सर्व महाराष्ट्रांत घडेल व तें अंतिमदृष्ट्या कायमच्या कल्याणाचें ठरेल. आपणांला उद्दिष्ट असणारें सहकारी संघराज्यहि खरोखर याच मार्गानें निर्माण होईल. भांडवलदारी स्पर्धा व कोंडींतून नवी वाट काढण्याचाहि हाच मार्ग आहे.

**४९ तर मग पाट व कोयना दोन्ही एकदम कां घेऊं नयेत ?**

पहिलें कारण त्या तशा घेण्याइतका पैसा मिळणार नाहीं. दोन्ही योजनांना कमींत कमी ५० कोटी रुपये लागतील. महाराष्ट्राला ५० कोटी, कर्नाटकाला ५० कोटी, गुजराथला ५० कोटी अशा रीतीनें भांडण टाळून एकट्या मुंबई राज्याचा हिशेब १॥ अब्जावर जाईल. भारतांत राज्यें २५ असल्यानें त्या सर्वांचा खर्च ३७॥ अब्ज होईल. इतके पैसे आकाशांतून पडणार आहेत काय ? सारी पंचवार्षिक योजनाच मुळीं २० अब्जांची आहे. ती पार पडो म्हणजे जिंकली.

दुसरें याहून महत्त्वाचें कारण असें कीं, पाण्याआधीं वीज हा घोड्यापुढें गाडी जोडण्यासारखा प्रकार आहे. महाराष्ट्राच्या शेतकऱ्याला पाणी मिळून २५ वर्षें त्याच्याजवळ पैसा सांठल्याखेरीज विजेचा त्याला कांहींच उपयोग करून घेतां येणार नाहीं. उलट हा पैसा सांठेतोंवर परकी भांडवलवाले वीज वापरून महाराष्ट्रावर स्वार होऊन बसतील. स्वराज्यानंतर इंग्रज भांडवलदारांनीं देशी भांडवलदारांना भागींत घेऊन त्यांच्या आडून कारखाने काढले त्याप्रमाणें महाराष्ट्राचा संभाव्य असंतोष शमविण्यासाठीं परप्रांतीय कारखानदार महाराष्ट्रीय कारखानदारांना नफ्याचा वांटा देऊन पार्तीत घेतील व त्यांच्या पदराआडून आपले पाश पसरतील. शेवटीं साखरकारखानदारांनीं शेतकऱ्याच्या जमिनी फार थोड्या खंडांत बळकावल्या त्याप्रमाणें हे परप्रांतीय कारखानदारहि दुष्काळांत आपल्या जमिनी थोडक्यांत घेऊन आपणाला निव्वळ मजूर बनवतील. कोयना ही आज महाराष्ट्राला मजूर बनविणारी योजना आहे. दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना जमिनी फुंकून परक्यांच्या कारखान्यांत पाठ्या टाकण्याखेरीज गतीच उरणार नाहीं.

त्याऐवजीं आज विजेची गोष्टच न काढतां फक्त पाटांवर जोर बांधून ते मिळविले तर १०-२० वर्षांत महाराष्ट्राचा चेहरामोहरा पालटून ही महाराष्ट्र सुंदरी सुजला, सुफला, सस्यशामला बनेल. तोंवर कोयना कांहीं कुणी परप्रांतात उचलून नेत नाहीं. घरचें भांडवल तयार झाल्यावर सावकाश कोयना हातांत घेऊन ती आमची आम्ही वापरूं व सहकारी तत्त्वावर कारखानदारी उभारूं.

**५० मग आज फक्त पाटबंधारेच घ्यावेत ?**

हें सांगण्याची गरज खरी पडूं नये. पण तीं तशी पडली म्हणून हातचें कांकण पाहण्यासाठीं हा एवढा मोठा आरसा दाखवावा लागला. निसर्गाच्या कृपेनें महाराष्ट्राला सह्याद्रीसारखा कडा पाठीशीं व अंगाखांद्यावर गोदा, भीमा, कृष्णा अशा लोकमाता लाभलेल्या आहेत. सह्याद्रींत शेंकडों इंच पाऊस व या लोकमातांचें लक्षावधि घागरी स्तन्य आपल्या अंगावरून जात असतां आपण दरिद्र्यासारखें आकाशाकडे पहात दुष्काळी जीवन कंठावें हा खरोखरी येवढ्या उदारपणानें दैवी देणें येथें उधळणाऱ्या अनंतहस्त कमलाकराचा अपमान व स्वकर्तृत्वाची विटंबना आहे. ती आपण आतां ओळखावी व या लोकमातांचें स्तन्य पिऊन चांगलें गुटगुटीत बाळसें धरावें.

**जय हिंद ! जय महाराष्ट्र !**

अनुक्रमणिका



# गंगा-यमुना डोळ्यांत उभ्या कां?

भा. वि. नाडकर्णी

[ दृश्यः ऐका लहानशा ऑफिसचें. एका बाजूच्या दोन टेबलांपाशीं दोन स्त्री कारकून —कुमारी निमा काळे आणि सुमा ढवळे या बसल्या आहेत. बाकीच्या टेबलांपाशीं कांहीं पुरुष कारकून मंडळी दिसत आहे. त्यांच्या मधूनमधून आपापसांत गप्पा चालल्या आहेत. परंतु आपल्याला या वेळीं कु. निमा काळे आणि कु. सुमा ढवळे यांच्याच संभाषणाशीं कर्तव्य आहे. ऐका, ऐका त्यांचे मधु बोल ! ]

**निमा काळे** : अय्याऽ ! अग सुमा !—

**सुमा ढवळे** : काय ग ?

**नि. काळे** : तें पाहिलंस का ?

**सु. ढवळे** : अय्या ! कुणी लावली ग ती ?

**नि. काळे** : आणखी कुणी ! साहेबांनींच लावली असली पाहिजे—

**सु. ढवळे** : साहेबांनीं ? साहेब कशाला लावतील ती ?

**नि. काळे** : तुझ्या डोळ्यांत उभ्या राहतात ना त्या सदान् कदा !

**सु. ढवळे** : नि, तुझ्या नाहीं राहत ? तरी बरं, मघां साहेबांच्या रूममधून बाहेर पडतांना हुंदके देतच बाहेर पडलीस तूं !—

**नि. काळे** : सुमा !—मी हुंदके देत होतें ? मी नुस्ती मुस्कारत होतें ! तूं जर असे भलते आरोप करशील, तर मात्र मला आतां रडूं येईल !

**सु. ढवळे** : हं. हं. पण आतां नाहीं तें चालायचं ! ती पाटी पाहिलीस ? 'येथें रडण्याची सक्त मनाई आहे !'

**नि. काळे** : काय मेला छळ तरी ! रडायचीसुद्धां चोरी माणसाला ! मी आतां राजीनामा देऊनच टाकणार आहें !

**सु. ढवळे** : मी देखील ! इथं म्हणजे एवढीसुद्धां सवलत नाहीं मुलींना ! दुसऱ्या ऑफिसांत पहा म्हणावं. अग, ती अडवानी कंपनींत सरला पितळे आहे ना ती जरा मुसमुसायला लागली कीं स्वतः हेडक्लार्क आपलं कामं बाजूला सारून तिचं काम करून देतात !

**नि. काळे** : नि ती शरयू चित्रे ! अग तिचं नाक जरा कुठं लाल झालेलं दिसलं कीं, सुपरिटेंडेंट–हेडक्लार्क सारे एकदम धांवून येतात तिची समजूत घालायला ! न् मग तिला सुट्टी सबंध दिवस ! त्यामुळें आतां ती नाकालाच लिपस्टिक लावून येते !

**सु. ढवळे** : पहा ! न् मेलं इथं सारंच कांहीं जगावेगळं !—ए निमा, हें काम कुणाचं असलं पाहिजे सांगू तुला ?

**नि. काळे** : मला ठाऊक आहे, सुपरिटेंडेंट जोग दंडांनींच लावलीय मुद्दाम ही पाटी—त्यांचा राग आहे माझ्यावर !—माझी दोन महिन्यांची रजासुद्धां सँक्शन करीत नव्हते ते !

**सु. ढवळे** : तुझ्यापेक्षां माझ्यावरच अधिक आहे हो राग त्यांचा !

**नि. काळे** : सुमा ! खोटं बोलायलासुद्धां कांहीं वाटत नाहीं ! तुझ्यावर कशाला रागावतील ते ?

**सु. ढवळे** : अन् तुझ्यावर तरी, कशाला कशाला रागावतील ? तूं रजा घेतलीस म्हणून राग कशाला येईल त्यांना ? उलट म्हणायचे सुंठीवांचून खोकला गेला !

**नि. काळे** : नि तुझा खोकला घालविण्यासाठीं ही सुंठ उगाळून ठेवली आहे वाटतं ?

**सु. ढवळे** : कोणती सुंठ ?

**नि. काळे** : ही त्या पाटीची ! त्यांना वाटतंय् ही पाटी लावली कीं तूं राजीनामा देऊन जाशील ऑफिस सोडून !

**सु. ढवळे** : मी मुळींच नाहीं राजीनामा देणार. तूंच दे हवा तर !

**नि. काळे** : मी नाहीं देणार ! मी इथंच राहणार आहें !

(बाजूचा एक कारकून डोंगरे त्यांच्या टेबलाजवळ येतो.)

**डोंगरे** : मिस काळे, त्या याची फाइल देतां का जरा ?

**नि. काळे** : (आळसावलेल्या स्वरात) मला नाहीं बाई मिळत !—तुम्हीच घ्या ना पाहून !

**डोंगरे** : अहो, पण तुमच्या पुढ्यांतच आहे कीं ती !

**सु. ढवळे** : हे बाई ! माझ्या पुढ्यांत फाईल आहे हें तुम्हांला दिसतंय नि तुम्हांला घेतां येत नाहीं !

**डोंगरे** : मिस ढवळे, आज हेड ऑफिसांतून सर्कल इन्स्पेक्टर येणार आहेत ऑफिस तपासायला ! तेव्हां सुपरिंटेंडेंटनीं सांगितलंय, आज झटपट कामें उरकलीं पाहिजेत ! न् तुम्ही वेळ काढतांहां !

**सु. ढवळे** : (फणकाऱ्यानें) मी वेळ काढतें आहें ? हा कामाचा भारा टाकला आहे माझ्या डोक्यावर !—(मुसमुसत) मेलं सकाळपासनं मरमर मरायचं अन् तरी लोक म्हणताहेत, तुम्ही वेळ काढतां आहां !

**नि. काळे** : किती मेला छळ तरी बाई ! यांना वाटतं, मुलींना कामावर घेतों, हे उपकारच करतों त्यांच्यावर !

**सु. ढवळे** : नि जरा तरी कुणी मेले हेल्प करतील तर शपथ !

**नि. काळे** : अग, कॉलेजांतले आमचे प्रोफेसर पेपरसुद्धां लिहून द्यायचे—सर, हेल्प करा, म्हटलं कीं !






**सु. ढवळे** : अग, माझ्या डोळ्यांत कुठं जरा टिपूस उभं राहिलेलं पाहिलं नुस्तं आमच्या प्रिन्सिपॉलनीं नि लगेच मला चांगले वीस ग्रेस मार्क देऊन क्लाससुद्धां देऊन टाकला !

**नि. काळे** : पण इथं भावना म्हणून कांहीं ठाऊकच नाहीं इथच्या या लोकांना ! (हुंदका देऊन) जेव्हां पहावं तेव्हां, 'मिस काळे तक्रार करावी लागेल तुमच्याविरुद्ध' !

**डोंगरे** : अहो, अहो—पण तुम्हांला कोण काय बोललं आहे ? तुम्हीं कां—उगाच कां उगाच—

**नि. काळे** : (स्फुंदत) आज नाहीं—पण काल बोलला होतां !

**सु. ढवळे** : (स्फुंदत) आज मला बोललांत !

**डोंगरे** : अहो, पण काय एवढं बोललों ? अन् तुम्हांला बोललों तर मिस काळ्यांना कां लागावं तें ?

**नि. काळे** : कां लागावं ? म्हणजे मला मिस ढवळ्यांच्याबद्दल सहानुभूतीसुद्धां वाटूं नये ?

**डोंगरे** : म्हणजे ही—ही सहानुभूति व्यक्त करतां कीं काय तुम्ही ?

**सु. ढवळे** : (हुंदका देऊन) नाहीं ग बाई ! इथं हृदयच नाहीं कुणाला !

**डोंगरे** : (धांदलीनें) अहो, अहो—शू–शू ! ती पाटी—ती पहा ! ऑफिसच्या नियमाचा भंग होतोय तुमच्याकडून ! पहा ती पाटी !

**नि. काळे** : मला या वेळीं कोणतीच पाटी दिसत नाहीं—मला तुमचीं कठोर अंतःकरणं दिसताहेत—(पुन्हा हुंदका)

**डोंगरे** : अहो–अहो ! मी–मी घेतों हो घेतों ती फाईल ! पण—पण हें नको–हें आवरा ! हं झालं, देव पावला—हे सुपरिंटेंडेंट जोगदंडच आले ! ते घालतील तुमची समजूत ! मी जातों आपला !

(सुपरिंटेंडेंट जोगदंड प्रवेशतात.)

**जोगदंड** : काय म्हणतां आहां डोंगरे ?

**डोंगरे** : मी कांहीं नाहीं म्हणत ! या कांहीं म्हणताहेत, त्यांनाच सांगा काय तें ! मी जातों. (जातो.)

**जोगदंड** : काय हो, काय म्हणतां आहां ?

**सु. ढवळे** : का हो, ती पाटी कुणी लावली ?

**जोगदंड** : ती पाटी ना ? मींच लावली ती !—पण ती स्टाफकरितां नव्हे !

**नि. काळे** : अगबाई, मग कुणाकरितं ?

**जोगदंड** : ते इन्स्पेक्टर हळवे येणार आहेत ऑफिस तपासायला—त्यांच्याकरितां !

**सु. ढवळे** : म्हणजे ? ते रडतात कीं काय ?

**जोगदंड** : ते रडतात पण तुमच्याप्रमाणं नाहीं !

**सु. ढवळे** : आमच्याप्रमाणं ? म्हणजे आम्ही रडतां ?—(स्फुंदत) काय आरोप तरी !

**जोगदंड** : (घाईघाईनें) अहो—अहो ! तसं नव्हे–तसं नव्हे ! तुमच्याप्रमाणं म्हणजे असं—म्हणजे असं कीं तुम्ही कसं अगदीं गोड रडतां—रडतां म्हणजे–म्हणजे भावना व्यक्त करतां अन् त्यामुळं अंतःकरणांत—इथं या हृदयांत जसं कसंसंच व्हायला लागतं—

**नि. काळे** : (एकदम उत्सुकतेनें) होय ? खरंच ? हृदयांत व्हायला लागतं ?

**सु. ढवळे** : अगबाई ! कसंसंच व्हायला लागतं ?

**जोगदंड** : हो ना ! कसंसंच म्हणजे–म्हणजे असं कीं तें कांहीं सांगतांच येत नाहीं ! सारं हृदय—अंतःकरण अगदीं कसं उचंबळून येतं ! आः आः ! काय होतं नि काय नाहीं—

**नि. काळे** : हो का ! (लाडिक स्वर) छे ! कांहीं तरीच सांगतां आहां तुम्ही !

**जोगदंड** : कांहीं तरीच नव्हे ! अगदीं तुमच्या कंठाशपथ ? तुमच्या गळ्यांतून ते स्फुंदन स्वर बाहेर पडले कीं इथं—या हृदयांत कोण खळबळ माजते, किती गोड स्पंदन होतं ! किती मधुर ठोके पडतात आणि असं वाटतं—असं वाटतं—सांगूं तुम्हांला !—

**सु. ढवळे** : इश्श ! नको बाई ! इथं नको !

**नि. काळे** : इश्श ! ही का जागा त्या भावना व्यक्त करायची ? मेला सगळा इथं भावनाशून्य कारभार ! या मेल्या फायली न तीं लेटर्स—

**जोगदंड** : पण त्या फायलींवर केव्हां केव्हां जीं आंसवं गळलेलीं असतात, तीं स्वातीच्या पर्जन्यबिंदूंप्रमाणं ह्या माझ्या हृदयाच्या शिंपल्यांत हळूच शिरकाव करून बसतात अन् तिथं त्यांचे गुलगुलीत गुलाबी भावमौक्तिकांचे सर गुंफले जातात !

**सु. ढवळे** : अय्या ! किती छान बोलतां हो तुम्ही !

**नि. काळे** : किती काव्यमय ! इतकं काव्यमय हृदय त्या खाकी बुशकोटाच्या आंत दडून राहिलं असेल अशी होईल का कुणाला कल्पना ? पण मला होतं हो माहीत—

**सु. ढवळे** : मलासुद्धां—

**जोगदंड** : प्रसंगाशिवाय माणसाच्या अंतः-करणाची नाहीं कल्पना येत ! आतां त्या पार्टीनं हा दिल खुला करण्याचा प्रसंग आणून दिला. तात्पर्य काय—

**नि. काळे** : (अधीरपणें) काय तात्पर्य ?

**जोगदंड** : तात्पर्य असं कीं, ही पार्टी त्या इन्स्पेक्टर हळव्यांसाठीं लावलेली आहे. त्या गृह-स्थाची चिरचिर आल्या क्षणापासून चालू असते. 'असंच कां केलं नाहींत, तसंच कां नाहीं? किती हें ॲरिअर आहे—किती स्लो वर्क—किती मिस्टेक्स—' सारखी पिरपिर—सारखी रड ! तेव्हां म्हटलं; ही अशी पार्टी तरी लावून पाहावी, पडला डोक्यांत प्रकाश तर पडला ! तुमच्या-विषयीं म्हणाल तर—

**नि. काळे आणि सु. ढवळे** : (एक-समयावच्छेदें) तर काय ? तर काय ?

**जोगदंड** : तुमच्याविषयीं म्हणाल तर हा कधीं कधीं होणारा नाजुक भावनोद्रेक मला फार फार आवडतो—अरेच्चा ! पण ही स्वारी आली वाटतं. त्यांच्या स्वागताला गेलं पाहिजे. नाहीं तर तेवढ्यानंच शेरा वाईट मिळायचा ! अच्छा !

**नि. काळे, सु. ढवळे** : अच्छा !—अच्छा !

**नि. काळे** : सांगितलं नव्हतं मघां सुमा तुला ? जोगदंड तसे स्वभावाचे उमदे, जरासे लहरी आहेत एवढंच !—

**सु. ढवळे** : माझ्या केव्हांपासनं लक्षांत आलं आहे तें !—मोझ्याकडे वागतांना नेहमीं असंच वागतात ते ! तूं त्यांना या वेळींच असं बोलतांना पाहिलं असशील—पण माझ्याशीं कितीदां तरी असं बोलले आहेत ते !

**नि. काळे** : अन् माझ्याशी नाहीं ? अग, मला त्यांनीं आपल्या अगदीं खाजगी गोष्टीसुद्धां सांगितल्या आहेत !

**सु. ढवळे** : खाजगी गोष्टी म्हणजे काय त्यांचं लग्न अद्यापि झालेलं नाहीं हेंच ना ? तें साऱ्या ऑफिसला ठाऊक आहे !—पण मला त्यांच्या अंतर्यामींच्या अगदीं आंतल्या गोष्टी ठाऊक आहेत !—

**नि. काळे** : मनच असलं आहे म्हणेनास ! घे समजूत करून तूं !

**सु. ढवळे** : अच्या ऽ ! अग, पण तो इन्स्पे-क्टर इथंच पाहायला लागला आहे ! इथंच येणार वाटतं ! अग बाई, माझ्या या चार महिन्यांपूर्वींच्या एंट्रीज अजून भरायच्या राहिल्या आहेत !

**नि. काळे** : नि माझंसुद्धां हें बुक तसंच लिहायचं राहिलं आहे सहा महिने !

**सु. ढवळे** : अन् आतां त्या इन्स्पेक्टरनं हें ॲरिअरमध्यें राहिलेलं काम पाहिलं म्हणजे—

**नि. काळे** : अग, ते हे म्हणालेच नाहीं का तो चिरचिराच आहे म्हणून ! आमचं काम अपटुडेट असतं तरी त्याची चिरचिर सुटली नसती !

**सु. ढवळे** : हो बाई ! कां म्हणून भ्यायचं त्याला ?—वाघ म्हटलं तरी खाणार, वाघोबा म्हटलं तरी खाणार, मग वाघ्याच कां म्हणूं नये ?

**नि. काळे** : वाघ्या तरी कसला ! बावळटच दिसतो आहे ! अगबाई, इथंच वळली वाटतं स्वारी ! ए—ए, तें बुक तरी उघडून ठेव !

**सु. ढवळे** : अगबाई ! माझं पेन ? पेन कुठं गेलं ? विसरल्यें वाटतं लेडीज रूममध्यें ! ए—ए—तुझं पेन देना जरा !

**नि. काळे** : वा, वा, अन् मीं काय करूं ?

**सु. ढवळे** : तो रबर आहेना तुझ्या हातांत, त्यानं खोडत बैस ना कांहीं तरी ! पेन दे मला !—

**नि. काळे** : मग हा रबरच घे !

**सु. ढवळे** : अश्शी आहे ! वेळीं अड-चणीला जरा नाहीं उपयोगीं पडायची न् म्हणे मैत्रीण !—

**नि. काळे** : अग बाई ! माझ्या या पर्स-मधली आरशी न् पावडर पफ कुठं गेला ?—

**सु. ढवळे** : बरं झालं गेला तर ! माझी आरशी न् पफ नाहीं आतां मी देणार !

**नि. काळे** : नि हवा कुणाला ? त्या बावळट ध्यानासाठीं पावडर हवी कशाला लावायला ! तूंच बैस लावून !

**सु. ढवळे** : गप्प गप्प ! तो आला पहा !

(इन्स्पेक्टर हळवे व सुपरिंटेंडेंट जोगदंड येतात.)

**जोगदंड** : (दोघींची ओळख करून देत) ह्या मिस् ढवळे न् ह्या मिस् काळे !—ह्यांच्याकडे हें अकाउंटस् लिहायचं काम आहे नि यांच्याकडे रजिस्टर बुक—

**इ. हळवे** : ओ आय सी ! पाहूं तुमचीं बुकं जरा !—ओः ! हीं या महिन्यांतलीं पानं कोरींच आहेत !—

**नि. काळे** : अग बाई, विसरल्यें कीं काय मी ! मेली आठवणच राहत नाहीं !

**इ. हळवे** : अन् मिस ढवळे, तुम्हांलाहि आठवण राहिलेली दिसत नाहीं ! (तिच्या पुढ्यां-तील बुक चाळतां चाळतां एकदम धावरून पटकन्





अनुक्रमणिका

मिटतो) अरे बापरे ! अहो–अहो—हें काय ? हें काय ?

**जोगदंड** : काय—काय झालं ?

**इ. हळबे** : कुणी तरी—कुणी तरी प्राणी जनावर दडून राहिलं आहे त्या बुकामध्यें !— झुरळ—पाल—विंचू—उंदीर—हरेराम ! मिस ढवळे, किती दिवसांत हीं पुस्तकं तुम्हीं उघडलीं नाहींत ?—

**सु. ढवळे** : मेले हे इथचे प्यून कामचुकार झालेत ! पुस्तकं झाडीतच नाहींत नि त्याबद्दल आम्हांला मात्र उगाच बोलणीं खावीं लागतात ! (स्वर रडवा)

**जोगदंड** : राघू, राघू! अरे तें बुक घे झाडून !

(राघू बुक उघडून झाडतो.)

**राघू** : झुरळीं न्हाईत साहेब! आर्रर! पर ह्यं काय? ही काळी नागीण—

**इ. हळबे** : नागीण? काळी नागीण? ना–न–न–न–न (बोबडी वळल्यामुळें शब्द फुटत नाहींत.)

**सु. ढवळे** : (किंचाळून)—अग बाई ! नागीण ! माझ्या बुकांत नागीण आणून कुणी ठेवली? यांचंच काम असलं पाहिजे !—अग आईग! मेले माणसाच्या प्राणावरच उठले आतां !—

**जोगदंड** : अरे राघू! तिला काढ, बाहेर काढ! थांब–थांब. पण अगोदर काठी–चप्पल कांहीं तरी घे–घे !—

**राघू** : आर् तिच्या! नागीण न्हवं कांहीं–घोण बी न्हाई !—अव, शेपटा हाय केसांचा ! नि काळे आंकडे, पिना—गंगावन म्हनत्यात तें का काय—

**सु. ढवळे** : अग बाई! गंगावन? तें कसं आलं तिथं? तुझं का ग?

**नि. काळे** : वा! वा! मी गंगावन वापरतें आहें?—

**सु. ढवळे** : अन् मी तरी कशाला वापरतेंय्! ही माझी वेणी कशी सडक आहे!—कुणी तरी हे टकल्यांले क्लार्कच वापरीत असतील! त्यांचंच असेल तें कुणाचं तरी!

**इ. हळबे** : (एक आवंढा गिळून अतिशय गंभीरपणें) कुणाचंहि असू द्या! पण हें ऑफिसच्या शिस्तीविरुद्ध आहे!—मिस ढवळे आणि मिस काळे, रजिस्टर बुकांत आंकडे, ब्रॉचपिना, गंगावनं नि लिपस्टिका घालून ठेवणं हें ऑफिसच्या नियमांना धरून नाहीं, हें मी तुमच्या नजरेस आणूं इच्छितों !—

**सु. ढवळे** : (हुंदका देऊन) नसता आरोप आहे हा माझ्यावर! मी का ब्रॉचपिनानं लिहितें आहें?—हें माझं चांगलं फाउंटनपेन आहे— कॉलेजांत मला प्रेझेंट दिलेलं !

**नि. काळे** : (हुंदका देऊन) अन् मी का ब्रॉचपिना नि गंगावनं वापरतें आहें?—एखाद्याला बोल ठेवायचा असला म्हणजे काय वाटेल तें कारण पुरतं! (हुंदके अधिक होतात.)

**इ. हळबे** : अरे! अरे!—अहो अहो— (दोघींच्याहि हुंदक्यांना ऊत येतो.) शू : श : शू :—(तो बावरून जातो.)

**सु. ढवळे** : (स्फुंदत) किती म्हणून छळ सोसायचा माणसानं! क्षुल्लक ब्रॉचपिन. ती काय नि म्हणे नागीण नि साप ठेवले आहेत बुकांत! देवा! देवा! तुलासुद्धां नाहींत का रे डोळे!

**इ. हळबे** : अहो अहो! मी तसं—तसं-मी म्हणालों नाहीं–मी तसं—

**नि. काळे** : (स्फुंदत) तरी बरं, सबंध दिवस डोकं खुपसून राहतें त्या पुस्तकांत! कदाचित् त्यामुळंच ती पिन पडली असेल त्यांत! पण तरी म्हणे पानं कोरींच! तुम्ही कामच करीत





अनुक्रमणिका

नाहीं !—नाहीं ग बाई ! इथं न्यायच नाहीं ! हृदयच नाहीं कुणाला ! ( हुंदके देते. )

**इ. हळवे :** ( घाबरून एकदम ओरडतो ) हेल्प ! हेल्प !—अहो जोगदंड ! हेल्प मी ! हेल्प मी ! सेव्ह मी—मला वांचवा ! मला वांचवा !

**जोगदंड :** काय झालं सर ? कसली हेल्प हवी आहे ? तपासणीबाबत—

**इ. हळवे :** नो, नो ! हें—हें—यांना पहा —यांना पहा ! यांना सांगा कांहीं तरी—आय ॲम् गोइंग !

**जोगदंड :** पण ही तपासणी संपली नाहीं ना अजून ?

**इ. हळवे :** नाहीं—संपली, संपली ! आटो-पली ! सारीच तपासणी संपली ! नाऊ आय गो—आय गो—

( झपाट्यानं निघून जातो. मागोमाग जोग-दंडहि जातो. )

**नि. काळे :** शूः शूः ! सुमा, अग गेला कीं ग तो !

**सु. ढवळे :** (डोळ्यांवरचे हात काढून) गेला ? बरं झालं बाई लवकर गेला ! मला वाटलं होतं, आतां काय काय शिव्या देतो कुणाला ठाऊक !

**नि. काळे :** कसल्या देतो आहे शिव्या ! अगदींच बावळट दिसतो आहे ! कुणी ग केलं याला इन्स्पेक्टर ?

**सु. ढवळे :** मीं पाहिल्याबरोबरच केली परीक्षा ? नव्हतं तुला सांगितलं ?

**नि. काळे :** पण आपल्याबद्दल काय रिपोर्ट करील ग तो ?

**सु. ढवळे :** काय करतो आहे रिपोर्ट ! आमच्याबर त्यानें नसते आरोप कशाला केले ? म्हणे झुरळीं, पालीं, विंचू, साप, नागिणी पुस्तकांत ठेवलीं आहेत !—

**नि. काळे :** अन् केलान् रिपोर्ट तरी जोगदंड घेतील माझी बाजू !

**सु. ढवळे :** तुझी ? तुझी बाजू घ्यायचं काय कारण त्यांना ? मला वाटतं—

**नि. काळे :** काय वाटतं ?

**सु. ढवळे :** तुझ्यापेक्षां माझीच बाजू घेतील तें !

**नि. काळे :** तर तर ! पण वाटतं तसं नसतं बाईसाहेब !—थांब, पण हे जोगदंडच येताहेत. विचारूं त्यांना !

**सु. ढवळे :** थांब, थांब. मीच विचारतें प्रथम ! (जोगदंड प्रवेशतो, त्याला) काय हो—

**जोगदंड :** थांबा ! तुम्ही कांहीं विचारण्या-पूर्वीं मीच तुम्हांला एक आनंदाची बातमी सांगतों !

**सु. ढवळे :** अय्या ऽ ! आनंदाची ?

**नि. काळे :** अग बाई ! आनंदाची ? कसली बाई ?

**जोगदंड :** अत्यंत आनंदाची !—इथचा हा स्टाफ मॅनेज करणं अत्यंत अवघड असतांहि मीं तो इतक्या सफाईदारपणं आज अनेक महिने मॅनेज करतों आहें म्हणून इन्स्पेक्टर हळव्यांनीं माझं अभिनंदन केलं अन् मला तावडतोब खास प्रमोशन मिळावं म्हणून स्ट्राँग रेकमेंडेशन केलं रिपोर्टांत !

**सु. ढवळे :** कॉंग्रॅट्स् ! कॉंग्रॅट्स्—जोगदंड !

**नि. काळे :** प्रथम माझे कॉंग्रॅट्स् ॲक्सेप्ट् करा हं जोगदंड !—मला किती किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं !—

**सु. ढवळे :** नि माझं अंतःकरण तर हर्ष-भरानं नाचूंच लागलं आहे !

**जोगदंड :** थँक्यू ! आणि आतां तुम्हांला एक गुपित सांगतों—

**नि. काळे :** इश्श ! गुपित न् तें इथं ?

**सु. ढवळे :** इश्श ! या ठिकाणीं का असलीं गोड गुपितं सांगायचीं असतात ?

**जोगदंड :** आतां तो इन्स्पेक्टर गेलेला असल्यामुळं इथंहि तें सांगायला कांहीं हरकत नाहीं ! तेव्हां बरं का—तो इन्स्पेक्टर फार

हळवा. मुलींच्या डोळ्यांतनं गंगायमुना वहायला लागल्या कीं एकदम घाबरून जातो तो, हें मला माहीत होतं. म्हणून त्याला खुष करण्यासाठीं ती पाटी मींच तिथं लावून ठेवली होती! त्या पाटीचा तुमच्यावर कांहीं परिणाम होणार नाहीं, झाला तर उलटच परिणाम होईल ही मला खात्रीच होती!—तुमच्या गंगायमुनांच्या पुरांत तो एकदम वाहून जाईल आणि हें इतकं ॲरिअरमध्यें राहिलेलं काम त्यांच्या नजरेंत येणार नाहीं अशीहि माझी अपेक्षा होती. आणि त्या अपेक्षेप्रमाणंच आलंहि सारं घडून! त्यांत तुम्ही मला अप्रत्यक्षपणं साह्य दिलंत याबद्दल मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतों!—अन् आतां एका गोड समारंभाचं तुम्हांला आमंत्रण देऊन ठेवतों!

**सु. ढवळे** : अय्याऽ! गोड समारंभ?

**नि. काळे** : अग बाई! गोड समारंभ? कसला हो!

**जोगदंड** : माझ्या लग्नाच्या पार्टीचा!

**नि. काळे** : म्हणजे तुमचं लग्न ठरलं आहे?

**जोगदंड** : ठरलंच नाहीं—होऊन गेलंय! फक्त आम्हीं कुणाला कळवलं नव्हतं! प्रमोशन मिळाल्याशिवाय हा समारंभ करूं नये असं आम्हीं ठरवलं होतं दोघांनींहि!—न् म्हणूनच आतांपर्यंत गुप्त राखलं होतं हें! मग तुम्ही दोघींनीं यायचं बरं का या समारंभाला! आमंत्रणपत्रिका येतीलच रीतसर! पण आतांच सांगून ठेवतों!

(दोघींच्याहि चेहऱ्यावर विचित्र भाव उमटतात. अंतीं रोदनेच्छा नामक भाव चेहऱ्याचा पुरा ताबा घेतो.)

**जोगदंड** : अरेच्चा! पण ती पाटी तिथें अजूनहि लटकतेच आहे का? आतां हवी कशाला ती पाटी! आतां इथं कुणालाहि रडण्याची सक्त मनाई नाहीं! मनसोक्त रडून घ्यावं ज्यानं त्यानं! अच्छा! बाय बाय! (जातो.)

**नि. काळे** : (हुंदके देत.) सुमा! काय ग मेला तरी!

**सु. ढवळे** : (हुंदके देत) निमा! मीं तुला नव्हतं सांगितलं—!

(दोघीहि हुंदके देऊं लागतात. आतांचे त्यांचे अश्रू ग्लिसरीनचे अश्रू नाहींत हें सुज्ञ प्रेक्षकांना काय सांगायला हवं?

**पडदा**



अनुक्रमणिका

Give them
**FAMOUS**

**Madras**
QUALITY
SWEETS &
TOFFEE
MADE WITH GLUCOSE




**MADRAS** CONFECTIONERY WORKS.

RANADE ROAD, POPAT WADI
DADAR. (W. RLY.) BOMBAY-28.
GRAM: CANDYTOFY. TELE: 40072



## विश्वामित्राची मानवास अमुल्य देणगी

राजा इश्वाकूचा सातवा वारस, राजा त्रिशंकूला रक्षण देण्यासाठीं, केवळ देवेन्द्र व वशिष्ट यांना शह म्हणून विश्वामित्र ऋषींनी स्वसामर्थ्याच्या जोरावर प्रतिसृष्टी निर्माण केली. त्या प्रतिसृष्टींत उंसाची प्रथम निर्मिती विश्वामित्रानें केल्याचा पुरावा पौराणिक ग्रंथातून आपल्याला पहावयास मिळतो. नंतर ज्यावेळीं राक्षसांनी प्रतिसृष्टीचा नाश केला, त्यावेळीं हीं उंसाची लागवड भूलोकांवरील मानवाला विश्वामित्राची देणगी म्हणून पाठविण्यांत आली.

अशा या उंसापासून दाणेदार व शुभ्र अशी साखर तयार करून, अखिल महाराष्ट्रांत घरोघरीं पुरविण्याचे कार्य, दि कोल्हापूर शुगर मिल्स लिमिटेड, मोठ्या जबाबदारीनें, आनंदानें व आपलेपणानें पार पाडीत आहे.

**दी कोल्हापूर शुगर मिल्स, लि.**
(मॅनेजिंग एजन्ट्स्: दी युनायटेड एजन्सीज लि.)
कसबा बावडा, पोस्ट न्यु-पॅलेस, कोल्हापूर




**ही दिवाळी आमच्या हितचिंतकांस सुखाची जावो !**



लीला त्या रस्त्यानें चालली होती. त्या रस्त्यानें ती कितीकदां गेलेली होती, वेळ मिळेल तेव्हां, सवड सापडेल तेव्हां, गरज पडेल तेव्हां. आज तिला वेळ नव्हता, सवड तर अजीबात नव्हती, पण गरज मात्र भयंकर होती. मनूला तिला भेटायचं होतं, आपल्या हातांतल्या लाल वहींतलं एक निळं पाकीट तिला दाखवायचं होतं आणि तिचा त्या बाबतींत सल्ला घ्यायचा होता! मनूच्या त्या पत्रावरच्या निकालानंच तिचं भवितव्य आतां ठरणार होतं. उजव्या हातांतली ती लाल वही तिनं डाव्या हातांत घेतली. आंत निळं पाकीट होतं त्यावरचीं अर्जंट अशीं अधोरेखित जाड अक्षरं तिनं पुन्हा एकदां वाचलीं आणि ती चालूं लागली.

तिच्या पायाखालचा रस्ता हादरत होता का तिची छाती धडधडत होती हें तिला समजत नव्हतं. ताशीं तीनशें मैलांचा वेग तिच्या पायपोटरींत भरलेला होता, पण तिच्या पायाखालचा रस्ता मात्र जेमतेम अर्ध्या मैलानं सरकत होता. रस्त्यावरून जातांना तिचा तोल जात होता. रस्त्यांतली गर्दी चुकवून वाट काढणं तिला कठीण जात होतं. रस्त्यांतल्या गर्दीमुळं ती मागं हटत होती का पुढं ढकलली जात होती, तिचं तिलाच कळत नव्हतं.

आणि अजून मनूचं घर दूर होतं. फार दूर होतं! तिच्या ओढग्रस्त पायांना तें घर जवळ यायला हवं होतं, पण तिचे डोळे त्या घराला दूर दूर लोटूं पहात होते!

आतां रस्त्यावरचीं माणसं तिच्या हिशेबांत माणसं राहिलीं नव्हतीं. समोरून येणाऱ्याजाणाऱ्या माणसांना, इमारतींना, गाड्याघोड्यांना तिच्या लेखीं अस्तित्व नव्हतं. त्या रेषा होत्या, ते रंग होते. आकार आणि आकृति होत्या त्या! त्यांना अर्थ नव्हता, त्यांच्यांत प्राण नव्हता.

रस्त्यानं चालतांना लीला अडखळत होती, अडत होती, घरंगळत होती, कलंडत होती! डावीकडून उजवीकडे, उजवीकडून डावीकडे, वरून खालीं, खालून वर! रस्ता जसा फिरेल त्याप्रमाणें!

लीला चालली होती. डाव्या मनगटावरचं घड्याळ उचलून तिनं कानाला लावलं, पण त्यांत किती वाजले आहेत तें मात्र पाहायचं तिनं टाळलं. अहोरात्र ज्या घटकेची, ज्या क्षणाची ती पूजा, उपासना करीत असे, ज्या क्षणाच्या प्राप्तीसाठीं तिची तासन् तास रात्रीं अपरात्रीं समाधी लागत असे, तो क्षण मनूच्या उंबरठ्यावर तिची वाट पहात आज उभा होता.

लीला रस्त्यानं चालली होती. तिच्या उजव्या हातांत लाल वही होती आणि त्या लाल वहींत तें निळं पाकीट होतं. त्या निळ्या पाकिटामुळें तिनं आजवर जे जे संकल्प केले होते त्यांतला एकेक संकल्प विरूं पाहात होता. चंदन घासावं नि सुगंध दरवळावा, आगरबत्ती पेटावी नि घमघमाट सुटावा, केवड्याची कुपी फुटावी नि मादक दर्प उठावा—आणि हा सारा सुगंध, दर्प नि घमघमाट हळूहळू वाऱ्यावर विरून जावा, तसं तिचं होत होतं दिवस उजाडल्यापासून.

आज पहाटेला दूध घालून झाल्यावर हातांतल्या दुधाच्या पितळी चरवीचं झाकण बंद करतां करतां दत्तूनं मागं वळून पाहिलं तेव्हां लीला दारांत उभी होती. स्वप्नांतून दचकून उठल्यासारखा तिचा चेहरा दिसत होता. तोंडावरून





अनुक्रमणिका



# मनु-स्मृति

आरती उद्यावरकर

**पुरुष आणि स्त्री यांच्यांतल्या द्वंद्व-युद्धांतून प्रीति जन्माला येते ! हें द्वंद्वयुद्ध नसेल तर जगणें म्हणजे वितळणें, आटणें, नाश पावणें !—पण मनूनं याच द्वंद्वयुद्धाला आव्हान दिलं होतं आणि—**

पाण्याचा हात फिरवून मगच आपण दार उघडायला हवं होतं असं दत्तूला पहातांच तिला वाटलं.

तिला पाहून दत्तू हसला. त्याचं हसणं उगाच होतं. मध्येंच उगाचच हसण्याची त्याला सवय होती. पण तिला त्याचं हसणं निराळं वाटलं. तिनं पदर थोडासा नीट केला नि वी ओठ चावून म्हणाली—

"दत्तू, आतां बरी दिसतें ना मी ?"

"बरी ? बरी म्हणून काय विचारतां—अगदीं गोड दिसतां तुम्ही."

"म्हणजे कशी रे ?"

"सांगूं ? आमच्या गोशाळेंत गोपाळकृष्णाची एक मोठी तसबीर आहे. यशोदा धार काढते आहे आणि रांगणारा कृष्ण तिच्याशीं दंगामस्ती करतो आहे. गाईच्या शेपटीवर काच जराशी तडकली आहे पण यशोदा काय आहे म्हणतां !"

"दत्तू खरा गो-सेवक आहेस तूं !"

"मग त्यांत वाईट काय आहे, लीलाक्का. सत्कर्मयोगें वय घालवावें, असं गुरुजी म्हणतात. गायीच्या पायांत मला मरण आलं तर—" दत्तूचा चेहरा एका अतर्क्य महत्त्वाकांक्षेनें उजळून निघाला होता. आपल्या भोंवतीं गायींचा गराडा पडला असून आपण कृष्णासारखी बांसरी वाजवीत मधोमध गुडघ्यावर पाय टाकून बसलों आहोंत असं एक दिव्य स्वप्न तो पहात असावा !

"जाऊं द्या लीलाक्का, तुम्हाला हें आमचं समजायचं नाहीं ! पण गोशाळेंत एक दिवस असाच पहाटेस येऊन जा म्हणजे मग गुरुजींच तुम्हांला सांगतील—"

"पुरे रे तुझे गुरुजी ! सारखा जप करतो आहेस त्यांचा; पण दत्तू, गुरुजी का तुला जन्मभर पुरणार आहेत ? उद्यां तुझं लग्न झालं—"

"माझं लग्न ? संपलं."

"कां ?—कां ?"

"कोणाची वर आली आहे अशी मुलगी ?" दत्तू उंचवी भुंवई खाजवीत म्हणाला.

"तसं कांहीं नाहीं बरं का !" मानेला किंचित् लाडिक झटका देत लीला म्हणाली.

तसं–कांहीं–नाहीं–बरं–का—हे पांच विलक्षण शब्द ज्या कमानदार ओठांतून बाहेर पडले त्या दोन ओठांवरून दत्तूची नजर अकस्मात् वरच्या त्या दोन गाहिऱ्या डोळ्यांकडे धावली.

लीलाचा एक हात कमरेवर होता आणि दुसरा हात दारीच्या चौकटीला. जराशानं कमरेचा हात सुटला नि त्या हातानं मागचं अर्धवट उघडं राहिलेलं दार जरासं पुढं ओढून घेतलं.

दत्तूच्या तें लक्षांत आलं आणि एका भयंकर शंकेनं त्याचीं कानशिलं लाल लाल झालीं. एक हजार आठ दंड घातल्यासारखा थकवा त्याच्या छातीवर येऊन आदळला. तो थकवा घालवून लावण्यासाठीं दत्तूनं नेहमीप्रमाणें उगीचच हसण्याचा प्रयत्न केला; पण तें त्याला जमलं नाहीं. नंतर मात्र तो हसला. अगदीं गालांतल्या गालांत—चोरून.

त्यावर लीलानं विचारलं, "काय झालं, हसलास ?"

"नाहीं. उगीच. ही पाहिलीत ?" दत्तूनं आपला दण्ड नव्वद अंशानं वर वाकवली.

"पाहिलीत ?"

"काय ?"

"बेडकुळी. खरंच. पहा जवळून."





अनुक्रमणिका

"त्यांत काय पाहण्यासारखं आहे. मीहि रोज वीस पंचवीस गाई-म्हशींच्या धारा काढूं लागलें तर मनगटावरील मसल्स असेच होतील!"

"मसल्स! लीलाक्का, इंग्रजींत नांव नाहीं भेटणार याला. पारा कसा भरला आहे ठासून इथं, बोट दाबून तर पहा."

"खरं कीं काय!"

लीलानं जराशा कौतुकानं आणि कुतूहलानं मधलं बोट तिथं ठेवलं. नंतर तिच्या चारी बोटांनीं दत्तूच्या वेड्कुळीला डिवचलं! त्यासरशीं दत्तू चमकून निघाला! कामधेनूची कुटनं तरी काळजांत ठार लाथ बसावी त्याप्रमाणं तो चमकला. क्षणार्धांत आरपार धुंदावून गेला तो! आपण काय करीत आहों हें उमगण्याच्या आधींच दत्तूनं लीलेला जवळ ओढली. पण "ई!" असा मुसट चीत्कार करीत लीलानं दत्तूला दूर ढकललं नि दणकन् लाथेनं दार लोटून ती आंत चालती झाली! आपल्या हातून काय अक्षम्य घडलं हें लक्षांत यायला दत्तूला फारसा वेळ लागला नाहीं!

कसाईखान्याकडे निघालेल्या भाकड गाईप्रमाणें भकास नजरेनं आणि लटलटत्या पायानं दत्तू जिना उतरून चालूं लागला!

आणि अचानक लीलाच्या मनाला—नव्हे सांग्यालाच धक्का बसला. रस्त्यां-तल्या एका फटिंग पुरुषानें तिला जाणूनच धक्का दिला होता!

दुपारीं राजकमल फोटो स्टुडियोच्या व्हरांड्यांतल्या शोकेसवर हातांतली पर्स आपटीत लीलानं जेव्हां हलक्या आवाजांत विचारलं, "मिस्टर गोखले आहेत का?" तेव्हां स्टुडियोच्या आंतल्या कुठूनशा बाजूनं कुणी तरी किनऱ्या आवाजांत ओरडलं होतं, "आहेत. बसा."




त्यावर ती चिडून म्हणाली होती, "मला बसायला वेळ नाहीं!"

बाहेर होणारा सॅंडल्सचा खडखडाट ऐकून हातांतलं काम टाकून डार्करूममधून तो किनऱ्या आवाजाचा मुलगा बाहेर आला. आणि लीलाला पाहतांच चुटकी वाजवून तो म्हणाला, "ओः यू! कार्ड साइज?"

"मिस्टर गोखले नेहमींप्रमाणं नाहींत ना? माझी ही आठव्यांदा खेप आहे."

"मग काय झालं? आठ नव्हे, एकशें आठ फेऱ्या घालून देखील आपला फोटो मिळाला नाहीं अशा गिऱ्हाइकानं तर मग आम्हांला बुटानंच बडवायला हवं. पण तसं कोणी करीत नाहीं. कारण आम्ही क्वॉलिटी वर्क देतों कीं नाहीं?" मुकुंदा पुन्हा एक डबल चुटकी वाजवीत म्हणाला.

"माझी कॉपी द्या, झाली असेल तर. ऐकल्या आहेत या तुमच्या गप्पा!" लीला चिडली होती.

"अहो, पण चिडताय काय? एक्साइट कशाला होतां! गोखलेसाहेब म्हणत होते—"

"कुठं गेलेत गोखले?"

"गेले असतील रस्त्यांकडे! गोखल्यांचे रस्ते कसे झाले माहीत आहे ना? तीच ट्रिक. दुसरं काय? गिऱ्हाइक इथं दोन हातानं शाउट करतं, पण त्यांना काय!"

त्याचं तें अचकट विचकट बोलणं नि डोळे मिचकावणं पाहून एक तोंडांत ठेवून द्यावी त्याच्या असं लीलाला वाटलं. पण तिचं लक्ष त्याच्या गालाकडे जातांच तिला दिसलं, अजून त्याच्या गालावर नुकतीच कोवळी लव फुटली आहे. त्याचे डोळे लहानपणीं काजळानं खूप माखलेले असावेत. त्याचे ओठ पिळले तर अजून बोटाला चोरून त्यानं खाल्लेली साय बाहेर येईल! लीला मनांत म्हणत होती, आपल्याला एक असाच वात्रट, वाह्यात्, आचरट भाऊ असता तर त्याचे आपण

दिवसरात्र गालगुच्चे घेऊन त्याला रडवलं असतं. इतक्यांत स्टुडियोच्या आंतल्या डार्करूममधून मुकुंदा ओरडला, "अहो मिस कार्ड साइज! ही तुमचीच का निगेटिव, पहा."

लीला त्या आवाजाच्या रोखानं चांचपडत त्या अंधट खोलींत गेली तेव्हां मुकुंदा तिला एकेक फोटोची काच दाखवूं लागला. काचेपेक्षां काळोखाकडेच डोळे भरून लीला पहात होती. तिला कांहींच दिसत नव्हतं. फक्त बटमोगरी-एवढ्या लाल दिव्याच्या पुढं धरलेली एक काच आणि मुकुंदाचा किनरा आवाज. फोटोग्राफर्सच्या डार्करूमविषयीं मागं केव्हां तरी तिनें आपल्या एका 'जाड्या' मैत्रिणीकडून कांहींच्याबाही ऐकलं होतं. त्या चावट आठवणीनं तिचीं बोटं थरथरलीं. मुकुंदानं लाल दिव्यावर धरलेली एकेक काच लीला पहात होती. पहिली काच पाहून ती म्हणाली—"शी! शी! नव्हे. पहा हे केस! इतके का पिकले आहेत माझे? नव्हेच ही माझी." "येस, यू आर राइट. ही त्या गोडबोल्याची म्हैस असावी." गालांतल्या गालांत जिभेची कोपरखळी मारून चक् असा आवाज करून मुकुंदा म्हणाला.

"गोडबोल्याची म्हैस?" त्याच्या त्या आचरट बोलण्याचं कौतुक वाटून लीला म्हणाली.

"ती चंपी गोडबोले हो. सालीचं लग्न व्हायचं आहे ना उद्यां! बघा कशी ऐटींत बसली आहे! मारे पुस्तकावर कोपर ठेवून. तिच्या फादरनं तरी वाचलीं असतील का इतकीं पुस्तकं! थापाडी—होपलेस!"

त्याच्या बरळण्याकडे लक्ष न देतां लीला म्हणाली, "ही बरीक माझीच दिसते."

"येस! हा गालावर ब्यूटिफुल डॉट—तीळ आहे दिसतो या काचेवर. तुमचीच आहे ती नाहीं?" मुकुंद जणुं तुलनेसाठीं लीलेच्या कानाखालीं गालावर असलेला तीळ पाहूं पहात होता. त्या अंधारांत त्याचं बोट तिच्या ओठाजवळ कुठें तरी पडलं! तें बोट तिथंच धरून ठेवीत लीला म्हणाली, "कशी दिसतें रे मी इथं, या काचेंत? त्या तुझ्या गोडबोल्याच्या म्हशीसारखी?"

"नो नो! तिचं नांव नका काढूं." ओकारी आल्यासारखा चेहरा करून तो बोलत होता. "पहा, किती मस्त आहे हें तुमचं नीटनेटकं नाक. फोटो काढतांना तुम्ही जरासे हसलांत ना? पहा हे तुमचे वरचे दोन दांत किती मस्त दिसतात! ब्यूटिफुल! फोटोचा कट आहे तुमच्या फेसला! तुमचा हा फोटो मासिकावर आला तर माझ्यासारखीं मुलं पागल होतील!"

"पागल होतील म्हणजे काय करतील हो?"

"काय करतील काय विचारतां! तुमच्या फोटोचा मुका घेतील, दुसरं काय करणार!" पुन्हा गालांतून चक् असा आवाज काढीत तो हसला.

"चल—चावट बोलूं नकोस." लीलानं त्याच्या गालाला हळूच चापटी मारली. कारण केव्हांच आपण त्या फोटोचं चुंबन घेऊन चुकलों आहोंत असा भाव त्याच्या बोलण्यांत लपला होता.

इतक्यांत बाहेरून "मुकुंदा" अशी गोखल्यांची करडी हाक आली.

मुकुंदा आणि मागोमाग लीला बाहेर आलीं. लीलाला पहिल्यांच गोखल्यांनीं तिच्याकडे नि मुकुंदाकडे आळीपाळीनें पाहिलें. त्या पहाण्यांतला अर्थ न समजण्याइतकी लीला लहान नव्हती. टेबलाच्या खणांतून लीलाचा कार्ड साइज फोटो काढीत असतांनाच गोखल्यांनीं डार्करूमवर एक घाणेरडी कोटी केली. लीलाच्या डोळ्यांतून संतापाच्या ज्वाळा उसळल्या. गोखल्यांशीं एक अक्षरहि न बोलतां तिनें फोटो उचलला, पैसे टेबलावर फेकले आणि ती त्या दुकानांतून बाहेर पडली.



जातांना एकदां तरी चोरून ती आपल्याकडे पाहील असं मुकुंदाला वाटलं. पण तें खोटं ठरलं. मुकुंदानं निषेध व्यक्त करणारा एक सणसणीत 'चें' असा आवाज गालांतून काढला.

लीला चालली होती! आणि चालतां चालतां तिच्या मनाच्या चोरवाटेवर उभे असलेले ते पुरुष तिला सोबत देत होते—दत्तू, मुकुंदा, आतां शंकर शिंपी—बाबूराव डॉक्टर—शंकर शिंपी का बाबूराव डॉक्टर?...

कुणीच नको. हे सारे द्वाड, दुष्ट, चावट, स्वार्थी, विषयलंपट पुरुष आहेत! पण मनू पुरुष नव्हती. ती द्वाड, दुष्ट, चावट, स्वार्थी नि विषय-लंपट नव्हती! ती सूर्यासारखी तेजस्वी, चंद्रा-सारखी शीतल, समुद्रासारखी गंभीर, नदीसारखी परोपकारी, पारिजातासारखी पवित्र...पण पारि-जाताचं लाकूड फर्निचरच्या कुठं उपयोगी येतं? त्याचा जिना होऊं शकत नाहीं, त्याची कॉट करतां येत नाहीं. मनूच्या कॉटचं लाकूड सागाचं होतं—साग वृक्षासारखीच मनू उंच होती, मज-बूत होती—सावळी होती!

"ए बावळटा! कसला ग एवढा विचार करते आहेस?" असें म्हणून दोन्ही खांदे धरून तिला मनूनं हलवलं तेव्हां लीला परत शुद्धीवर आली.

लीलानं मनूपुढं त्या लाल वहींतल्या निळ्या पाकिटाचं उत्तर मागितलं होतं आणि मनूनं तें केव्हांच दिलं होतं. त्या उत्तरानं लीलाच्या दहा मनापैकीं फक्त एकाच मनाचं समाधान झालं होतं, पण राहिलेलीं मनं शांत नव्हतीं. तीं लीलाला डिंवचत होती, खिजवीत होतीं, चिमटे काढत होतीं!

"कांहीं नाहीं. तूं आपलं सरळ सांग तुझ्या नानांना—माझे तुम्ही वडील आहीत, कबूल. पण मला तुमचं म्हणणं मान्य करतां येत नाहीं. आपण सुचविलेल्या माणसाशीं मला लग्न करायचं नाहीं. त्याच्याशींच नव्हे तर कुठल्याहि पुरु-

र्भी!" मनू लीलाच्या पाठीवरनं हात फिरवीत म्हणाली. मनूचा हात वर पाठीवरून फिरला. पण त्या हातानं लीलाच्या कळवळून उठलेल्या काळजाला अफू घातली.

मनू बोलत होती. तिच्या संभाषणांतल्या शब्दांचं मंथन होऊन त्यांचे तरंग तुषार लीलाच्या शरीरभर उधळले जात होते.

पुरुषाचं रक्त नि स्त्रीचं रक्त, पुरुषाचे अश्रू नि स्त्रीचे अश्रू, पुरुषाच्या डोळ्यांतील बाहुली नि स्त्रीच्या डोळ्यांतली बाहुली, पुरुषाचा श्वासोच्छ्वास नि स्त्रीचा श्वासोच्छ्वास, पुरुषाची सावली नि स्त्रीची सावली—यांत मुळांतच भेद आहे. त्यांत जमीनअस्मानाचं अंतर आहे. त्यांच्यांत अभेद्य आणि अनुल्लंघनीय अशी रेघ पडली आहे, यावर मनूचा विश्वास नव्हता. मनू म्हणत होती, "लीला, आपण एकाच ताटांतलं एकच अन्न खातों, त्या अन्नाचं पुरुषाच्या शरीरांत काय रक्त होतं आणि स्त्रीच्या शरीरांत लाल शाई? खात असलेल्या अन्नाचा गुण नाहीं, घेत असलेल्या हवेचा नाहीं, प्रकाशाचा नाहीं, जीवर बसतों, चालतों, धडपडतों नि शेवटीं थकून अंग टाकतों आपण त्या धरणीचाहि नाहीं—मग हा दोष, हें व्यंग, हें वेगळेपण शरीरांतच, आंतल्या आंत कुठं तरी, जन्मत असावं, तियंच वाढत असावं, त्याचा एकातरी स्त्रीनं शोध घ्यायला हवा, नाहीं का? पुरुषांच्या गुलामगिरीची युगानुयुगं, जन्म-जन्म, पिढ्यान् पिढ्या ही सांखळी कुठल्या तरी स्त्रीनं तोडली तरच कांहीं कोट्यवधी वर्षांनंतर उगवणाऱ्या उद्यांच्या स्त्रीला स्वतंत्र अस्तित्व मिळूं शकेल! लीला, समज, उद्यां नानांचा, जन्मदात्या पित्याचा शब्द राखण्यासाठीं तूं एका पुरुषाशीं लग्न केलंस. तो कांहीं काळच या तुझ्या शरीराची गरज भागवूं शकेल, पण पुढं? लीला, पुरुषांच्या वासनेला सीमा नाहीं, मर्यादा नाहीं; ती इथं संपली, विराम पावली, कायमची शांत झाली असं होत नाहीं. एक पुरुष येतो; त्याच्या स्पर्शानं, सहवासानं, बोलण्यानं स्त्री भाळते, बेभान होते. त्याच्या मागण्याची वाट न पाहतांच ती त्याला हवं आहे, तें नि नको आहे तेंहि सहर्ष हस्तांनीं देऊन टाकते. ती इतक्या हावभरीनं देते, पण तो? आभाराचा चकार शब्दहि न काढतां तो आपल्या वाटेनं चालायला लागतो. त्याला न मागतां





मिळालेलं असतं म्हणूनच तो पुन्हा त्या स्त्रीकडे वेळून पहायची कदर करीत नाहीं. दिलेलं परत मागण्यासारखी ती गोष्ट नसते. एकदां होऊन चुकतं, होऊन जातं—अगदीं नकळत—पण जन्मभर त्याची हळहळ मनाला दंश करीत राहते. मग दुसरा येतो, तिसरा येतो! पुन्हा तीच क्षणाची वेहोपी आणि जन्मभर त्रसणारे काळजावरचे जळते डाग! लीला, पुरुषमात्राकडे निराळ्या, वेगळ्या दृष्टीनं पहायला शीक. पुरुषाइतका कुरूप, क्रूर, स्वार्थी, विषयलंपट; कृतघ्न प्राणी या पृथ्वीतलावर आढळणार नाहीं. पुरुषाविषयीं स्त्रीला वाटणारं आकर्षण हें मद्यासारखारखं आहे. थेंबभर चाटणाऱ्याला पुढं पीपचे पीप पुरत नाहींत नि शेवटीं, 'काय करूं रे, मला झिंग येत नाहीं' असा तळीरामाप्रमाणं टाहो फोडीत, छाती तडवून त्या मद्यप्याला प्राण सोडावा लागतो. उद्यां तूं, नानांच्या, तुझ्या जन्मदात्या पित्यांच्या शब्दाला मान देऊन, ज्या पुरुषाशीं लग्न करूं पहात आहेस, तुला वाटतं तूं त्यालाच—त्या एका पुरुषालाच जन्मभर चिकटून राहशील? नाहीं. लीला, नाहीं. खोटं बोलूं नकोस. काहीं कांहींहि माझ्यापासून लपवूं नकोस. लग्नानं एकाच पुरुषाला चिकटून राहावं लागतं; त्यामुळंच अनेक, असंख्य, पुरुषाच्या मागं, या शरीराला तुडवून, फोडून स्त्रीचं मन सैरावैरा धावूं लागतं. त्यांत लग्न झालेल्या पुरुषाचा घात तर आहेच, पण त्याहून लक्षपटीनं अधिक घात लग्न झालेल्या त्या स्त्रीचा आहे. अशी स्त्री विश्वरचनेंतलं असीम सौंदर्य, अवर्ण्य संगीत, अविचल सत्य उधळून लावल्याखेरीज राहात नाहीं. एका दुःखानं अनंत दुःखं जन्माला येतात, एका अश्रूच्या थेंबांतून अनंत अश्रूंचे महासागर जन्म पावतात, एका असत्यांतून अठरा विश्वांनाहि पुरून उरणारीं असत्यं जन्म घेतात! लीला, हेंच का तूंहि करणार आहेस? पति हा एकच पुरुष आपल्या शरीराच्या आणि मनाच्या साऱ्या गरजा भागवूं शकतो असं धादांत असत्य मानल्याशिवाय लग्नाची ही समस्या सुटणार नाहीं!"

लीलानं उजवीकडल्या खिडकींतून बाहेर पाहिलं—एक निळभोर आकाश होतं, त्याला अंत नव्हता. लीलानं मनूच्या दृष्टींत दृष्टि टाकली—मनूच्या डोळ्यांतल्या निळ्याभोर टिकलीच्या खालीं एक गडद आकाश होतं, त्यालाहि अंत नव्हता!

मनू बोलत होती. लीला ऐकत होती. मनूच्या तोंडून बाहेर पडणारा एकेक अमृताचा शब्द ती



अनुक्रमणिका

आपुला जीव पसरून झेलत होती. शेवटीं मनूनं काळीज तोडून विचारलं, "लीला, स्त्रीपुरुषांतल्या विरोधांची समस्या सोडविण्यासाठीं तुझानाझा जन्म झालेला आहे. तें महान् कार्य, युगप्रवर्तक कार्य करण्यासाठींच विश्वकर्त्यानं तुला नि मला जन्माला घातलं! उद्यांच्या लैंगिक मानवतेचा इतिहास आपल्याला जुळवायचा आहे तो असा. हातांत हात घालून. गळ्यांत गळा घालून."

मनूच्या हाताचा विळखा लीलाला दूर करवेना. मनूच्या, तुझ्यासारख्याच एका स्त्रीच्या मुठींत तूं अडकली जात आहेस, असें पहाटेचा दत्तू म्हणत होता, दुपारचा मुकुंदा बजावीत होता, दोन महिन्यां-पूर्वी भेटलेला अच्युत बडबडत होता, पंधरा दिवसां पूर्वी भेटलेला शंकर बोरगावकर ओरडत होता!

लीलाच्या कानांत हे सारेजण एकसुरानं किंचाळत होते व ती मनूच्या झाकलेल्या मुठींत अंग चोरून लपून बसली होती. भयानं नव्हे, सावधतेनं. कारण मनूच्या मधाच्या बोलण्यांत एका महान् जीवनसत्याचा तिला साक्षात्कार होत होता. तिच्या देहाचा एकेक कण एकाएकीं वेगवान् झालेल्या देहातून मुक्त होऊन अनंतांत फेकला, उधळला जात होता. ती स्थिर होती तरी तिच्या त्या तापलेल्या देहांत, तिच्या त्या कुस्करलेल्या शरीरांत, एका अजस्त्र शक्तीची स्प्रिंग आतल्या आंत अदृश्य जादुगार हातानं चावी दिल्याप्रमाणं, गुंडाळली जात होती. ती चुकून त्या वेळीं सुटली असती तर तिच्या ठिकऱ्या ठिकऱ्या देहाच्या, अस्थिर मनाच्या चिंधड्या चिंधड्या झाल्या असत्या!

जें घडत होतें तें इतकं विलक्षण, इतकं असह्य कीं तिनं, दुसऱ्याच बाळंतपणांत गतप्राण झालेल्या आपल्या आईला टाहो फोडून विनवलं, "आई, तूं जिवंत असतीस तर तुझ्याच कुशींत तोंड खुपसून मी खळखळून पोटभर रडलें असतें, आणि तुला म्हटलं असतं—तुझी मनधरणी केली असती, आई, माझे हे सावेतीन हातांचं तोकड्यानं कांठोकांठ ओसंडणारें शिवार वर मला नको आहे. मला तें पेलत नाहीं. मला लहानाची मोठी केलीस तशीच पुन्हा मोठ्याची लहान कर. अर्धी? मोडतोडून लहान कर—एक वळवळणारा ओला ठिपका कर माझा नि मला तिथून बाहेर या जगांत ढकललीस तिथूनच परत उचलून घे. तुझ्या पोटांत मला जागा नसेल तर तुझ्या गर्भाच्या जळत्या देहावर असतून मला होती नव्हतीशी कर!"



# धुकें दाटलें वाटेंत

जातां जातां अवचित
    तुझ्या दारापाशीं आलें
आणि सामोरें येतांना
    डोळे विस्मित हांसले !
किती आग्रह चहाचा
    तशी सुपारी स्वादिष्ट
'पुन्हा कधीं'ची सलामी
    निघतांना नजरेंत !
चहावरील वाफेचं
    धुकें दाटलें वाटेंत
सुपारीच्या आग्रहानें
    अधू वाटे तळहात !
मनांतील आजीबाई
    नाकावरी ठेवी बोट
"थांबायाचें नाहीं कधीं
    असें पुन्हांशीं वाटेंत" !

—इंदिरा

आजकालच्या तरुण सुशिक्षित पांढरपेशा पिढीपुढें,
नोकरीच्या मागें न लागतां
हलक्या धंद्यांतून 'नशीब' कसें काढणें शक्य असतें
याचें श्री. बंडोपंत जोशी यांनीं
उदाहरण घालून दिलें आहे.



श्री. बंडोपंत जोशी, व्यवस्थापक
वी. तांबे लि.

# उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धी पाणी भरी !

लेखक : सुपरिचित

उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी ! असे अस्पष्ट शब्द पुटपुटत विचार-चक्राच्या तंद्रींतच एका हॉटेलच्या पायऱ्या मी उतरलों. त्या वेळीं माझ्या डोक्यांत इवल्याशा मधमाशीच्या अंगीं ध्येयवादाबरोबरच असलेल्या प्रयत्नवादाच्या गुणाबद्दलचे विचार घोळत होते. 'मधमाशी'—केवळ एक क्षुल्लक प्राणी, परंतु प्रयत्नांच्या बळाची कांस धरून महत्वाकांक्षी धेयपूर्ति करण्याची तिची केवढी उमेद ! खरो-खरच कौतुक करण्यासारखें उदाहरण ! आपल्या आजच्या होतकरू समाजामध्यें कितीसे तरुण हें उदाहरण डोळ्यासमोर ठेवून सतत उद्योगानें प्रेरित होऊन आपलें महत्वाकांक्षी ध्येय साध्य करून घेत असतील बरें !

या विचारांना प्रथम चालना मला कोठून मिळाली हें सांगण्याचें राहूनच गेलें. बी. तांबे लि. च्या फोर्ट मधील आरोग्यभुवनाचे व्यवस्थापक श्री. बंडोपंत जोशी यांच्या निष्ठावंत व प्रयत्नवादी स्वभावाची माहिती आपल्याला असल्यास आपल्या तें सहज ध्यानीं येईल. त्यांच्या परिचयाची त्रोटक माहिती आमच्या वाचकांना उद्बोधकच वाटेल.

कोणताहि हलका धंदा करणें म्हणजे आमच्या आजकालच्या तरुणांना कमीपणाच वाटतो. परंतु हलक्या धंद्यांत जो नफा मिळतो तसा नफा थोड्या भांडवलांत दुसऱ्या प्रतिष्ठित धंद्यांत मिळत नाहीं, हें तत्त्व आजकालच्या पिढीच्या गळीं उतरलें पाहिजे असें उत्तर श्री. जोशी मास्तरांना प्रश्न विचारला असतां त्यांनीं दिलें. त्यांनीं एकामागून एक अशीं बरींच उदाहरणें दिलीं, व तें पुष्कळ अंशीं खरेंहि आहे. कपबशा विसळून व भांडी धासून धंद्यांत पदार्पण करणारा एक गरीब होतकरू मुलगा नंतर पाकशास्त्र अवगत करून व्यवस्थापकाचेंहि काम अगदीं आत्मसात् करून कसें घेतो याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे श्री. बंडोपंत जोशी होत !

संगमेश्वर तालुक्यांतील शिपोशीसारख्या खेडेगांवांतील एका गरीब कुटुंबांत त्यांचा जन्म झाला. त्यांचें शिक्षण जेमतेम चार पांच बुकें झालेलें. १९२७ मध्यें प्रथम मुंबईस आल्यावर तांबे आरोग्य भुवनांत काकासाहेबांनीं त्यांची नेमणूक कपबशा विसळणारा पोऱ्या म्हणून केली. आपल्या अंगच्या मेहनती व निष्ठावंत स्वभावानें त्यांनीं काकासाहेबांना आपलेंसें केलें. मालकाबरोबर त्याचे संबंध जिव्हाळ्याचे आहेत असें नाहीं. तर त्यांचा मित्रपरिवार, त्यांच्या हाताखालचा नोकरवर्ग इतकेंच नव्हे तर तांबे आरोग्य भुवनांत येणाऱ्या त्यांच्या ग्राहकांशींहि त्यांची वागणूक निगर्वी प्रेमळ, नम्र व आपुलकीची असते. ते अत्यंत सुस्वभावी, व्यवहारी व प्रामाणिक तसेंच मेहनती असल्यामुळें आज उपाहारगृहासारख्या खटाटोपी धंद्याची जबाबदारी व सूत्रें काकासाहेबांनीं त्यांच्या हातीं दिलीं व आपला दूरदर्शीपणा दाखविला असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. अशा प्रकारची संधी त्यांना मिळाली म्हणून ते पुढें येऊं शकले; याचें श्रेय श्री. काकासाहेबानांहि आहे. काकांनीं त्यांच्या अंगच्या

अनुक्रमणिका

गुणांची खरी पारख केली व त्यांचें चीजहि केलें. श्री. जोशी मास्तरांची वृत्ति साधी तसा त्यांचा पेहरावहि. त्यांनीं जवळजवळ दोन तपें-हॉटेलच्या धंद्यांत काढलीं व अनुभवाच्या भांडवलावर ते आज यशस्वी झाले. हॉटेलच्या नोकरवर्गांत राहून खालच्या प्रकारचें काम केलें खरें, परंतु हॉटेल, नोकरांना जडलेल्या वाईट सवईंचा संपर्क आपल्याला बिलकूल लावून घेतला नाहीं. ही त्यांच्या आत्मसंयमनाची कसोटीच नाहीं तर काय ?

प्रथम खाऊनपिऊन त्यांनीं पंधरा रुपयावर नोकरी केली. खरकटखाडा- स्वयंपाकशास्त्र, बाजारहाट व हिशेबी विभाग वगैरेसारख्या सर्व दालनांचा त्यांनीं जातीनें पंचवीस वर्षे अनुभव घेतला व माहिती मिळवून नंतर त्यांनीं कॅशरची जबाबदारी संभाळली. यामुळें त्यांच्या अष्टपैलू गुणांची कल्पना काकांना आली व ते काकासाहेबांच्या पूर्ण कसोटीला उतरले. नव्या दृष्टिकोनानुसार उपहारगृहाचा व्यवसाय सुशिक्षितांनीं अंगीकारल्यास कसा फायदेशीर होऊं शकतो याचें प्रात्यक्षिक म्हणजे आजचा तांबे आरोग्य भुवनाचा वाढता पसारा होय. काकांच्या उजव्या हाताप्रमाणें साहाय्य करीत असलेले जोशी मास्तर चिकाटीनें व संतुष्टपणानें काकांशीं एकनिष्ठ राहिले. बऱ्याच वेळां बाहेर जाऊन स्वतंत्रपणानें धंदा करण्याची संधी त्यांना लाभली असतानांहि त्या मोहाला ते बळी पडले नाहींत. काकांचा असीम विश्वास संपादन करून आज्ञाधारकपणें ते काकांशीं अद्यापहि वागतात.

ज्या देवळांत दगडाला अनुभवाच्या टाकीनें देवकळा प्राप्त झाली; व माझ्या गुणांच्या विकासाला वाव मिळला ती जागा सोडून त्यावर लाथ मारून मी कधींहि कर्तव्यपराङ्मुख होणार नाहीं असें जोशी मास्तर नेहमीं म्हणतात. त्यांचे व काकांचे संबंध धन्या-नोकराप्रमाणें नसून काका-पुतण्यां आहेत हें वर सांगितलें आहेच.

परदेशपर्यटनानंतर काकांनीं आपल्या आरोग्य भुवनाचा व्याप, सर्व शाखांची जबाबदारी त्यांच्याशीं एकनिष्ठ राहिलेल्या त्यांच्या सहकाऱ्यांच्या हातीं सोपविली, व निष्ठावंत सहकाऱ्यांचें कल्याण केलें, ही वृत्ति खरोखरच काकांच्या अंगीं असलेल्या महाराष्ट्रीय औदार्याचा एक नमुना व आदर्श आहे. या विभागणींत फोर्टमधील तांबे आरोग्य भुवनाची व्यवस्था श्री. जोशी मास्तरांकडे आली. रेशनिंगच्या दिवसांतहि मालाचा उच्च दर्जा, स्वच्छ व्यवस्था, टापटिपीची मांडणी, पौष्टिक व स्वादिष्ट खुराक गिऱ्हाईकांना देऊन त्यांच्या पैशाचा योग्य मोबदला देण्याचें ध्येय श्री. जोशी मास्तरांनीं सतत डोळ्यांसमोर ठेविलें; आणि म्हणूनच त्यां-च्या चढाओढीच्या काळांतहि त्यांना गिऱ्हाईकांची कधींहि उणीव भासत नाहीं. फोर्टमधील शिपायापासून ऑफिसरपर्यंत सर्व ज्ञातीचे, सर्व दर्जाचे लोक तांबे आरोग्य भुवनाला नियमित उदार आश्रय देतात यांचें श्रेय श्री. जोशी मास्तरांनाच आहे. जोशी मास्तरांनीं आजकालच्या तरुण सुशिक्षित पांढरपेशा पिढीपुढें नोकरीच्या मागें न लागतां हलक्या धंद्यांतून 'नशीब' कसें काढणें शक्य असतें या त्यांच्या समस्येनें उदाहरण घालून दिलें आहे. त्यांना स्वभावतःच सार्वजनिक कार्याची फार हौस. त्यामुळें मुंबईतील बऱ्याच सार्वजनिक संस्था, हौसिंग सोसायटीज्मध्यें त्यांचे निकट संबंध आहेत. आपल्या गांवच्या शिक्षण संस्थेच्या कामालाहि त्यांनीं सक्रिय मदत दिली आहे. समाजकार्य करणें हा त्यांचा आवडीचा विषय आहे. त्यांच्या अंगच्या अष्टपैलू गुणांचें चीज समाजानेंहि करून घेण्यास कोणतीच हरकत नाहीं. समाजकार्यासाठीं त्यांना उदंड आयुरारोग्य लाभो, असें आम्ही चिंतितों.





अनुक्रमणिका

# अश्रु!

डॉ. श्री. श्रां. आंजगांवकर
D.O., D.L.O. (VIENNA)
L.M. (DUBLIN)

पुष्कळशा साहित्यिकांनीं व कलावंतांनीं 'रक्त आणि अश्रू' भोंवतीं भावनांचें मोठें वलय निर्माण केलें आहे. लेखकांनीं या विषयावर कादंबऱ्या लिहिल्या तर चित्रकारांनीं सुंदर चित्रें रंगविलीं. राजकारणी पुरुषांनीं तर या शब्दांनीं भावनांना आवाहन देऊन युद्धें जिंकलीं. गेल्या दुसऱ्या महायुद्धांत इंग्लंडचे धुरंधर राजकारणपटु चर्चिल यांनीं इंग्लंडवर जर्मनीची बॉम्बवरसात चालू असतां युद्धांत जयश्री मिळवावयाची असेल तर मला आपलें 'रक्त व अश्रू' द्या, अशी ब्रिटिश जनतेस आवाहनपूर्वक विनंति केली व ब्रिटिश जनतेनें ती खऱ्या अर्थानें पुरविली. युद्धोत्तर कालांत इराणच्या पंतप्रधानांनीं—मुसादिक—तर अश्रूंच्या ओघळण्यानें इराणांतील तस तेलाच्या प्रश्नांत इंग्लंडला वाहवून लावलें. या अश्रूअस्त्राची महति कवि, साहित्यिक, कलावंत, चित्रकार वा राजकारणी व रणधुरंधर पुरुषच नव्हे तर सामान्य नारी व चार महिन्यांहून मोठीं असलेलीं बालकेंहि जाणतात. (चार महिन्यांहून लहान असलेल्या बालकांमध्यें अश्रुग्रंथीच उत्पन्न झालेल्या नसतात). कठीण वज्रासारखें हृदयहि पाझरविण्याचें सामर्थ्य या अश्रुअस्त्रांत आहे. अश्रूंमध्येंसुद्धां अनेक प्रकार आहेत. आनंदाश्रू, दुःखाश्रू, प्रेमाश्रू, नक्राश्रू, वगैरे वगैरे. रक्ताबद्दल तर लिहावयास नकोच. अश्रूंचें दर्शन जेवढें सहज-सुलभ तेवढें रक्ताचें नसलें तरीसुद्धां रक्ताचा परिचय नसलेला माणूस विरळा. रक्ताबद्दल बोलतांना आपण अनेक विशेषणें लावून बोलतों. खानदान व्यक्तीला 'a man of blue blood' असें म्हटलें जातें. एखादें भीषण कृत्य कोणी केल्यास 'cold blooded' कृत्य असें अभिधान दिलें जातें. कोणतीहि गोष्ट परिश्रमानें केली गेल्यास त्याबद्दल रक्त आटवल्याची भाषा वापरली जाते. पाण्यापेक्षां रक्त जाड आहे ही म्हण कोणाला प्रचीतीला येत नाहीं? कोणतीहि कठीण गोष्ट आत्यंतिक उत्कटतेनें करुन दाखवावयाची असल्यास स्वतःच्या रक्ताची शाई करुन तिची प्रतिज्ञा लिहिली गेल्याचीं उदाहरणें आपल्या वाचनांत आलीं असतीलच. आधुनिक काळांतील 'रक्तदाना' बद्दल आज लिहावयास नकोच. तेव्हां शरीरांतील या दोन महान् रसांपैकीं आज अश्रूंचे साहित्यिक दृष्ट्या विवरण न करतां केवळ शास्त्रीय दृष्ट्याच विवेचन करण्याचा हा प्रयत्न आहे. यांत कोणास सौंदर्य-नाश दिसल्यास न्यायदेवतेप्रमाणें शास्त्रदेवता ही आंधळी नसून डोळस आहे, पण ती तितकीच सत्यान्वेषी आहे हें समजून येईल.

**अश्रू :** माणसाला रक्तापेक्षां अश्रूंची ओळख फार लवकर होते म्हणून प्रथम अश्रूंबद्दल विवेचन करण्याचें ठरविलें आहे. नेत्र हे मेंदूचे दरवाजे आहेत. मेंदूचा बाह्य जगाशीं संबंध ठेवण्यास मेंदूस पंचेंद्रियांपैकीं डोळ्यांचा जास्त उपयोग होतो. मनाच्या भावनाहि दाखविण्याचें कार्य नेत्रांनींच जास्त उठावदार होतें व अश्रू हे त्यांस या बाबतींत जास्त मदत करतात.

**उत्पत्ति :** डोळ्यांतून बाहेर पडणाऱ्या अश्रुधारांचा उगम डोळ्यांचे शेजारीं बाहेरचे अंगास डोक्याचे कवटीचे खोबणींत बदामाकृति असलेल्या अश्रुग्रंथीच्या उत्तेजनानें होतो. डोळ्यांची स्वच्छता व आर्द्रता राखण्याचें कार्य अश्रू करतात. डोळ्यांचें उघडझापीनें स्वाभाविकतः हे अश्रू वाळून (Evaporate) जातात: पण कोणत्याहि कारणानें अश्रुग्रंथींचे उत्तेजनानें अश्रूत्पादन जास्त झालें तर ते डोळ्यांच्या पापण्यांतून नाकांत गेलेल्या नलिकां-द्वारें नाकांत शिरतात. या नलिकांतूनहि जाण्या-पेक्षां अश्रूंचा ओघ जास्त वाढला तरच मग डोळ्यांवाटे अश्रू बाहेर पडतात.

**अश्रूंचें कार्य :** नेत्रांच्या रक्षणाकरितां ज्या कांहीं विशिष्ट योजना आहेत, त्यांत अश्रूंना महत्त्वाचें स्थान आहे. पापण्यांची उघडझाप ही डोळ्यांचें संरक्षण बाहेरील केरकचऱ्यापासून अगर उग्रद्रवी वायूंपासून (अश्रुवायू) अगर तीव्र उजेडापासून करते. पण ही उघडझाप होत असतां घर्षण होतें; तें होऊन डोळ्यांना त्रास होऊं नये म्हणून अश्रूंची योजना आहे. डोळ्यांना स्नान घालून स्वच्छ ठेवणें हाहि एक त्यांचा उपयोग आहेच. अश्रूमध्यें अल्प प्रमाणांत जंतुघ्न शक्तीहि आहे. ही शक्ति अश्रू उष्ण केल्यानंतर नाहींशी होते. अश्रूमधील ही शक्ति त्यांतील Lysozyme या द्रव्यामुळें आहे.

**अश्रूंचें पृथक्करण :** अश्रूंचें पृथक्करण गेलीं शंभर वर्षे निरनिराळे शास्त्रज्ञ करीत आले आहेत. खालील पृथक्करण रीडले आणि ब्राऊन यांनीं १९३० मध्यें केलेलें आहे. अश्रू हा अश्रुलवी ग्रंथींचा स्राव असून तो पाण्यासारखा स्वच्छ, थोडासा खारट व क्षारीद (alkaline) असतो. त्यांत पाण्याचें प्रमाण ९८.२% असतें व इतर घन द्रव्यें १.८% असतात.



अनुक्रमणिका

घनद्रव्याचें प्रमाण

| | |
|---|---|
| Total nitrogen एकंदर 'नत्र' | ...0.158 |
| Non. protein nitrogen | ...0.051 |
| Urea (मूत्रिया) | ...0.830 |
| Proteins प्रथिने | ...0.669 |
| Albumin | ...0.394 |
| Globulin– | ...0.275 |
| Sugar शर्करा | ...0.650 |
| Mucus and fat श्लेष्मा व मेद | 0.30 to nil |
| Sodium chloride मीठ | ...0.658 |
| Sodium (as $Na_2O$) | ...0.60 |
| Potassium (as $K_2O$) | 0.14 |
| Phosphates etc. | 0.005 |

अश्रूंतील प्रथिनें ही रक्तांतील प्रथिनांहून भिन्न असून ती पुरुषाच्या Semen (रेत) प्रथिनांशीं त्यांचें साम्य आहे (हेक्टन १९२०).

**अश्रू आणि रूदन :** आपल्या डोळ्यांचें तेज हें त्यांतील अश्रुरूपी पाण्यावर असतें. हें पाणी अश्रुग्रंथींतून जास्त प्रमाणांत उत्पन्न होऊन नेत्रांवाटे बाहेर पडूं लागलें कीं त्याला अश्रूंचें रूप येतें. हे अश्रू आनंदाचे असतात, दुःखाचे असतात, कृतज्ञतेचे असतात वा ढोंगीपणाचेहि असतात. कोणाच्याहि काळजाचा ठाव घ्यावयाचा असल्यास अश्रूंमारखें साधन नाहीं, पण हे अश्रू निर्माण होण्याच्यामागील भावनांचा खेळ अद्याप वैद्यक शास्त्रास समजावा तसा समजलेला नाहीं. आपल्या डोळ्यांतून सूक्ष्म प्रमाणांत जागृतावस्थेंत एकसारखें अदृश्य अश्रुसिंचन होत असतें. सोळा तासांत ½ ते ⅔ सी.सी. अश्रुस्राव होत असतो. पण दृश्य अश्रूसिंचन खालील दोन कारणांनीं होऊं शकतें.

अ—१ : डोळ्यांना स्पर्शज्ञान पुरविणाऱ्या मेंदूच्या ५ व्या नसेला जर उत्तेजन (Irritation झालें तर—धूर, केरकचरा अश्रूवायु वगैरे.

२ : डोळ्याच्या दृष्टि नसेला

Optic Nerve ला ताण पडल्यास { तीक्ष्ण उजेड, कमी उजेड.

ब—३ : भावनात्मक घटना.

नेत्रविशारदांकडे जाऊन आपण पहिल्या प्रकारच्या कारणानें उद्भवलेल्या अश्रूंचें निराकरण करूं शकतों, पण दुसऱ्या प्रकारचें अश्रूत्पादन कमी करण्यास नेत्रविशारदापेक्षां मानसशास्त्रज्ञाचेंच साहाय्य जास्त हितकर होईल. भावनोत्पादक अश्रूंच्या मागील घटना अद्याप कळूं शकलेल्या नाहींत. मेंदूंतील कोणत्या केंद्रावर परिणाम होऊन भावनात्मक अश्रुसिंचन होतें; दुःखाच्या अश्रूपासून आनंदाचे अश्रू भिन्न आहेत का कृतज्ञतेचे अश्रूंपासून नक्राश्रू भिन्न आहेत याचें शास्त्रीय विश्लेषण होणें कठीण आहे. आम्ही वैद्यकशास्त्राचे लोक सर्वच अश्रू एकाच दंडकानें मोजतों.








अनुक्रमणिका

# प्रवाह

[ पुढें चालू ]

त्या सिगारेट ओढणाऱ्या नटीला कुणीच कसें बोलत नव्हतें? तिला आईबाप असतीलच कीं नाहीं? हं! असले म्हणून काय झालें? ती हजारों रुपये पगार मिळवीत होती. ती आपल्यासारखी त्यांची थोडीच पर्वा करीत असेल! आपण तिच्यासारखी नटी झालों तर—

पण मोठी नटी होणें सोपें का आहे? आपल्याला तें कसें जमणार? गतवर्षी गाण्याच्या क्लासमध्यें जातें, असें मीं म्हटलें तेव्हां बाबांच्या कपाळाला आठ्या पडल्या. "हेमाची, मालीची नि रघूची फी भरतांना माझ्या नाकीं नऊ येताहेत ..." असें कांहीं तरी ते आईपाशीं म्हणत होते. आणि आई तरी काय आहे आपली? कमलची आई सावत्र असून सख्खी असल्यासारखी वागते आणि ही सख्खी असून—ती आपली खुशाल बाबांना म्हणाली, "गाणं नको नि रडणं नको. कुठं नटी व्हायला जायचंय हेमाला? पुढच्या वर्षी मॅट्रिक झाली कीं लग्न करून टाका, म्हणजे एक फांस कमी होईल!..."

फांस? मुलाची मिठी म्हणजे आईबापांच्या गळ्यांना लागलेला फांस? आई कसली? कसाई आहे ती! सारखी तोंडसुख घेते आपल्यावर. अशी चालून पाहून बोलते पावलोपावलीं! तिचा एकेक शब्द म्हणजे—पूर्वींच्या सास्वा सुनांना डागत असत म्हणे! पण हल्लींच्या या आया—पोटचीं पोरें इतकीं नकोशीं होतात तर त्यांना जन्माला कशाला घालतात हे लोक? तीं पोरें कांहीं अर्ज घेऊन गेलेलीं नसतात यांच्याकडे—'कांहीं तरी करा नि तुमच्या पोटीं आम्हांला येऊं द्या' म्हणून!

खरेंच! कुणाच्या पोटीं जन्म घ्यायचा हें माणसाच्या हातांत असतें तर किती किती बरें झालें असतें. तसें असतें तर आपण कमलची आईच पत्करली असती. मग अगदीं लहानपणीं आपली आई मेली असती! पण बालपणीं आई गेल्यामुळें कमलचें असें काय मोठें बिघडलें आहे? तिला काय कमी पडलें आहे? माई पोटच्या मुलीसारखी तिच्यावर माया करतात. आईवेगळी मुलगी म्हणून वडील एकसारखे तिचे लाड पुरवितात. मघांशीं तिनें आपलें कपड्यांचें कपाट उघडलें तेव्हां—किती विचित्र कल्पना आली आपल्या मनांत एक!

या कल्पनेच्या स्मृतीनें हेमाचें अंग रोमांचित झालें. मघांशीं शाळेंत आपल्या गाण्याच्या पहिल्या कडव्याला टाळ्यांचा कडकडाट झाला, तेव्हांसुद्धां आपलें मन असेंच कुठें तरी दूर दूर जाऊन रमत होतें, हें तिला आठवलें...

ती दचकली. त्या विचाराचे कपटे वाऱ्यावर उडून गेले. तिच्या पायांनीं तिला अचूक घरीं आणून सोडलें होतें. ती घराच्या पायरीवर उभी होती. घंटा वाजविण्याकरितां तिनें उजवा हात उचलला होता. इतक्यांत तिच्या कानांवर कर्कश शब्द पडले, 'गप्प बसतोस कीं नाहीं कारट्या?' कुणा तरी अर्धुज, आडदांड माणसाचा धक्का लागून सुंदर रंगीबेरंगी कांचेच्या भांड्यांची उतरंडच्या उतरंड कोसळून पडावी, तशी तिच्या मनाची स्थिति झाली.

एक—दोन—तीन—पांच—नऊ—अकरा—बारा!

ठोके मोजून संपतांच हेमानें डोळे उघडले. घरांतलीं सारीं माणसें केव्हांच झोंपीं गेलीं होतीं. बाबा, आई, तिन्ही भावंडें आणि ती संध्याकाळीं आलेली पाहुणे मंडळी. कुणाचा म्हटल्या कुणाचा शब्द ऐकूं येत नव्हता. फक्त कुणी तरी जोरजोरानें घोरत मात्र होतें. अंधारांत तें घोरणें मोठें भयंकर वाटत होतें. गुहेंतल्या हिंस्र जनावरासारखें—कोण बरें असावें? बहुधा ते पलीकडच्या खोलींत झोंपलेले लठ्ठ टक्कल पडलेले पाहुणे असावेत!

तिच्या शेजारीं झोंपलेला रघू लोळत होता. पलीकडे माली झोंपेंत हसत होती.

कुशीवर वळून तिनें डोळे मिटून घेतले. ती अंथरुणावर येऊन पडली तेव्हां दहाचे ठोके पडत होते. तब्बल दोन तास होऊन गेले. पण अजून तिचा डोळा लागला नव्हता. कार्यक्रम यशस्वी होईपर्यंत उद्यां आपलें मन सारखें ताणलेलें राहणार, तेव्हां आज मिळेल तेवढी झोंप घ्यायला हवी, असें वेण्यांना बांधलेल्या रिबिनी सोडून उशाशीं ठेवतांना तिनें स्वतःला बजावलें होतें. पण कां कुणाला ठाऊक, तिची झोंप आज कुठें तरी पळून गेली होती. तिनें पांचदहा वेळां कूस पालटली; डोळे उघडले, डोळे मिटले. शेवटीं कुठें तरी वाचलेला मेंढ्या मोजण्याचा प्रयोगसुद्धां करून पाहिला. पण आज झोंप तिच्यावर रुसली होती.

मघांशीं घरीं आल्यावर जें कांहीं घडलें होतें, त्यांतल्या कशाचीही—अगदीं एका गोष्टीचीसुद्धां—आठवण करायची नाहीं, असें पुनःपुन्हा मनाला बजावीत ती अंथरुणावर येऊन पडली होती; पण पाणी जसें उतरणीकडे धावतें, तसें तिचें मन त्या आठवणींकडे धाव घेत होतें. एखादा चित्रपट पाहून आल्यावर त्यांतले मधलेच कांहीं भाग मनामध्यें तरंगत राहावेत, तशीं कांहीं कांहीं उत्तरें-प्रत्युत्तरें तिच्या कानांत घुमत होतीं...

'पण आई, उद्यां संमेलन आहे आमचं!'

'तुझं संमेलन उद्यां असेल. पण माझं आजच झालंय, तें बघ. हे अजून कचेरींतून आले नाहींत. घरांत चार पाहुणे आहेत. भाजी तरी आणायला कुणी इथं हवं कीं नको? शेवटीं मालीला पाठविलं. तिनं दोडकीं आणलीं तीं सारीं कडू निघालीं, लहान पोरीला फसविलं माळणीनं! आमचं नशीबच कडू आहे बघ! तूं सहा वाजतां घरीं आली असतीस तर हा ब्रह्मघोटाळा झाला असता का? एवढी नऊ वाजेपर्यंत कुठं भटकत होतीस?'

'कमलकडे पातळ आणायला गेलें होतें, आई, उद्यां तें नेसून मी—

'एवढा ऋण काढून सण कशाला साजरा करायला हवा?'

'मास्तरांनीं सांगितलं म्हणून—'

'उद्यां मास्तर म्हणतील, विहिरींत उडी टाक. टाकशील का? कुणी नेम सांगावा? टाकशील बाई! पोलिसांचा ससेमिरा आईबापांच्या मागं लागावा, म्हणून तेवढंसुद्धां करायला अलीकडचीं पोरं कचरायचीं नाहींत!

...भावंडांची काडीइतकी तरी माया आहे का तुला? तो छोटू इतका किरकिरतोय—'

'तो माझ्यापाशीं राहात नाहीं ग आई!'

'चिमटे काढ चार म्हणजे राहील! कशाला मुलीच्या जन्माला आली आहेस? एवढी घोडी झालीस आणि म्हणे, मूल माझ्यापाशीं राहात नाहीं आई!

...सारखी स्वतःशीं गाणीं म्हणत असतेस. उद्यां सासरीं याचं चांगलं उट्टं निघेल हं!'

'पण मी सासरीं जाणारच नाहीं मुळीं!'

'म्हणजे?'

'मला लग्नच करायचं नाहीं!'

'आमच्या छाताडीं बसायचं असेल जन्मभर! छान! तुझ्यासारखी मुलगी घरांत राहिली म्हणजे आम्हांला कांहीं लोकांना तोंड दाखवायला नको. मधें त्या जयंताची भानगड नाहीं का निघाली? तसंच कांहीं तरी दररोज ऐकूं यायचं—कचेरींतल्या तीनचार कारकुनांनीं कसें त्यांना अगदीं बोचून सांगितलं तेव्हां! अलीकडचीं पोरंच मोठीं अगोचर! नाकांतला शेंबूड नीट पुसा म्हणावं आधीं आणि मग लागा प्रेम करायला!





अनुक्रमणिका

पायांत सललेलें कांट्याचें एक सलूं लागावें आणि त्या सूक्ष्म वेदनेनें माणसानें बेचैन होऊन जावें, तशीं हीं सारीं संभाषणें पुनःपुन्हा आठवून हेमा अस्वस्थ झाली. ती अंथरुणावर उठून बसली. आई, वडील, भावंडें, घर—साऱ्या गोष्टींविषयीं तिच्या मनांत एक विचित्र प्रकारची उबग उत्पन्न झाली. या सर्वांना सोडून कुठें तरी दूर दूर निघून जावें, असें तिला वाटूं लागलें.

तिनें अर्धवट उघड्या असलेल्या खिडकींतून बसल्या बसल्याच पाहिलें.

ती पुन्हा अंथरुणावर पडली. पण पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेल्या पांखरा-सारखी तिच्या मनाची फडफड एकसारखी चालली होती. आईचा तिला पुनः पुन्हा राग येत होता. तिच्यावर कसा सूड घ्यायचा, याचा ती विचार करीत होती.—उद्यां जयंत समारंभाला येईलच. घरीं परत येतांना आपण त्याला बरोबर घेऊन आलों तर? आईची खाशी खोड मोडेल! पण—पण बाबांना तें आवडणार नाहीं. छे! बाबांना त्रास होईल असें आपण कांहीं करतां कामा नये. त्यांना किती काम पडतें हल्लीं. रात्रीं नऊ नऊ वाजतात घरीं परत यायला. पूर्वीपेक्षां वाळल्यासारखे दिसतात नाहींते? त्यांना कांहीं होत तर नसेल ना? आपण त्यांना तसें विचारलें तर? बाळपणीं गळ्यांत हात घालून त्यांच्यापाशीं एखाद्या गोष्टीचा हट्ट आपण जसा धरीत होतों—अगदीं तस्सें त्यांच्याजवळ जावें आणि त्यांना विचारावें; असें वाटलें. पण आपल्याइकडे मोठी झालेली मुलगी कधीं बापाच्या गळ्यांत हात घालते का? इंग्रज मुली तसें करतात. पण आपण तसें कांहीं केलें तर लोक आपल्याला वेड्यांत काढतील. लोक कशाला हवेत? घरांत आई आहे ना आपली! ती कडकडेल, 'एवढी घोडी वाढली आहे! पण साधी गोष्ट कळत नाहीं हिला! लोक शेण घालतील तोंडांत हें बघितलं तर!...'.

सर्व शल्यांच्या वेदना विसरण्याकरितां हेमा उद्यांच्या समारंभाचा विचार करूं लागली...आपलें गाणें लोकांना अतिशय आवडेल. प्रकाशसुद्धां आपल्याकडे पाहून हसतील! समारंभ संपल्यावर ते म्हणतील, 'मी पुण्याला परत गेल्यावर चारदोन सिनेमाकंपन्यांना तुमचं नांव सांगतों. तुमच्यासारखी गुणी नटी पडद्यावर आली तर—'

उशाजवळच्या कोपऱ्यांत अचानक पाल चुकचुकली.

हेमा दचकली. उद्यां आपलें गाणें चांगलें होणार नाहीं, अशी भीति तिला एकदम वाटूं लागली. खूप खूप लोक जमलेले पाहून आपण घाबरून जाऊं, आपल्या तोंडांतून शब्दच उमटणार नाहीं. सारे लोक हसूं लागतील. आणि मग—

ही कल्पना तिला अगदीं असह्य झाली. तिनें आपलें मन दुसरीकडे वळविलें...देवानें कमलची आणि आपली अदलाबदल केली असती तर काय या वेळीं—या वेळीं एका लहानशा खोलींत दोन भावंडें घेऊन दाटीवाटीनें झोंपायची पाळी आपल्यावर आली नसती, बंगल्यांतल्या स्वतःच्या प्रशस्त खोलींत पलंगावरल्या मऊ मऊ गादीवर आपण—

पाहुण्यांना गाद्या द्याव्या लागल्यामुळें कुठल्या तरी पुराण्या रजईवर आईचें जुनें पातळ घालून आपण झोंपलों आहों, हें शल्य तिच्या मनाला आतां अधिकच बोचूं लागलें. इतक्यांत एक डांस गुणगुणत तिच्या तोंडा-पाशीं आला. तिला कमलच्या खोलींत पाहिलेल्या शुभ्र नाजुक मच्छर-दाणीची आठवण झाली. त्या मच्छरदाणींत मऊ मऊ उशीवर डोकें ठेवून खिडकींतून येणारें चांदणें पाहण्यांत केवढी मौज असेल...

हेमानें धडपडून डोळे उघडले तेव्हां कांहीं केल्या तिचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. तिची आई तिच्या अंथरुणावर येऊन बसली होती. तिच्या तोंडापाशीं तोंड नेऊन 'हेमा, हेमा—' म्हणून हांका मारीत होती.



अनुक्रमणिका

हेमा किलकिल्या डोळ्यांनीं आपल्याकडे पहात आहे, असें दिसतांच आई हसून म्हणाली, "कसली बाई झोप तुझी ही ! किती हांका मारल्या तरी तूं हूं कीं चूंसुद्धां केलं नाहींस. काल दमली होतीस वाटतं फार ? चल, उनउनीत चहा तुला आवडतो म्हणून आधण ठेवतांक्षणीं तुला उठवायला आलें. तूं कांहीं केल्या उठेनास- तेव्हां अशी गडबडलें म्हणतेस मनांत ! छाती धडधडायला लागली माझी ! हीं वर्तमानपत्रं हल्लीं बातेल तें छापतात ना ? ऐकल्या मनुष्यानं झोंपेच्या गोळ्या घेतल्या नि तमक्यानं—"

आईचे हें बोलणें ऐकतांना आणि तिच्या वत्सल स्पर्शाचा अनुभव घेतांना हेमाला वाटलें—आजची सकाळ कांठोकांठ भरलेला सुखाचा प्याला हातांत घेऊन आपल्या घरांत पाऊल टाकीत आहे. आज आपला सारा दिवस मजेंत जाणार—आज आपल्या गाण्याला टाळ्याच टाळ्या पडणार, पुनः पुन्हा 'वन्स मोअर' होणार—कांहीं करून तें गाणें ऐकायला आईला नेलें पाहिजे. पण ती कशी येणार ? घरांत पाहुणे आहेत, छोट्याची कुरकूर सुरू आहे. बाबांना आजचा दिवस रजा घेऊन घरीं रहायला सांगितलें तर ? पण बाबांनांसुद्धां माझें गाणें ऐकायला नको का ? पण—मग घर कोण सांभाळणार ?...

आंतल्या खोलींतून छोट्या रडव्या स्वरांत 'आई ग ऽ ऽ' म्हणून किंचाळला. 'आलें रे बाबा !' असें म्हणत आई चटकन् उठली आणि हेमाच्या मनांतील सुखद कल्पनांची सांखळी एकदम तुटली. मधुर झंकार काढणाऱ्या वीणेची तार एका क्षणांत तुटावी, त्याप्रमाणें—एकादें सुंदर स्वप्न मध्येंच...

अंगाला आळोखेपिळोखे देत हेमा अंथरुणावर उठून बसली. रात्रीच्या स्वप्नाचे विलग तुकडे तिला अंधुकपणें आठवूं लागले. लहान मुलें निरनिराळ्या रंगांचे तुकडे गोळा करून ते जपून ठेवतात ना ? तसा आपल्या मनाचा तो खेळ तिला वाटला. त्या खेळाला ती हसली, पण त्यांतच ती रमली. किती विचित्र तुकडे होते ते !

थोड्याशा रागीट स्वरांत आईनें मारलेली 'हेमा' ही हांक कानांवर पडतांच ती आपल्या तंद्रींतून जागी झाली, धडपडत उठली. माजघरांतून आईच्या अंगावरूनच तोंड धुण्याकरितां ती मागील दारीं गेली. तिला पाहतांच आई पुटपुटली, "मारो आळशी बाई तुम्ही अलीकडच्या पोरी. उद्यां चार पोरं झालीं म्हणजे तुम्ही काय करणार आहांत तें देव जाणे !"

चहा घ्यायला येऊन बसेपर्यंत सारें सुरळीत चाललें होतें. 'आई, तूं येशील का आज माझं गाणं ऐकायला ?' हा प्रश्न आईला आतांच विचारावा कीं घरकामांत तिला थोडी मदत करून ती लाडीगोडींत आल्यावर मग विचारावा, याचा हेमा चहा पितां पितां विचार करीत होती. पण तिनें आपली कपबशी खालीं ठेवली न ठेवली तोंच मालतीबाईनें आणखी एक-विस्कीट घेणाऱ्या छोट्याचा धक्का लागला. तिच्या हातांतील बशी खालीं पडून तिचे तुकडे तुकडे झाले आणि चहा सगळीकडे उडाला. त्या चिडखोर मुलीनें छोट्याला रट्टा घातला. आजारी छोट्याला मालीनें मारलेलें पाहून आईला राग आला. तिच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. हेमा गप्प बसली.

आणि मग आईच्या रागाचा पारा चढत जावा अशाच गोष्टी एकामागून एक घडत गेल्या. रात्रीं बाबा काम पुरें करण्याकरितां कचेरींतून कांहीं कागद घेऊन आले होते. चहा झाल्यावर ते आपले कागद शोधायला लागले त्यांनीं ब्रह्मांड शोधलें. पण त्यांना ते कुठें सांपडेनात. मग ते संतापले.





अनुक्रमणिका

त्यांच्या रागामुळें आईहि चिडली. शेवटीं बऱ्याच वेळानें त्या कागदांचा पत्ता लागला. ते कागद रद्दीचे आहेत, अशी रघूची समजूत झाली होती. त्यांतले कोरे कागद फाडून घेण्याकरितां रघूनें ते सारे आपल्या दप्तरांत नेऊन ठेवले होते. हल्लीं चित्रें काढायच्या नाद त्याला लागला होता. त्यामुळें मिळतील तितके कोरे कागद त्याला हवेच असत. तो वारंवार कागद मागूं लागला, तेव्हां बाबा चारपांच वेळां म्हणाले होते, 'सहाव्या यत्तेला कशाला रे एवढे कागद लागतात? तूं त्यांच्या होड्या करून शाळेजवळच्या ओढ्यांत सोडत असशील!' तेव्हांपासून रघबा कोऱ्या कागदांच्या पाळतीवर राहूं लागले. पण स्वारीची मजल बाबांचे कचेरींतील कागद पळविण्यापर्यंत जाईल, अशी कुणालाच कल्पना नव्हती. शेवटीं कागद सांपडले! सुदैवानें रघूनें ते फाडले नव्हते. पण कामाचा वेळ फुकट गेल्यामुळें बाबा चिडले होते. चार चापट्या मारल्याखेरीज पोराची ही खोड जाणार नाहीं, असें वाटून त्यांनीं रघूला मारायला सुरुवात केली. मग हेमाला मध्यें पडावें लागलें. पाहुण्यांच्या देखत नको तो तमाशा उगीच झाला, म्हणून ती कितीतरी वेळ मनांतल्या मनांत चडफडत राहिली.

पाहुण्यांपैकीं कुणाची तरी एकादशी आहे, अशी वर्दी थोड्या वेळानें आईला मिळाली. केळीं, रताळीं, वऱ्याचे तांदूळ—कांहीं म्हटल्या कांहीं घरांत नव्हतें. कांहीं तरी आणणें जरूर होतें. पण बाजारांत कुणीं जायचें, या प्रश्नावर घरांत आदळआपट सुरू झाली. बाबांना कामाचे कागद पुरे करून वेळेवर कचेरींत जाणें प्राप्तच होतें. रघबा बाजारावर स्वारी करायला एका पायावर तयार होते. पण दुकानदार त्याच्याएवढ्या चिमुरड्या पोराला फसविल्याखेरीज रहाणार नाहीं, म्हणून आई त्याला बाजारांत पाठवायला तयार नव्हती. राहतां राहिल्या दोघी—माली आणि हेमा! मालीसुद्धां तशी लहानच होती. शिवाय आपण काल संध्याकाळीं बाजारांत भाजी आणायला गेलों होतों, प्रत्येक वेळीं हीं कामें आपल्यालाच करावीं लागतात, आज हेमा घरीं आहे, तेव्हां आपण बिलकुल बाजारांत जाणार नाहीं, असें मालीनें आईला आधींच बजावून टाकलें. तेवढ्यानें आई ऐकणार नाहीं, असें वाटून 'तुझी हेमिटलीवर अधिक माया आहे, तूं तिला कध्धीं कध्धीं काम सांगत नाहींस; सारीं कामें मलाच सांगतेस, पण मला कांहीं बाबांनीं कोंडा देऊन विकत घेतलेली नाहीं—' असें कांहीं तरी बोलून तिनें रडायला सुरुवात केली!

हेमाला दुपारच्या गाण्याचा वेध लागला होता. तिनें मालीची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण माली कांहीं केल्या ऐकेना. शेवटीं आईनेंहि तिची कड घेतली. हेमाला आईचा असा राग आला! ती चडफडत बाजारांत गेली. मात्र परत येईपर्यंत तिचें मन एकसारखें म्हणत होतें, 'या घरांत आपल्या मनासारखें कांहीं कांहीं घडणार नाहीं. इथें आपल्याला कधींहि सुख मिळणार नाहीं. तें सुटेल तेव्हांच...'

सामान आईच्या पुढ्यांत आदळून ती आपल्या खोलींत गेली. कमलकडून रात्रीं आणलेलें पातळ एकदां नेसून पहायला हवें, असें ती मनांत म्हणत होती. पण खोलींत पाऊल टाकतांच तिच्या दृष्टीला जें दृश्य पडलें, त्यानें तिच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. ट्रंकेंत ठेवलेल्या त्या पातळाचा मालीला कसा पत्ता लागला, तें परमेश्वर जाणे! पण मालीनें तें शोधून काढलें होतें. तें नेसून पहाण्याचा तिनें पुन्हःपुन्हा प्रयत्न केला असावा! बऱ्याच ठिकाणीं तें चुरगळलें होतें. त्याची इस्त्री मोडून गेली होती.

हेमानें तें पातळ मालीच्या हातांतून हिसकावून घेण्याचा प्रयत्न केला. माली कांहीं केल्या तें सोडीना. "तूंच कांहीं आईची नि बाबांची एकुलती लेक नाहींस. माझाहि या घरावर हक्क आहे." असें ती पुन्हःपुन्हा हेमाला नजावूं लागली. "तें पातळ आपलं नाहीं, कमलचं आहे," असें हेमा तिला सांगत होती. पण मालीचा तिच्या बोलण्यावर विश्वास बसेना. "खोटारडी कुठली!" अशी तिनें वडील बहिणीची संभावना केली. 'मी हें पातळ कांहीं केल्या देणार नाहीं. तूं आईकडून दुसरं घे—' हें तिचें पालुपद एकसारखें सुरू होतें. शेवटीं आईला स्वयंपाक सोडून दोघींच्या भांडणामध्यें पडावें लागलें. तरी माली ऐकेना. आईनें खरकट्या हातानें दोन धपाटे दिले, तेव्हां कुठं मालीनें तें पातळ फेकून दिलें आणि कोपऱ्यांत जाऊन ती मुसमुसत रडत बसली!

या साऱ्या गोष्टींनीं हेमाच्या मनाला आलेली उद्विग्नता दुपारीं सभासमारंभाला जायच्या वेळेपर्यंत कायम होती. त्या वेळीं आणखी एक गोंधळ झाला. हेमा नवें पातळ नेसत आहे, हें पाहतांच ती कुठल्या तरी समारंभाला जात आहे, हें छोट्यानें ओळखलें. त्यानें तिच्याबरोबर जाण्याचा हट्ट धरला. छोटू बाहेर कुठें चार तास रमला तर आईचा भार तेवढाच हलका होईल, तेव्हां त्याला आपल्याबरोबर न्यावें, असें हेमाच्या मनांत आलें. पण तो तिथें मध्येंच रडायला लागला तर? भलत्याच वेळीं घरीं परत जाण्याचा हट्ट घेऊन बसला तर? अगदीं आपल्या गाण्याच्याच वेळेला 'आई, आई' म्हणून त्यानें ओरडायला सुरुवात केली तर? छे! असें कांहीं झालें तर सारे लोक आपल्याला हसतील. त्याच्याबरोबर आणखी कुणी तरी घरचें माणूस हवें, तरच...

हेमानें मालीला 'तूं येतेस का?' म्हणून विचारलें. पण पातळाच्या रुसव्याफुगव्यांत असलेल्या मालीनें 'माझं अडलंय खेटर!' असें तिला उत्तर दिलें. शेवटीं छोटूला सोडून हेमाला जावें लागलें. तो मोठमोठ्यानें ओरडूं लागला. सकाळीं आजारी छोटूला मारल्याबद्दल जी आई मालीवर रागावली होती, तीच आतां छोटूला चापट्या देऊं लागली. तो अधिकच किंचाळूं लागला.

हेमा घराबाहेर पडली तरी तिला छोट्याचा आक्रोश ऐकूं येतच होता. तिनें मागें वळून घराकडे पाहिलें. या घरांत आदळआपट, आरडाओरडा याखेरीज दुसरें कांहीं कांहीं नाहीं, या कल्पनेनें ती अगदीं व्यथित झाली. अशा घरांत राहण्यापेक्षां—

एकदम तिच्या मनापुढें एक चित्र उभें राहिलें...आपलें गाणें फार उत्तम वठतें. गायनाकरितां आलेल्या प्रकाशांना तें फार आवडतें. समारंभ संपल्यावर ते आपल्याला म्हणतात, 'मिस् हेमावती, मला तुमच्याशीं कांहीं खाजगी बोलायचं आहे. पांच मिनिटं जरा बाजूला येतां?' आपण दोघें बाजूला जाऊन बोलूं लागतों. साऱ्या लोकांचे डोळे आपल्यावर खिळून राहतात. प्रकाश आपल्याला म्हणतात, 'तुमचा आवाज फार गोड आहे. आमच्या चालू चित्राला तुम्ही प्लेबॅक द्याल का? मात्र आजच्या आज माझ्याबरोबर तुम्हांला पुण्याला यावं लागेल. तुमच्या वडील माणसांची परवानगी मिळेल ना?'

मग आपण त्यांना उत्तर देतों, 'ज्यांची परवानगी मीं घेतली पाहिजे, अशीं वडील माणसंच नाहींत मला! आईबाप आहेत. पण आईला माझं मन कधींच कळलं नाहीं. वडलांना त्याची ओळख करून घ्यायला सवड मिळत नाहीं. न विचारतां मी कुठं गेलें तर तीं दोघं म्हणतील कीं, बरं झालं. आपल्या मागची एक ब्याद सुटली. मायेच्या दृष्टीनं मी एक अनाथ मुलगी आहें. मला कुणा कुणाची माया मिळालेली नाहीं. मला तुम्ही

घेऊन चला आपल्याबरोबर. मला घर नको, भावंडं नकोत, आईबाप नकोत—कांहीं कांहीं नको. हें सारं सोडून कुठं तरी दूर दूर जायची इच्छा आहे माझी !...'

—हेमाचें गाणें सर्वांच्या अपेक्षेप्रमाणें सुंदर वटलें. खुद्द प्रकाशांनीं तिची पाट थोपटली. तिचें मन उत्तुंग आनंदलहरींवर तरंगूं लागलें.

मग काव्यगायन ऐकायला ती प्रेक्षकांत कमलच्या शेजारीं येऊन बसली. प्रकाशांनीं तास दीड तास अनेक लोकप्रिय भावगीतें त्यांना नव्या नव्या चालीं लावून म्हणून दाखविलीं. हेमाला संगीताची मोठी मेजवानीच वाटली ती ! 'डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका', 'घनतमीं शुक्र बघ राज्य करी,' 'कविबाळें खेळत होतीं,' 'बांस घे रे तान्ह्या बाळा, गोविंदा गोपाळा,' 'तेथें कर माझे जुळती,' 'गर्जा जयजयकार क्रान्तिचा, गर्जा जयजयकार'—सारींच गीतें किती मधुर होतीं, किती रसपूर्ण होतीं !

प्रकाश शेवटचें गीत म्हणूं लागले—'आई म्हणोनि कोणी...'

हेमा स्तब्ध होती. दुपारीं घरून निघायच्या वेळची तिची आई तिला अद्यापि दिसत होती. काल रात्रीची, एकाच वेळीं नाहीं, अशा हजारों वेळीं टाकून बोलणारी, काळजाला डाग देणारी, वैऱ्यासारखी वागणारी आई तिला परिचित होती. त्यामुळें काव्यगायकाच्या गोड कंपयुक्त स्वरांनीं सजीव केलेल्या 'नोहेच हांक मातें ! मारी कुणी कुठारी' या ओळी तिला आवडल्या त्या फक्त गाण्यांच्या दृष्टीनें. तिच्या हृदयाला त्यांचा स्पर्श झाला नाहीं.

पहिलें कडवें संपत आलें. हेमाला गायिल्या जाणाऱ्या ओळींचा गोडवा तेवढा जाणवला होता. मध्येंच तिनें कमलकडे पाहिलें. तिचा चेहरा गोरामोरा झाला होता. नेहमीं फुलपांखराप्रमाणें हसरी दिसणारी कमल एकदम मलूल झाली होती. फुलपांखराचे चिमणे रंगीबेरंगी पंख क्षणार्धांत कुठल्या तरी अज्ञात दीपज्योतीवर होरपळून गेले होते !

हेमानें कमलला रडतांना कधींच पाहिलें नव्हतें. परीक्षेंत कमी मार्क मिळोत, खेळतांना गुड्या फुटो अथवा पातळ फाटो, मास्तर थट्टा करोत, तापानें अंग फणफणो, कमलचे डोळे नेहमींच हसत रहात. पण आतां मात्र—

'स्वामी तिन्ही जगाचा ! आईविना भिकारी—' ही ओळ प्रकाशांनीं विलक्षण आर्त स्वरानें आळविली. हेमानें कमलकडे वळून पाहिलें. तिला हुंदके आवरत नव्हते. तोंडावर हातरुमाल घेऊन ती आंतल्या आंत ते दाबीत होती.

हेमाचें मन गोंधळलें. लहानपणींच देवाघरीं गेलेल्या आईचें दुःख कमलला इतक्या तीव्रतेनें कां जाणवावें, हें तिला कळेना. पण कमलच्या दुःखानें तिचें मन कंपित झालें. सांत्वन करण्याकरितां हेमानें तिचा हात हातांत घेतला. तो किती थरथर कांपत होता—घामानें कसा डबडबून गेला होता !

कवितेचें दुसरें कडवें सुरू झालें. कमलचा तो कंप आपल्या हातांतून हृदयांत प्रवेश करीत आहे, असें हेमाला वाटलें. 'चारा मुखीं पिलांच्या । चिमणी हळूच देई ॥ गोठ्यांत वासरांना । या चाटतात गाई ॥' या ओळी प्रकाश आळवीत होते. त्या ऐकतां ऐकतां बाळपणींच्या दोन गोष्टी हेमाच्या डोळ्यांपुढें उभ्या राहिल्या. किती तरी वर्षांत त्यांची तिला आठवण झाली नव्हती—

...हेमा पांचसहा वर्षांची होती तेव्हां आईला कुठें हळदीकुंकवाला जायचें होतें. हेमाला बरें नव्हतें, म्हणून तिला तिनें घरींच ठेवलें होतें. त्या दिवशीं तिला कुठें तरी कुणी एक पेढा दिला. 'कसा आहे पेढा ?' म्हणून

देणाऱ्या बाईनें विचारलें तेव्हां आईनें 'छान आहे' म्हणून तिला सांगितलें. पण पेढा खरोखर तिनें खाल्ला नव्हता. हेमासाठीं एका पुडींत बांधून आणला होता तो तिनें. हेमा आईची वाट पहात दारांत उभी होती. पेढा मिळतांच ती आनंदानें नाचूं लागली. तिनें पटकन् पेढा खाल्ला आणि मग आईला विचारलें, 'आई, तुला ग कुठं पेढा आहे?' आईनें हसत हसत तिला जवळ ओढलें आणि तिच्या ओठावर आपले ओठ टेकीत ती म्हणाली, 'हा माझा पेढा!'

दुसरी आठवण अगदीं निराळी होती. हेमाला डांग्या खोकला झाला होता. रात्रीं ढांस आली म्हणजे ती अगदीं बेचैन होई. आई रात्र रात्रभर तिला मांडीवर घेऊन बसे. मग तिचा थोडा वेळ डोळा लागे. अशीच ती एकदां आईच्या मांडीवर झोंपली होती. मध्येंच तिला जाग आली. तिनें पाहिलें, आईचे डोळे पाण्यानें भरून आले होते. समोरच्या कोपऱ्यांत देव होते. त्या कोपऱ्याकडे हात जोडून ती म्हणत होती, 'देवा, मीं तुझ्याकडे आजवर कांहीं मागितलं नाहीं. जें मिळालं त्यांत सुख मानलं. पण आतां मला एवढी भीक घाल. या पोरीला लवकर बरं वाटेल असं कर!' अशी प्रार्थना करून देवापुढें जोडलेल्या त्याच दोन्ही हातांनीं तिनें छोट्या हेमाचें तोंड कुरवाळलें होतें, त्याच हातांनीं तिचे केस सारखे केले होते.

या दुसऱ्या आठवणीनें हेमा अस्वस्थ झाली. आज सकाळींहि आई आपल्या केसांवरून तसाच हात फिरवीत बसली होती. मग त्या वेळीं आपल्याला बाळपणींच्या या प्रसंगाची आठवण कां झाली नाहीं? असें कां व्हावें? माणूस मोठें व्हायला लागलें कीं, त्याची भावना निरनिराळ्या आवरणांखालीं अधिक झांकली जाते काय? आणि तीं आवरणें दूर करणें, हेंच काव्याचें, कलेचें खरें कार्य आहे काय?

हे दोन्ही प्रश्न हेमाला मोठे बिकट वाटले. त्यांचीं उत्तरें तिला चटकन् सांपडेनात.

श्रोते पुढच्या कडव्यांत गुंग होऊन गेले होते. 'सांगेल ना म्हणाया। आम्हां शुभं करोति—' ही ओळ प्रकाश घोळवीत होते. हेमाच्या मनांत अनेक आठवणी भिरभिरूं लागल्या—बागेंतल्या फुलपांखरांप्रमाणें!

पांच वर्षांची हेमा पहिल्यांदां शाळेंत जातांना रडे. बाबा कचेरीला गेलेले असत. मग दाराला कुलूप लावून न जेवतांच आई तिला पोंचवायला जाई. जुनेर नेसून ती स्वयंपाक करीत असे. हेमाला पोंचविण्याकरितां दुसरें चांगलें लुगडें नेसण्याचा तिला अनेकदां कंटाळा येई. मग त्या जुनेरावरच ती बाहेर पडे. रस्त्यांत कुणी तरी ओळखीची बाई दिसली आणि तिनें जुनेराविषयीं प्रश्न केला म्हणजे आई हसून उत्तर देई, 'माझं जुनेर काय बघतां? आमच्या हेमाचा फ्रॉक किती छान आहे तो पहा ना!'

दिवेलावणीला आई हेमाला देवापुढें बसवी. तशी ती कांहीं शिकलेली नव्हती. पण तिला जें पाठ येत होतें, तें सारें ती हेमाला शिकवी. एकदां हेमानें विचारलें, 'आपण रोज रोज देवाची प्रार्थना कां करायची ग?' आईनें उत्तर दिलें, 'त्यानं आपल्याला सुखी ठेवावं म्हणून!' हेमानें पुन्हा प्रश्न केला, 'आपल्याला म्हणजे कुणाला?' आईनें हसत सांगितलें, 'आधीं तुला नि मालीला. मग त्यांना आणि शेवटीं मला'...

साखरेचे कण नेणाऱ्या मुंग्यांच्या रांगेप्रमाणें अशा किती किती बारीक पण गोड आठवणी हेमाच्या मनापुढून सरकूं लागल्या. तिला विपुल केसांची देणगी जन्मतःच मिळाली होती. आई दर शनिवारीं तिला मोठ्या काळजीनें न्हाऊं घाली. हेमाचे केस सुंदर दिसावेत, म्हणून किती किती कष्ट केले होते तिनें! स्वतःच्या केसांची अशी निगा तिनें कधींच केली नव्हती!

हेमा मोठी झाली. इंग्रजी शाळेंत जाऊं लागली. वर्गांतल्या कमलचीं सोन्याचीं कांकणें बघून तिनें तसल्या बांगड्यांचा हट्ट धरला. आईच्या हातांत एक एकच बांगडी होती. तिनें लगेच त्या दोन्ही बांगड्या मोडल्या आणि हेमाच्या हातांत सोन्याचीं कांकणें घातलीं. तेव्हांपासून आईच्या हातांत सोन्याच्या बांगड्या नाहींत. चार काचेचीं कांकणें हेच काय ते गेल्या सहा वर्षांत तिनें अंगावर घातलेले दागिने!

बाबा टायफॉइडनें आजारी पडले, तेव्हां रात्रभर त्यांच्या उशाशीं जागत बसणारी पण मुलांना शाळेंत जायला उशीर होऊं नये म्हणून पहाटे कामाला लागणारी आई—छोटूचें बारसें होतांच घरकामाला जुंपून घेणारी आई—दळणारी, पाणी भरणारी, धुणीं धुणारी, अंगांत ताप असला तरी वावरत रहाणारी, अहोरात्र कष्ट करणारी आई...

सारें सभागृह कारुण्यानें भारावून गेलें होतें. आभाळ भरून यावें, तसा भास होत होता. कुणी बोलत नव्हतें. कुणी हलत नव्हतें. जणुं कांहीं अगणित पाषाणमूर्तींच्या विचित्र जगांत एक अपरिचित गायक आला होता, आणि आपल्या गीतानें त्या मूर्तींना पाझर फोडण्याचा प्रयत्न करीत होता.

हेमानें कमलकडे पाहिलें. ती हातरुमालानें डोळ्यांत पुनः पुन्हा उभें राहणारें पाणी पुशीत होती.

एखाद्या धक्क्यानें एकदम जखमेची खपली निघावी आणि तिच्यांतून भळभळ रक्त वाहूं लागावें, तशी हेमाच्या मनाची स्थिति झाली. तिला वाटलें, असेंच धावत घरीं जावें, आईच्या गळ्याला मिठी मारावी आणि—

मग किती तरी दिवसांत—छे ! महिन्यांत—आपण आईजवळ जाऊन तिला बिलगलों नाहीं, तिच्या मांडीवर डोकें ठेवून गुजगोष्टी केल्या नाहींत, तीं मलूल दिसली तरी 'आई, तुला काय होतंय ग ?' असा साधा प्रश्न तिला केला नाहीं ! असें कां व्हावें? आईपासून आपण दूर दूर जात आहों का ? आणि तें कुठें ? कोण नेत आहे आपल्याला ? अलीअलीकडे आपल्याला आईचा मनस्वी राग येतो, तो कां ? यांत कुणाची चूक आहे ? तिची कीं आपली ?

ती एकदम भानावर आली. कवितेच्या शेवटच्या ओळी आर्त स्वरानें आळविल्या जात होत्या—'ये रागवावयाही । परि येइ येइ वेगें...'

टाळ्यांच्या कडकडाटांत काव्यगायन संपलें. कमल हेमाचा हात धरून म्हणाली, "आपण कुठं तरी लांब लांब फिरायला जाऊं या गडे. तुला मिठी मारून मला खूप खूप रडायचंय्—माझ्या आईच्या साऱ्या साऱ्या आठवणी सांगायच्या आहेत तुला !"

* * * *

रात्रीं अकरा वाजतां कमलच्या गाडींतून हेमा घरीं यायला निघाली, तेव्हां तिचें मन कांठोकांठ भरलेल्या कळशींतल्या पाण्यासारखें खिदळत होतें.

समारंभ संपल्यापासून जणुं कांहीं ती फुलांच्या पायघड्यांवर नाचत होती. मैत्रिणींची, शिक्षकांची, पाहुण्यांची, साऱ्या लोकांची स्तुति ऐकतां ऐकतां तिची पुरेवाट झाली. मग कमलनें शाळेच्या गड्याला 'हेमा जेवून रात्रीं घरीं परत येईल—' असा निरोप तिच्या घरीं सांगायला सांगितलें, आणि तिला घेऊन गाडींतून ती गांवाजवळच्या टेकडीवर गेली. तिथें त्या दोघी किती तरी वेळ स्तब्ध बसल्या. मग किती तरी वेळ त्या हितगुज करीत राहिल्या.

कमलची आई तिच्या लहानपणींच देवाघरीं गेली होती. आईच्या चार-पांच आठणी तिच्या मनावर अगदीं कोरल्यासारख्या झाल्या होत्या. घरांत त्या तिला कधीं कुणाला सांगतां येत नव्हत्या. त्या आठवणी काढल्या तर सावत्र मुलीला आपली माया लागली नाहीं, असें वाटून माई दुःखी होतील म्हणून तिनें त्या मनाच्या कोपऱ्यांत तशाच जपून, लपवून ठेवल्या होत्या. त्यांतली प्रत्येक आठवण हेमाला सांगतांना ती अगदीं रंगून गेली. आठवण संपली कीं ती म्हणे, "अशी होती आई !" आणि प्रत्येक वेळीं हेमाला वाटे—या आठवणींत नवीन असें कांहींच नाहीं. साऱ्या मुलांच्या आईच्या आठवणी सारख्याच असतात कीं काय ? आपणहि बालपणीं हा अनुभव घेतला आहे. एवढेंच नव्हे तर कमलपेक्षां आपण भाग्यवान् आहों. 'अशी होती माझी आई !' असें म्हणून आज कमलला समाधान मानावें लागत आहे. पण आपण आईच्या अशा असंख्य आठवणी कमलला सांगूं शकूं आणि शेवटीं आनंदानें व अभिमानानें म्हणूं, 'अशी आहे माझी आई !'

आठवणी संपल्या तरी दोघी एकमेकींच्या हातांत हात घालून तिथें तशाच बसून राहिल्या. तिथल्या भिरभिर वाहणाऱ्या वाऱ्यांत, मावळत्या सूर्यकिरणांनीं चकाकणाऱ्या देवीच्या देवळाच्या कळसांत, पलीकडे सळसळ झाडींत—सर्वत्र विलक्षण काव्य भरलें आहे, असें त्या दोघींना एकसारखें वाटत होतें.

सूर्य मावळू लागला.

आतां अकरा वाजून गेले होते. आईच दार उघडायला उठेल, अशी हेमाची कल्पना होती. पण दार उघडलें तें मालीनें. ती अजून सकाळच्याच घुश्श्यांत असावी ! हेमाशीं एक शब्दसुद्धां न बोलतां ती झोंपायला निघून गेली.

हेमा माजघरांत पाणी प्यायला म्हणून आली. बाबांच्या खोलींत सारें सामसूम दिसत होतें. आईला आपण आलों आहों, हें कळावें म्हणून ती हळूच स्वतःशीं गुणगुणूं लागली, "दार वाजलें—"

एकदम खोलींतून बाबा कडकडले, "आलींत का आकाबाई ? नशीब आमचं ! म्हटलं, त्या जयंताचा हात धरून कुठं पळून गेलांत कीं काय ?"

"पण बाबा—" हेमा कांपऱ्या स्वरांत उद्गारली.

"गप्प बैस आतां. डोकं असं दुखतंय माझं. त्यांत तुझी भर ! नऊ वाजून गेले तरी तुझ्यासारख्या तरण्याताठ्या मुलीचा पत्ता नाहीं. काय समजावं आम्हीं आईबापांनीं ? चालवत नव्हतं तरी गेलों बहाणा फाडीत तुझी चौकशी करायला !"

"पण बाबा, कमलला विचारा—"

"चूप ! कुणाच्या साक्षीची जरूर नाहीं मला !"

इतक्यांत आई आंतून म्हणाली, "तुझं तूंच वाढून घे बाई आतां ! नि कृपा करून एक शब्दसुद्धां बोलूं नकोस. जेव आणि मुकाट्यानं झोंपलीस, म्हणजे उपकार झाले माझ्यावर !"

जड पावलांनीं आणि त्यापेक्षांहि जड हृदयानें हेमा आपल्या अंथरुणावर जाऊन बसली. माली व रघू यांना झोंप लागली होती. पण हेमाला झोंपावेंसें वाटेना. ती केवढ्या आशेनें घरीं आली होती—आपलें गाणें किती चांगलें झालें, हें आईला ती लाडत लाडत सांगणार होती ! मग आई बाबांना हांक मारून म्हणाली असती, 'ऐकलं का ? आज आपल्या हेमिटलीनं—'

होय, तिला 'हेमिटली' हा आईच्या तोंडचा गोड गोड शब्द पुनः पुन्हा ऐकायचा होता. 'आमचा पठाण आहेच तसा !' म्हणून बाबांच्या हातची थोप घेण्याकरितां तिची पाठ भुकेली होती. पण घरीं आल्यावर जें घडलें तें अगदीं निराळें ! जें नको होतें तें ! जें विसरण्याचा ती प्रयत्न करीत होती तें !

'आई' कविता ऐकतां ऐकतां जो विचार तिच्या मनोला चाटून गेला होता, तोच आतां पुन्हा तिचें मन कुरतडून टाकूं लागला. एका घरांत राहणारीं माणसें मोठीं झालीं कीं, एकमेकांपासून दूर जाऊं लागतात काय ? शरीरानें जवळ असून मनानें दूर असण्यांत केवढें दुःख आहे ! हें असें कां



अनुक्रमणिका

घडतें ? आई आपल्यापासून दूर दूर जात आहे कीं आपण आईला सोडून दूर चाललों आहों ? हें जें घडत आहे, त्यांत चूक कुणाची ?

तिचें शरीर शिणलें होतें, मन मलूल झालें होतें. सारें सारें विसरून निद्रेच्या कुशींत स्वस्थ पडायची तिची फार इच्छा होती. पण तिच्या पापण्या कांहीं केल्या मिटेनात. जणुं कांहीं आज घरांतल्या त्या अंधारांत उघड्या डोळ्यांनीं ती सत्य शोधून काढण्याचा निकराचा प्रयत्न करीत होती.

तिच्या मनांतील कल्पनाचक्र आतां वेगानें फिरूं लागलें. तिला वाटलें, ल्हानपणीं मुलाला घर हा एक राजवाडा वाटतो. पण तें मोठें होऊं लागलें कीं तोच त्याचा तुरुंग बनतो. तुरुंगांत कैद्यांना निरनिराळ्या कोठड्यांत कोंडून ठेवतात ना ? तशी आपली स्थिति झाली आहे. एका कोठडींतील कैद्याला जसें दुसऱ्या कोठडींतील कैद्याशीं बोलतां येत नाहीं, तसें घरांतलें एक मनुष्य दुसऱ्याला आपलें दुःख सांगूं शकत नाहीं. जो तो मनांतल्या मनांत झुरत असतो, कुढत राहतो, चडफडत बसतो. असल्या तुरुंगांत राहण्यापेक्षां तो फोडून—

या कल्पनेसरशीं तिच्या अंगावर शहारे आले. उशींत डोकें खुपसून ती असहायपणें स्फुंदूं लागली. आपल्या मनांतलें कल्पनाचक्र बंद पडावें, म्हणून तिनें खूप धडपड केली. पण तिच्या धडपडीचा उलटा परिणाम झाला. तें अधिकच वेगानें फिरूं लागलें.

कुठल्या तरी नदीला मोठा भयंकर पूर आला होता. तांबडें लाल पाणी जिकडे तिकडे पसरलें होतें. त्या पुरापासून आपला बचाव करण्याकरितां माणसें जीव घेऊन पळत सुटलीं होतीं. नदीच्या कांठावर गुडगाभर पाण्यांत हेमा आणि आई दोघीहि उभ्या होत्या. आई तिला म्हणत होती, 'चल, लवकर पाऊल उचल, पोरी ! हें पाणी हां हां म्हणतां वाढेल. एका पळांत आपण या लोंढ्यांत वाहून जाऊं.' हेमानें आईला कांहींच उत्तर दिलें नाहीं. पाण्याच्या उसळणाऱ्या लाटांकडे ती उत्सुकतेनें पाहत राहिली. एक सोन्याची सुंदर कळशी त्या पुराच्या लाटांवर डोलत, नाचत आपल्याकडे येत असलेली तिला दिसली. तिनें एकदम आईचा हात झिडकारून टाकला, आणि त्या कळशीकडे धाव घेतली. पाणी तिच्या कंबरेपर्यंत आलें. पण त्याची तिला पर्वा नव्हती.

भेदरलेली आई कांपऱ्या स्वरानें ओरडली, 'हेमा, मागं फिर. पोरी, मागं फिर. कारटे, मागं फिर—!' हेमाला ते शब्द ऐकूं गेले. ती आईच्या भित्रेपणाला हसली आणि पुढें पुढें जाऊं लागली. आतां पाणी तिच्या गळ्याला लागलें होतें. पण तिला त्याचें कांहींच वाटत नव्हतें. लाटांवर नाचणारी, डोलणारी ती सोन्याची सुंदर कळशी आपल्याकडेच येत आहे, ती आतां अगदीं हाताशीं आली आहे, आणखी चार पावलें पुढें गेलें कीं, ती आपल्या हाताला लागेल, अशा आनंदांत ती होती. तांबड्या लाटा तिच्या गालांशीं आणि केसांशीं खेळूं लागल्या. आईचा आक्रोश अजूनहि तिला अस्पष्ट ऐकूं येत होता. आईच्या भित्रेपणाला ती तुच्छतेनें हसली. ती सोन्याची सुंदर कळशी जवळ आली—अगदीं जवळ—हेमानें आपला हात पुढें केला. ती सोन्याची सुंदर कळशी तिच्या हाताला लागली. पण लगेच तिनें आपला हात मागें घेतला. त्या कळशींत किती किती साप लपले होते. एक—दोन—तीन—आतां ते कळशीबाहेर यायची धडपड करीत होते. त्या पहिल्या सापाचें तोंड जयंतासारखें दिसूं लागलें. दुसऱ्या—

हेमा घाबरली. पळून जाण्याकरितां मागें वळली. पण तिला आपली आई कुठेंच दिसेना ! जिकडे तिकडे उंच उंच तांबड्या लाटा ! तिनें हताशपणानें किंकाळी फोडली, 'आई, आई !'

उशींत डोकें खुपसून स्फुंदत असलेल्या हेमानें दचकून वर मान करून पाहिलें. तिच्या पाठीवर फिरणारा तो हात—होय, तो आईचाच वत्सल हात होता. ती गोंधळली, रडतां रडतां हसली आणि चटकन् उठून तिनें आईच्या कुशींत डोकें खुपसलें. ती विचार करूं लागली. अंधारांत आई आपल्यापाशीं केव्हां बरें येऊन बसली ?

तिचें मस्तक थोपटीत आई म्हणाली, "असा त्रास करून घेऊं नये पोरी. ते मघांशीं तुला रागानं बोलले. पण खरं सांगूं? आम्ही आईबापांचीं शरीरं आंबतात, चिडतात आणि मुलांवर रागवतात. आमचीं नशिबं फुटकीं असतात. त्यांच्या कांचा तुमच्या पायांना लागून ते रक्तबंबाळ होतात. देव आमच्यावर रागावतो नि त्याच्यावर उलट रागावतां येत नाहीं, म्हणून आम्ही तो राग तुमच्यावर काढतों. घरीं यायला रात्र होणार आहे, हें एका शब्दानं तूं कळविलं असतंस तरी ते असे संतापले नसते !"

हेमानें मान वर करून आश्चर्यानें विचारलें, "शाळेच्या गड्यानं कमलचा निरोप कळविला नाहीं तुला ?"

"छे ! कदाचित् गडबडींत तो विसरला असेल !"

"आई, चुकलें मी ! मी वाईट आहें ! मी फार फार वाईट आहें ग !" आईला घट्ट मिठी मारून आणि तिच्या खांद्यावर डोकें ठेवून हेमा स्फुंदत म्हणाली.

"आपण सारीं वाईट आहोंत आणि सारीं चांगलींहि आहोंत. मघांशीं किती वेळ तुझी वाट बघत बसलें होतें मी मीठमोहऱ्या घेऊन. ती तुझी वाईट आई नव्हती; चांगली आई होती. वरच्या गल्लींतल्या डॉक्टरीणबाई समारंभाहून परत जातांना मुद्दाम मोटार थांबवून मला भेटायला आल्या, आणि म्हणाल्या, 'तुमच्या हेमानं आज गाणं फार फार छान म्हटलं हं. मोठ्या भाग्यवान् आहांत तुम्ही, अन्नपूर्णाबाई ! ही मुलगी तुमचे पांग फेडील.' पोरी, त्यांचे शब्द ऐकले नि मूठभर मांस चढल्यासारखं झालं मला. देवापुढं जाऊन मी रडलें. दुःखानं पुष्कळदां रडतें. पण आज आनंदानें रडलें. तुझी दृष्ट काढण्यासाठीं तूं येईपर्यंत बसणार होतें मी. पण छोट्याला संध्याकाळीं ताप आलाय बघ ! तो किरकिरायला लागला, म्हणून त्याला झोंपवायला गेलें. आत्तां कुठं झोंपला तो. त्यांचाहि डोळा लागलाय्. चल बाई, जरा हलक्या पावलांनीं आंत चल. म्हणजे तुझी दृष्ट काढतें नि तुला चांगली उनउनीत कॉफी करून देतें."

आईच्या गालाला आपला ओला गाल लावीत हेमा म्हणाली, "मला कांहीं कांहीं नको या वेळीं, आई. तूं तेवढी हवीस. मला जवळ घे—आणखी जवळ घे—ल्हानपणीं घेत होतीस तसं घे ! तुझ्यापासून मला कुणी तरी दूर दूर नेतंय्, अशी एकसारखी भीति वाटते बघ मला हल्लीं !"

तिला पुढें बोलवेना. दाटलेल्या गळ्यानें ती स्फुंदूं लागली. आई तिच्या केसांवरून हळूच हात फिरवीत म्हणाली, "वेडी कुठली !"

स्फुंदत असलेली हेमा खुदकन् हसली.



अनुक्रमणिका


भगीरथ प्रयत्न
आपल्या धर्मग्रंथांत राजा भगीरथाच्या दिव्य प्रयत्नाची एक उत्कृष्ट बोधकथा आहे. पृथ्वीवरील शेतजमिनी पिकविण्यासाठीं भगीरथानें गंगामातेला स्वर्गांतून खालीं आणलें. गंगेचा असह्य ओघ श्रीशंकरांनीं आपल्या मस्तकीं धारण केला.
अर्वाचीन काळांत मानवाला किर्लोस्कर पेटरसारख्या अिन्जिनांच्या साह्यानें भरपूर पाणीपुरवठा उपलब्ध करून अल्पश्रमांत विपुल धान्यनिर्मिती केल्याचें श्रेय संपादण्याची शक्यता निर्माण झाली आहे.
किर्लोस्कर-पेटर
डीझेल अिन्जिन
KIRLOSKAR
किर्लोस्कर ऑईल अिंजिन्स लिमिटेड, खडकी, पुणें ३

